★ तारा-ग्रंथ-प्रकाशन, पुस्तक १ लें ★

स्वतंत्र अद्‌भुत-रम्य सामाजिक कादंबरी

# नर्स सुंदराबाई

" If you expect rothing then you
cannot be disappointed !"

—Las–Tse. ( चिनी तत्त्ववेत्ता )

लेखक

श्रीयुत शंकर दिनकर करंदीकर (Palmist);

( कै. श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड सरकार बडोदें
यांचे खास (Storyteller) स्टोरिटेलर )

व

क्रांतिकारकांचा अप्रकाशित इतिहास ", ' राजनैतिक कारस्थान ',
' पतिव्रता सावित्री ', ' पुष्पराणी ', ' मी दारुड्या कसा झालों ! ',
' देशत्यागाचा इतिहास ', ' उर्वशी ', इ. ग्रंथांचा व
' सं. पुण्याची मुलगी ( सु. सं. मं. )', ' सं. दिल्लीहून
सुटका ' ( बालमोहन सं. मं. ), ' सं. अज्ञात
द्रौपदी ' ( कि. सं. मं. ), या नाटकांचा कर्ता.

---

प्रथमावृत्ति [ १९४१ इसवी

( किंमत २ रुपये )

— प्रकाशक —
शंकर दिनकर कारंदीकर
२११ जव्हेरीबाई बिल्डिंग ३ मजला
चर्नीरोड, गिरगांव, मुंबई ४



— मुद्रक —
जयराम दिपाजी देसा
‘ राष्ट्रवैभव प्रेस ’, २७१ गिरगांव, मुं

# अनुक्रमणिका



———

# प्रस्तावना

"नर्स सुंद्राबाई" ही दैवाच्या रहस्यमय फेऱ्यांत सांपडून त्याच्याशीं युद्ध खेळणाऱ्या एका भगिनीची आत्मकथा आहे. मिशनऱ्यांनीं व ख्रिश्चन पतिनें केलेला तिचा छळ, व अमेरिकेसारख्या परदेशांत तिच्यासारख्या हिंदी स्त्रीनें मोलमजुरी करणें, वगैरे गोष्टी वाचून हृदय द्रवल्यावांचून रहात नाहीं. विशेषतः आगींतून व आत्महत्येकरतां अफु खाऊनसुद्धां, आपल्या जीवनाबरोबर झगडण्याकरतां ती जिवंत राहू शकली, ह्यावरून ईश्वरी मायेची यथार्थ कल्पना होते.

नर्स सुंदराबाईचा धाडसी स्वभाव, प्रसंगावधान, हुशारी व जुन्या तिरस्करणीय रूढीबद्दल विरोध ह्या गोष्टींचें कौतुक करावें तितकें थोडेंच आहे. परंतु तिचा अत्यंत भोळा स्वभाव व मनाच्या कमकुवतपणामुळें झालेलें नुकसान यांपासून आमच्या हिंदुभगिनींना धडा घेण्यासारखा आहे. नर्स सुंद्राबाईनें आपल्या पतीची निंद्य वर्तणूक प्रकाशांत आणली आहे ती वाचून थोडासा विषाद वाटतो; परंतु आत्मकथन करतांना सत्य कटु असलें तरी तें समाजाच्या हिताकरतां प्रकाशांत आणावेंच लागतें.

केशवानंदस्वामींची हकिकत वाचतांना जादू, भूतप्रेत, मोहिनीविद्या, दिशाभूल इत्यादि गोष्टी आणि त्यांचे चमत्कार हें वाचून बुवाबाजीवरसुद्धां चांगलाच प्रकाश पडतो. पुस्तक सुरुवातीपासून पूर्ण होईपर्यंत हातावेगळें करावेंसें वाटत नाहीं. वाचून पूर्ण झाल्यावर असें वाटतें कीं, नर्स सुंदराबाईच्या

चरित्रापासून करमणूक तर होतेच होते, परंतु त्यापासून स्त्री-पुरुषांना पुष्कळच उपदेश घेण्यासारखा आहे. समाजांतील धूर्त व स्वार्थी-साठीं वाटेल तें करण्याची तयारी असलेल्या कावेबाज लोकांच्या मोहाला ह्या अतिशय भोळ्या व कमकुवत मनाच्या स्त्रिया कशा बळी पडतात त्याचें नर्स सुंदराबाई जिवंत उदाहरणच आहे. आपल्या पतीच्या स्वार्थी थापांना भुलून सुंदराबाईनें जरी धर्मांतर केलें तरी ती हाडानें व मनानें हिंदूच होती व पुनः योग्य संधी मिळतांच तिनें परत हिंदुधर्माचा स्वीकार केला. उपसंहारांतील तिच्या मुलाचें पत्र तर निःसंशय उदात्त हृदयाचें स्पष्ट द्योतकच आहे. परंतु **हिंदुस्त्रीला कुठेंहि सप्तपाताळांत नेऊन गाडली, तरी तिची आपल्या धर्मावरील श्रद्धा केव्हांही नष्ट होत नाहीं,** ही गोष्ट पुरुषांनींहि ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. मुख्य कर्तव्य म्हणजे तिला छळणाऱ्या पतीची सेवाशुश्रूषा करणें हें ती केव्हांच विसरत नाहीं. हें सुंदराबाईनें सिद्ध करून दाखविलेंच आहे.

सुंद्राबाईच्या पतीनें तिला फसवून डॉक्टरकडून तिचें ऑपरेशन करविलें वगैरे गोष्टी वाचून स्पष्टच होतें कीं, तिला संतति-नियमन पसंत नव्हतें. परंतु, सांप्रत समाजाला तें मत कितपत मान्य होईल तें समाजानेंच ठरवावयाचें आहे. सुंद्राबाईच्या भोळेपणाची कींव करावीशी वाटते, कीं, प्रत्येक बाबतींत ती फसत असूनसुद्धां कोणीतरी एक अनोळखी इसम ट्रॅममध्यें भेटून 'मी तुझा मामा आहे' म्हणून सांगतो व ती त्याचें जेवणाचें आमंत्रण स्वीकारते व स्वतःच्या शीलावर आपत्ति ओढवून घेते.

मिसेस कार्पेंटर व मिसेस अँड्र्यूजसारख्या अमेरिकन स्त्रियांनीं संकटांत सांपडलेल्या एका हिंदी स्त्रीला, नर्स सुंदराबाईला, जी मदत केली त्याबद्दल सहजच त्यांच्या चरणीं मस्तक नम्र करावेंसें वाटतें. धन्य तें त्यांचें स्त्रीहृदय, कीं त्यांच्यामुळें, आमच्या हिंदु म्हणविणाऱ्या श्रीमंत समाजाचे डोळे थोडेतरी उघडतील, व आमचा श्रीमंत समाज, संकटांत सांपडलेल्या हिंदु भगिनींची अवहेलना न करतां, त्यांच्याकडे थोडातरी दयेच्या दृष्टीनें बघेल.

सुधारलेल्या फॅशनेबल हिंदी स्त्रिया ( पृष्ठ १६४ ) भविष्य-कालीं ' नग्न सांप्रदायांत ' सामील होतील हें विधान पटत नाहीं. केशवानंदस्वामींना आपल्या हृदयांतच असलेला परमेश्वर दिसत नव्हता म्हणूनच ते नाभीं कस्तूरी बाळगणाऱ्या मृगाप्रमाणें रानींवनीं, गिरीकंदरीं, हिमालयांतून भटकत होते असें वाटतें. तें ज्ञान झाल्यावरच ते शेवटीं संसारांत पडले. गाणारीण बाईच्या वेळेचा त्यांचा प्रसंग,—त्यांच्या ठिकाणीं वसत असलेल्या परमे-श्वरानेंच सामर्थ्य दाखवून तिला क्षमा मागावयास लाविली व तिनें त्यांच्या पायांवर डोकें ठेवलें, यांचें,—चांगलें प्रत्यंतर आहे. व्यसन हें केव्हांहि वाईटच, तें अपायकारकच ठरणार. परंतु केशवानंदस्वामींच्या बाबतींत वाईटांतून चांगलेंच निघालें आहे. हिंस्रपशु व अघोर योग्याशीं त्यांनी केलेली लढाई याहि गोष्टी तशा व्यसनाधीन स्थितींतहि कौतुकास्पदच आहेत यांत शंका नाहीं.

शेवटीं, " नर्स सुंद्राबाई " ही एक जनतेचें अंतःकरण हालवून सोडणारी कादंबरी झालेली आहे असेंच मला वाटतें.

**अशा तऱ्हेच्या आत्मकथा म्हणजे समाजरूपी नौकेला, खडकावरील दिव्यासारखा इषारा देणाऱ्याच आहेत.** ही हृदयस्पर्शी व स्वतंत्र कादंबरी लिहून श्री. करंदीकरानीं मराठी साहित्यांत एका मार्गदर्शक व बोधप्रद कादंबरीची भर टाकली आहे, असेंच मला वाटतें.

मुंबई, ता. १९ मे १९४१ } सौ. शारदाबाई पतंगे, 'कोविद'.



# हृद्गत

"...क्षीरसिंधूचिया तटा। पाणिया येती गजघटा। तेथ काय मुरकुटा। वारिजत असे ?॥ राजहंसाचें चालणें। भूतळीं जालिया शहाणें। आणिकें काय कोणें। चालावेंचि ना ?॥ "–श्री ज्ञानेश्वर.

प्रत्येकाचें जीवन ही एक रसभरित कादंबरीच आहे. परंतु खऱ्या कलावंताचें लक्षण हें आहे कीं, त्यास दिलेल्या कोणत्याही साधन-सामग्रींतून तो सोनें निर्माण करूं शकतो किंवा नाहीं ! ( " He turns everything into gold !" ) महाराष्ट्रात माझ्यामतें असे एकच साहित्यिक आहेत, कीं त्याना कोणताहि विषय दिला तरी ते त्याचें सोनें तयार करून दाखवितील ! ते साहित्यिक-किमयाकार म्हणजे श्री. नरसिंह चिंतामण केळकर हे होत. कलावंत आणि साहित्यिक तसें करीत असतो. मी माझ्या आयुष्यास त्या प्रयत्नांस वाहून घेतलेलें आहे. अर्थात् स्तुति निंदेची मला पर्वा नाहीं.

अशा प्रकारें प्रयत्न करूं लागल्यावर मी पहिले जें पुस्तक लिहिलें तें " मी दारुड्या कसा झालों ?" 'तेज', 'स्वराज्य', 'लोकमान्य ( मुंबई )' या दैनिक पत्रांतून माझ्या त्या लेखमालेचें तीनदां पुनर्मुद्रण झाल्यावर, नंतर पुस्तक प्रसिद्ध झालें. त्या पुस्तकाचें शत्रुमित्रानीं सर्वांनींच कौतुक केलें. ' पुरुषार्थ मासिक ', ' केसरी ', ' नवा काळ ', ' किर्लोस्कर ', यांनीं तर त्यास पुष्कळच पाठिंबा दिला. नामदार खेरांनाहि तें आकर्षक वाटलें !

त्यानंतरचा माझा दुसरा प्रयत्न ' उर्वशी '* कादंबरीचा. त्या कादंबरींत आगन्तुक, अनिमंत्रित व स्वप्रसिद्धीसाठीं हपापलेल्या, साहित्यिक शील नसलेल्या साहित्यिकाची प्रस्तावना बळजबरीनें त्यानें घुसडली नसती,–प्रस्तावनेचें आपलें 'चंबुगवाळें, ' त्यांत त्यानें टाकलें नसतें, तर ' लेखकाचें हृद्गत ' त्यांतहि स्पष्ट

---

* ' उर्वशी ' कादंबरीचा प्रथमावृत्तीचा हक्क प्रकाशकाकडे ' To print and publish ; to make known : proclaim ' एवढाच होता. अन्य कोणताहि हक्क त्याच्याकडे नव्हता, व नाहीं....सर्व हक्क हे शब्द त्यानें लबाडीनें घातलेले आहेत.

झालें असतें. परंतु माझ्या संमतिशिवाय परभारें ती कादंबरी प्रसिद्धिली गेली आहे. तरीसुद्धा कोंबडा झाकून ठेवून सूर्य उगवूं न देण्याच्या प्रकाशकाच्या स्वार्थी कारवाया थंडगार पडून निःपक्षपातीपणानें 'महाराष्ट्र', 'नवा काळ' या सारख्या थोर पत्रांनीं जे तिचें कौतुक केलें, तेंहि उत्साहजनक मला वाटलें. व्यक्तिद्वेष ओकणाऱ्या विविधवृत्त, चित्रा आणि मौज यांच्या संपादकीय अभिप्रायात ' न्यूनगंड ' मात्र चांगलेंच दिसून आले ! लेखकाने आपलें पुस्तक त्याच्याकडे कधींच पाठविलें नव्हतें ! 'उर्वशी'ची मोहक द्वितीयावृत्ति काढली जात आहे, त्यावरून तिच्या कथाभागाची लोकप्रियता साहजिकच स्पष्ट होत आहे. हिंदी वेश्यांच्या जीवनावर स्वतंत्रपणे लिहिण्याचा उपक्रम मराठींतल्या भाषांतरित 'यामा'नंतर हा प्रथमच आहे.

तिसरा प्रयत्न ' नर्स सुंदराबाई ' या कादंबरीचा आहे. कादंबरी काय किंवा गोष्ट काय, त्यांतील प्रसंगांचा उगम प्रथमतः सत्यच असतो. ज्या स्त्रीपुरुषाचें आयुष्य गोष्टीसारखें आहे, एकाद्या नवलकथेसारखे, एकाद्या कादंबरीसारखें आहे, अशीं आयुष्यें अनंत आहेत. त्या स्त्रीपुरुषांच्या जीवनांतहि शृंगार, वीर, करुण, अद्भुत सर्व रसाची भरपूर सामग्री असते. ती शोधून काढणें एवढेच कलावंताचें काम असतें. ज्यांच्या जीवनांत क्रांति आहे, फार मोठ्या घडामोडी आहेत, चांगल्या वाईट गोष्टींची उलथापालथ आहे व जे स्त्रीपुरुष– मग ते श्रीमंत असोत किंवा गरीब असोत–आपलें जीवन प्रामाणिकपणें कथन करण्यास तयार आहेत, त्याचें ते सुखी अगर दुःखी जीवन मनःपूर्वक, श्रोता होऊन ऐकणें हा एक माझा तळमळीचा आणि आवडीचा विषय आहे. ज्यांचीं हृदयें दुःखीकष्टी आहेत, उत्साही आहेत, किंवा अनेक अघटित प्रसंगानीं खचून जाऊन संपूर्ण निराश झालेलीं आहेत, अशा स्त्रीपुरुषांची जीवनकथा ऐकून स्वतःची करमणूक करून घेणें, त्या प्रसंगांमुळें शिक्षण घेणें, स्वतःचीं दुःखें विसरणें, हाच माझा साहित्याचा विलास आहे. कोणाचा हेवादावा करण्याचा माझा मुळीच हेतु नाहीं.

कै० परमपूज्य श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांच्यासारखे थोर रसिक, श्रोते, गुणज्ञ, दुसरे मिळणें फार दुर्मिळ. माझ्या नशिबानें ते मला मिळाले होते. महाराजांच्या सहवासाचा माझ्या आयुष्यावर अत्यंत परिणाम झाला. ' गोष्टी सांगणें ' ही एक कला आहे, याचें विशाल अमर्याद स्वरूप त्यांनींच माझ्यापुढें उभें केलें ! गोष्टी सांगून मनरंजन करणें हा जो मार्ग मी

तत्पूर्वी स्वीकारला होता, त्यास त्यांनीं फारच उत्तेजन दिलें. हिंदुस्थानांत आधुनिक कालीं तरी ‘ गोष्टी सांगणें हा एक धंदा आहे ’ ही गोष्ट कै० महाराजांनीं प्रथमच हिंदुस्थानास दाखवून दिली. कै० महाराजाच्या बाबतींत राजरोसपणें जाहिरात फडकली असतां महाराजांच्या आजारीपणांत कोणीहि रा. फडके, खांडेकर अथवा श्री. जोशी किंवा गोकाकच्या घबघब्याप्रमाणें हांसविणारे अत्रे तेथें जाऊन आपल्या कलेनें महाराजांचे अंशतः ऋणी होऊ शकले नाहींत, ही फार आश्चर्याची गोष्ट आहे. त्यांनी तेथें आपण होऊन जाऊन महाराजांचें मन आपल्या कलेनें प्रसन्न करावयास पाहिजे होतें व आशीर्वाद घ्यावयास पाहिजे होता. महाराजांच्या मृत्युनंतर माझें अंतःकरण अत्यंत दुःखित झालें व माझेंहि आयुष्य म्हणजे ‘एक गोष्ट’च ठरली ! परंतु त्यानंतर मी प्रत्येक स्त्री-पुरुषाच्या जीवनाकडे गोष्टीच्या किंवा कादंबरीच्या दृष्टीनें अधिकाधिक पाहूं लागलों. त्या दृष्टीनें वास्तव जीवनाकडे पाहूं लागल्यावर हिंदुस्थानात विशाल साहित्य-समुद्र असून त्यांत तळाशीं अनेक मौल्यवान रत्नें आहेत, मोतीं आहेत, असें मला आढळलें. प्रत्येक स्त्रीपुरुषानें आपलें जीवन गोष्टीच्या रूपाचें, कादंबरीमय बनविलें, तर त्या स्त्रीपुरुष व्यक्ति स्वतः तर निःसंदेह सुखी होतीलच, पण त्यांच्या सुवर्णतुल्य अनुभवांनीं जगालाहि फार आनंद होईल, असें मला वाटतें. माझ्या भाषेविषयीचीहि गोष्ट तशीच आहे. मराठी ( मऱ्हाठी ) भाषा याचा अर्थच मुळीं अत्यंत सोपी, लहानापासून थोरापर्यंत समजणारी भाषा. तशी भाषा ठेवण्याचा मी प्रयत्न केलेला आहे. ‘मराठी’ शब्दाचा अर्थ तसा श्रीज्ञानेश्वरांनीं केलेला आहे. जास्तीत जास्त सोपी, सुबोध,—ती ‘मराठी भाषा.’

नर्स सुंद्राबाईचें व स्वामी केशवानंदांचें जीवन ऐकून मला तें एकाद्या कल्पित कादंबरीपेक्षां अधिक सुरस, आकर्षक वाटलें. प्रेमाचे गुलाब, तारे आणि समुद्राचे शंख बघून सर्वांची भूक भागणारी नाहीं. नुसत्या गुलकंदानें भूक कशी भागेल ? फुलांबरोबर धान्यहि पाहिजेच. प्रथम धान्यसंग्रह पाहिजे, मग विलास, प्रेम, गुजगोष्टी व सुरसुरी ! धान्यसंग्रहाचें किती महत्त्व आहे तें सांसारिक जनांना सांगण्याची आवश्यकता नाहीं. ज्यांना हॉटेलांत राहण्याची व जेवण्याची इच्छा आहे, त्यांना ‘धान्यसंग्रह’ नको असणार हें उघडच आहे. पण त्यांच्याहि जीवनांत धान्यसंग्रहाची वेळ कधींतरी आल्यावांचून राहणार नाहीं ! अन्य कोणत्याहि कादंबरीकाराशीं माझी तुलना करूं नये; व तशी माझी स्वतःचीहि मुळींच इच्छा नाहीं. प्रत्येक लेखकानें, आपापल्या वैशिष्ट्यानें

चमकावे, नांदावें, हेंच उत्तम. परभाषीय वाङ्मय किंवा संस्कृत वाङ्मय या दृष्टीनें आदर्श आहे. वाचकांनीं विकत घेतलेल्या साहित्यापासून त्यांच्या जीवनाला प्रत्यक्ष थोडा तरी उपयोग व्हावा, अशी माझी उत्कट इच्छा आहे. व केवळ मध आणून देण्याचे, मधुकराचेंच काम मी करीत आहे!

प्रस्तुत कादंबरीची छपाई फार त्वरित गतीनें, निरलसपणाने आणि अत्यंत मोठ्या मनाची व अंतःकरणाची वागणूक गिऱ्हाइकाशीं ठेवून करून दिल्या-बद्दल श्रीयुत **जयरामपंत देसाई** (मुद्रक 'राष्ट्रवैभव प्रेस') आणि त्याच्याशीं माझ्या नवीन परिचयाचा, व्यावहारिक प्रेमळपणाचा दुवा जोडून देणारे प्रख्यात बोलपट कथालेखक श्री. **शिवरामपंत वाशीकर**, या उभयताचा, मी अत्यत ऋणी 'आहे. लेखकाशीं उभयताचे असलेले सहकार्य निःसंदेह वाखाणण्याजोगे आहे.

प्रस्तावना-लेखिका सौ. **शारदाबाई पतंगे** 'कोविद' याचाहि मी ऋणी आहे. त्यानी निस्पृहपणे माझ्या पुस्तकास प्रस्तावना लिहून दिली व गुणदोष दाखवून दिले, त्याबद्दल त्याचेहि मी आभार मानतो. स्वामिजींच्या चरित्रा-बाबत त्याचे शिष्य श्री. **साळगांवकर** (माटुंगा) याची व श्री. **मोरेश्वर मंगळेशेठ**, मुबई याची फारच मदत झाली आहे याबद्दल त्याचाहि मी फार आभारी आहे. कोणत्याहि प्रकारचा व्यक्तिद्वेष किंवा पक्षपातीपणा यांची दृष्टि न ठेवून साहित्यिक परीक्षकानीं आपल्या कोणत्याहि रंगाच्या चष्म्यातून नर्स सुद्राबाईकडे (कादंबरीकडे) पहावे, अशी मी त्यानाहि विनंति करून हे हृद्गत-निवेदन पूर्ण करतो.

मुंबई
(२७।५।१९४१)

साहित्यिकांचा व रसिकांचा
नम्र सेवक,
**शंकर दिनकर करंदीकर.**



# नर्स सुंदराबाईचें पत्र

वसई

ता. २८-३-१९४१

वर्षप्रतिपदा

चि. रा. शंकर दिनकर करंदीकर, मुंबई

यांसी

आशिर्वाद वि०—

मी माझ्या आयुष्याची सर्व सत्य हकिकत तुम्हास समक्ष सांगून त्याचें " नर्स सुंद्राबाई " या नांवाचें पुस्तक तयार करविलें आहे. त्यांतील सर्व हकिकत खरी असून केव्हांही गंगेंत उभी राहून पुनः ती सांगावयास मी तयार आहें. त्यांतील माझ्या पतिसंबंधीची सर्व हकिकत सत्य आहे. मी त्यांची विवाहित पत्नी असल्यामुळें जें सत्य तेंच सांगितलें आहें. माझी कहाणी म्हणजे 'तावून सुलाखून निघालेले तप्त सोन्याचे अनुभव आहेत ! अग्नींत होरपळून निघालेल्या जीवाचे-अबलेचे ते विचार आहेत !' प्रत्येक आर्य स्त्रीला ते मार्गदर्शक होवोत ! कळावें, हा आशीर्वाद.

आपली,

नर्स सुंद्राबाई

# नर्स सुंद्राबाई

## प्रकरण १ लें

( नर्स सुंद्राबाईनें सांगितलेली हकिकत )

## " वैधव्याचा डोंगर कोसळला ! "

माझा जन्म झाला मुंबईत ! मी मोठी झाले गोव्यामध्यें ! विवाह होऊन नादायला आले पुण्यात; वैधव्यहि आले पुण्यातच. ख्रिश्चन होऊन अमेरिकेला गेले; तेथें आठ वर्षे काढलीं; इंग्लंडमध्येहि एक वर्ष वास्तव्य केलें; आणि शेवटीं पश्चात्ताप पावून हिंदुस्थानात पुनः आलें ! मनांत संकल्प केला, कीं, " मी जन्मानें हिंदु, माझीं हाडे, माझी रक्षा हीं गंगेंत पडलीं पाहिजेत ! " त्या संकल्पाच्या बळानेच मी हिंदुस्थानात आलें. पण हिंदुस्थानात येऊन, मला सुखाचे दिवस लाभले नाहींत. ख्रिश्चन झालेली मी, पुनः हिंदु कशी होईन, हा फारच महत्त्वाचा प्रश्न होता. त्यातून मला एकटीला तरी हिंदु व्हावयाचें होतें काय ? नाहो ! मला एक मुलगा होता; दोन सुंदर मुली अमेरिकेंत जन्म पावलेल्या होत्या; त्या मुलाच्यासह, मला पुनः माझ्या प्रिय हिंदुधर्मांत यावयाचें होतें !

माझें सर्व आयुष्यच अद्भुत, शृंगार, करुण, वीररसानें भरलेलें; तसें आयुष्य हिंदुस्थानांतील माझ्याशिवाय दुसऱ्या स्त्रीनें क्वचितच अनुभविलेलें असेल ! आणि मी नित्य, परमेश्वराजवळ प्रार्थना करत्यें आहे, कीं, मी माझ्या आयुष्याचा निर्मल आरसा, माझ्या बंधु-भगिनींच्यापुढें धरला आहे; त्यांत त्यांनीं आपलेंहि रूप पाहवें; आणि माझ्यासारखा संकटाचा, दुःखाचा, पश्चात्तापानें दग्ध होण्याचा प्रसंग, त्या माझ्या प्रिय भगिनींच्यावर तरी, जन्मजन्मांतरींहि न यावा. स्वधर्मांत मृत्यु आला तरी पत्करला, पण परधर्मांत

राणीचे, इंद्राणीचे ऐश्वर्य मिळाले, तरी ते नको, ही शिकवण माझ्या हृदयांत बिंबली आहे. पाण्यांतली मासोळी पाण्यांतच राहिली पाहिजे; तरच ती सुखी होईल. तुपाच्या समुद्रांत ती गेली, तरी तिला जगता येणार नाहीं, ती मृत्युच पावेल. तीच गत माझीहि झाली. आतां पश्चात्तापाने शुद्ध झाल्यावर, हे माझे जीवनचरित्र मी लिहितें आहे; आणि जें सत्य, तेंच लिहितें आहे.

पुरुषाचें भाग्य आणि स्त्रीचे चरित्र, हें ब्रह्मदेवालाहि जाणता येणार नाही, ही गोष्ट अगदीं खरी आहे. आमच्या घरात दारिद्र्य नसतें, तर आमचे कुल उच्च असूनहि, बाबानी माझे लग्न म्हाताऱ्याशी कशाला लावून दिले असते ? पण, मी माझ्या बाबांना दोष देण्यापेक्षां, मी माझ्या हातातील रेषानाच, माझ्या कर्मालाच अधिक दोष देते. कारण पुढें घडणाऱ्या गोष्टी जर माझ्या नशिबीं मला भोगावयाच्या होत्या, तर, त्या, बाबाना किंवा मला कशा टाळता येणार होत्या ? बुद्धिनुसार हातून कर्म घडत गेले; कर्म जसे झालें, तसें मला त्याचें फळ मिळालें ! यांत कोणाचाच दोष नाहीं ! दोष सर्वस्वी माझ्या प्रारब्धाचा !

माझ्या बाबांना आम्ही ९।१० मुलीच होतों; हुंडा देण्याचे बाबाना सामर्थ्य नव्हतें. हुंडा नाहीं, तर श्रीमंत स्थळें तरी आम्हाला कुठून मिळणार ? गरीबांच्या मुलींच्या कपाळीं, वृद्ध नवरेच फार; निदान बिजवर, तिजवर तरी तो असावयाचाच. तोच अनुभव आपल्या समाजात अधिक.

माझें लग्न बाबांनी कसें केलें, ती गोष्ट फारच गंमतीची आहे. शारदा नाटकाचें उदाहरण आणि माझ्या बाबांचें उदाहरण अगदीं एकच म्हटले, तरी मला मुळींच राग येणार नाहीं ! द्रव्यलोभ हा फार वाईट. बाबांना 'द्रव्यलोभ' उत्पन्न झाला होता ! द्रव्यलोभापुढें त्यांनी माझ्या सासारीक जीवनाची काळजी केली नाहीं. जांवयाचें—जामाताचें कांहीं बरें वाईट झालें, तरी मुलीला अन्नवस्त्राची ददात पडणार नाहीं, एवढेंच त्यानी पाहिलें आणि त्यानी मला, लौकरच प्राप्त होणाऱ्या वैधव्याच्या वणव्यांत ढकलून दिली ! कारण, मला वरणारे माझे पतिराज होते, तेव्हां अवघे ४५ वर्षांचे तरुण; आणि मी होतें, अवघी १० वर्षांची प्रौढ बालिका !

बाबाना 'द्रव्यलोभ' कसा उत्पन्न झाला, तो वृत्तात मजेदारच आहे! माझ्या आजोबांना एकदां एक द्रव्याचें भयंकर स्वप्न पडलें; त्या स्वप्नांत त्यांनी आपल्या घरांत एक द्रव्यानें भरलेला प्रचंड हंडा पाहिला. जागृतींत आल्यावर आजोबा त्या हंड्याच्या शोधास लागले. जागा त्यांना अगदी बरोबर सापडली. दुसऱ्या कोणास थाग लागूं नये म्हणून, त्यांनी गुप्तपणें एकट्यानेच हंडा भूमितून काढण्याचा प्रयत्न चालविला. खणता खणता त्यांच्या प्रयत्नाला यश आलें; कुदळीला हंडा लागून त्याचा मधुर आवाज त्याच्या द्रव्योत्सुक कानावर पडला; थोड्याच वेळात हंडा संपूर्ण त्याना दिसला. झाकण त्यानी उघडून पाहिले, तो हंडा सोन्यारुप्याच्या नाण्यांनीं तोंडोतोंड भरलेला! ते कधीं पूर्वी न पाहिलेले—कल्पनातीत द्रव्य, आजोबाच्या एकदम दृष्टिस पडताच, ते द्रव्यवेडे झाले! त्यांची शुद्ध उडाली; आणि त्यातच त्याचा शेवटीं अंत झाला! त्या वेळीं माझे बाबा मुंबईस लहानशा नौकरीवर होते. आपल्या बाबांना द्रव्याचा हंडा लागला आहे, ही वार्ता माझ्या बाबाना समजतांच, नौकरी सोडून, ते गोव्यास गेले; व तेथे जातांच, त्यानाहि द्रव्याचे वेड लागलें! खरोखरी द्रव्याचा हंडा सापडला होता किंवा नाहीं, हें मला कांहींच ठाऊक नाहीं; पण आजोबाच्या पश्चात् द्रव्यामुळे बाबाचेहि डोकें भ्रमल्यासारखें झालें होतें, एवढी गोष्ट खरी. तशाच स्थितींत, गोव्यात नुकत्याच सुरू झालेल्या रेल्वेमध्ये लहानशी नौकरी पत्करून, ते आमच्या कुटुंबाचा कसातरी सांभाळ करीत होते. त्या स्थितींत मी लग्नाला आलेली होते. त्यावेळीं मुलीला दहावें वर्ष, म्हणजे मुलीच्या बापाला बाहेर समाजात तोंडहि काढता यावयाचें नाहीं. पण माझ्या बाबाच्याजवळ हुंडा देण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें माझें लग्न, '८ वर्षाच्या कायद्यास' धरून झालें नाहीं!

हजार गाई एकत्रित असल्या, तरी प्रत्येक गाईचें वासरूं जसें आपल्या आईला अचूक शोधून काढते, त्याप्रमाणें माझे नशिब, माझें गतजन्मीचे कर्म, मला अचूक शोधून काढण्याच्या प्रयत्नात होतें!

रूपानें मी सुंदर होतें; माझें नांवहि 'सुंदर'च; होतेंहि मी सुंदर! मुंबईस आमचें बिऱ्हाड असतांना माझ्या बाबांचे एक स्नेही होते; त्यांच्या ध्यानांत, माझ्या

रूपामुळें, मी पक्की राहिलें होते. त्या स्नेह्याचा एक श्रीमंत जहागिरदार स्नेही होता; त्याला तिसरें लग्न करावयाचें होतें. पूर्वसंतति त्यास होतीच. संततिकरतां लग्न होतें अशी गोष्ट नव्हतीच. मुंबईच्या त्या स्नेह्यानें माझ्याबद्दल माझ्या बाबांच्याजवळ, त्या वृद्ध धनाढ्य वराच्या स्थळासाठीं फार गळ घातली; आणि मुलींच्या चिंतेनें ग्रस्त झालेल्या माझ्या बाबानी, मला, त्या, वयानें वृद्ध आणि धनानेंहि वृद्ध, अशा श्रीमंतास देण्याचा ठाम निश्चय केला.

माझ्या भावी सासुबाई जेव्हां मला पहायला आल्या, तेव्हां मी त्यांना फारच लहान दिसलें. तेव्हां त्या माझ्या बाबाना म्हणाल्या, " या मुलीचें वय फारच लहान आहे; तेव्हा तें दहा वर्षांचें न सांगतां, निदान ११ वर्षांचें तरी सांगा; म्हणजे मुलाच्या मानानें मुलगी बरीच मोठी आहे,—' मोठीच मिळाली.' असें, लोक म्हणतील!" असें समाजाचें भय तेव्हा माझ्या सासुबाईना वाटत होतें. त्याप्रमाणें पत्रिकेंत योग्य तो फेरबदल होऊन माझें लग्न ठरलें! माझ्या भावी सासुबाईनी दागदागिन्याचा मला मोठा एक पितळेचा डबा उघडून दाखविला! ते विपुल नानाविध जिन्नस पाहून बाबा थक्क झाले. मीहि पण त्या अलंकारांच्या दर्शनानें स्तंभित झालें. कारण, तेव्हा मला वाटत होते, 'लग्न करणें म्हणजे पुष्कळ जिन्नस अंगावर घालावयास मिळणें, एवढेंच! दागिने म्हणजेच पति. जणुं कांहीं माझें लग्न, त्या दागिन्याच्या डब्याबरोबरच लागावयाचें आहे!'

मी तेव्हा निष्पाप होतें, निरपराधी होतें. माझ्या गळ्याला मंगळसूत्राचें दावें लावून बाप ज्या कसायाच्या स्वाधीन मला करील, त्याच्या मागोमाग ' पत्नि ' म्हणून मुकाट्यानें, वधस्थानाकडे जावयाचें, एवढेंच तेव्हा मला समजत होतें! आणि त्याप्रमाणेंच मी वागलें.

म्हातारा नवरा मला मिळाला, पण मी श्रीमंतींत पडलें! श्रीमंतपतीची खरोखरी भाग्यानें राणीच झालें. ४५ आणि १० यांची वजाबाकी ३५ होते; इतकें थोडें अंतर आमच्या दोघांच्यांत होतें; आणि मी संसार करीत होतें! बाबानीं माझें लग्न म्हाताऱ्या नवऱ्याशी मुळींच लाविलें नव्हतें, त्यांच्या, म्हणजे माझ्या पतिच्या अफाट जमीनजुमल्याशी, अलोट संपत्तिशी, मोठ्या थोरल्या इस्टेटीशी लाविलें होतें, असेंच आतां मी म्हणतें.

संसार करायला लागलें, आणि अवघ्या १५ व्या वर्षीच मला पहिला मुलगा झाला. १७ वें वर्षी दुसरा मुलगा झाला. आणि पुढें सुमारें ३ च वर्षांनीं, म्हणजे माझ्या वयाच्या विसाव्या वर्षाच्या प्रारंभींच, माझ्यावर वैधव्याचा डोंगर कोसळला! तिसरा मुलगा ६ महिन्यांचा असतांना, घशात द्राक्ष अडकून वारला!

सावत्र मुलगे आणि माझे पतिराज यांच्यांत माझ्या कारणानें इस्टेटीचे तंटे सुरू झाले होते; पतिराजाचें माझ्यावर अत्यंतिक प्रेम होतें; त्याच्या मनांतून सावत्र मुलाना कांहीं थोडी इस्टेट देऊन सर्व इस्टेटीचें वुइलपत्र माझ्या नांवानें करावयाचें होतें; त्याप्रमाणें सर्व कांहीं ठरलें होतें; व दुसरें दिवशीं माझ्या नांवचें वुइलपत्र होणार, तोच आदले दिवशीं त्यांचें,–माझ्या पतिराजांचें,–भयंकर रीतीनें देहावसान झालें! मागाहून कोणी म्हणत कीं, 'वुइलपत्र' होऊं नये म्हणून कोणी तरी दुष्टाव्यानें, त्याना औषधातून विष घातलें, आणि माझ्या पतिचा मृत्यु झाला! किती तो माझ्यावर भयंकर प्रसंग होता. अशा रीतीनें मी अल्पवयात तीन मुलांची माता होऊन, बालविधवा ठरलें!

पण तो बालवैधव्याचा प्रसगहि मी कसा तरी पुढें सहन केला असता, पण त्याहूनहि त्याच वयांत, मी मिशनऱ्याच्या जाळ्यांत कशी सांपडलें, इस्टेटीची अपूर्व घटना भविष्यकाळीं अतर्क्य रीतीनें कशी घडली, मला सुखाचें मृगजळ आणि मनोराज्य दाखवून कसें प्रलुब्ध करण्यात आलें; "माझें वपन ऐन तारुण्यात करून परत मला हिंदुधर्मांत घ्यावें," म्हणून साक्षात् श्रीशंकराचार्यांनीं आज्ञा करून कसें सांगितलें; त्या घोर राक्षसी विधींतून मी कशी सुटलें, बाबाचा आईचा त्याग रागानें मी कसा केला, आगींतून निघून फोफाट्यांत कशी पडले, खिश्चन पतिशीं माझा संबंध कसा आला, तो अपूर्व, रोमांचकारी, कादंबरीसहि मागें टाकणारा रसभरित कथाभाग मी पुढील प्रकरणांत सागेन!

## प्रकरण २ रें



# गुप्त वेषानें प्रयाण !

वैधव्य प्राप्त झाल्यानंतर मन फार उदास होऊन गेले. दोन मुलगे लहान. घरांत इस्टेटीकरतां भाऊबंदकी, यामुळे, ज्या घरांत मी सौभाग्यकाळीं सुखासमाधानानें नांदत होतें, तेंच घर मला खावयास उठलें ! माझ्या पतिचें माझ्यावर अत्यंतिक प्रेम होतें, हें मी पूर्वी सांगितलेंच आहे. माझ्या पतिराजाना प्रथम ३० रुपये पगारावर नौकरी लागून ते शेवटीं सातशे रुपयांच्या हुद्यावर चढले होते. अशा मोठ्या व्यक्तिची-रावबहादुराची-मी पत्नि होतें. माझ्या शिक्षणाकरता पतिराजानी फारच उत्तम व्यवस्था केली होती. मला इंग्रजी शिकविण्याकरतां त्यांनी एक अमेरिकन मिशनरी तरुणी, शिक्षकीण म्हणून ठेवलेली होती. सौभाग्यकालात तिच्याकडून मी शिक्षण घेत होतें. तिचें नाव मिस् बर्नार्ड. स्वभावानें ती फारच चागली होती. पतीनी आपल्या मृत्युपूर्वी एक बहुमोल किंमतीची आगठी माझ्या हातात घातली होती. इस्टेट तर विपुल होती. त्यांच्या पश्चात् नुसती त्यांच्या खिशातील डायरी मी उघडून पाहिली, आणि त्यानी लोकांना हातउसनवार म्हणून जे कांहीं पैसे दिलेले होते, त्यांचा जेव्हा मी सहज हिशेब केला, तेव्हां तो हिशोबच आठ हजार रुपयाहून अधिक झालेला होता. ती त्याची डायरी आणि त्यांचे कांहीं अन्य जिन्नस हे मी पुढें दीर्घकाल जपूनहि ठेवले होते पण एकंदरीत, त्याच्या मृत्यूनें माझें मन, माझ्या सर्व इस्टेटीवरून उडून गेलें होतें. त्या क्षणीं तरी मला वैराग्यच प्राप्त झालें होतें. पतिनिधनानें कोणत्या स्त्रीला वैराग्य प्राप्त होत नाहीं ? तीच गत तेव्हां माझीहि झाली होती

ते वारले तेव्हा बाबा माझ्या घरीं, पुण्यास, आले होते. क्रियाकर्मांतराचे दिवस संपतांच त्यांनी मला आणि माझ्या दोन लहान मुलांना गोव्यास नेण्याचें ठरविलें. मलाहि त्यांच्याबरोबर घरीं जावेसें वाटलें; आणि इस्टेटीची कांहींहि विचारपूस न करतां, सावत्र मुलें व मुली आणि त्यांचा मामा, यांच्य स्वाधीन ती करून मी बाबांच्याबरोबर गोव्यांत गेले.

पण माझ्या नशिबातले सुख संपलें होतें. विधवेचें–बाल विधवेचें जीवन कंठण्याची माझ्यावर पाळी आली होती. शिवाय, आजच्यासारखें का, त्या वेळचें विधवांचें जीवन होतें ? आतांच्या कालांतील विधवा, मी अधिकच भाग्यवंत समजतें. कारण, आतां काल त्याना अनुकूल आलेला आहे; रूढीचीं छकलें उडत आहेत. तेव्हां पतिमृत्युनंतर ती विचारी स्त्री, जगाच्या दृष्टिपासून दूर, काळोखात घराच्या एकाद्या अडगळीच्या कोपऱ्यांत असावयाची ! सूर्यदर्शनसुद्धां तिला क्वचितच. शिवाय, तेंहि खरेंच नाहीं काय, कीं, सौभाग्यचंद्राला वैधव्याच्या राहूने गिळून टाकल्यावर त्या स्त्रीच्या जीवनांत अंधार न होईल तर काय होईल ? ती तेव्हाची बालविधवा जगाच्या दृष्टीनें महा पापी, स्पर्शाला अशुद्ध, सेवेला अमान्य, श्रुतिस्मृतींनीं बहिष्कृत केलेली; पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश यांनीं तिचा त्याग केलेला ! हिंदुसमाजात तिला कुठे जागाच नाहीं ! घरांतील तिच्या अत्यंतिक विडंबनानंतर, तिचें केशवपन करून तिला विद्रुप करून टाकल्यानंतर, तिला जें ऐश्वर्य मिळतें, जें इंद्रपद प्राप्त होतें, ते चुलीचें–चुलखंडाचे !

पतिराज हयात असतांना माझ्याकरतां नौकरचाकर, शागीर्द कुळंबिणी यांची रेलचेल होती. मला पतिराजानी अगदीं तळहातावरच्या फोडाप्रमाणें जपून ठेवली होती म्हटलें तरी चालेल. म्हणून पतिनिधनानंतर दुःख भोगणें, यातना सहन करणें मला फार कठिण गेलें. मी बाबाच्याबरोबर घरीं गेले, पण फारच थोड्या दिवसात बाबांचें माझे पटेनासें झालें. माझे सारें लक्ष तेव्हा माझ्या दोन लहान मुलांच्याकडे होते. कारण, आता माझे आधार ते फक्त दोन मुलगेच. ते माझे दोन लहान मुलगे म्हणजे माझे दोन डोळे ! डोळ्यासारखेच ते सुंदर, नाजुक. आपल्या डोळयाना मनुष्यप्राणी किती जपतो ? तसेंच मी त्यांना जपत होते. माझ्या डोळ्यातील दोन प्राणज्योती म्हणजे तीं दोन मुलें. पण बाबांना त्यांचें काय होय ? बाबांच्या घरीं दारिद्य्र होतें; तेथें मी येऊन पोचतांच माझें ऐश्वर्य, माझें सुख, माझा ऐषआराम सर्व कांहीं अधिकच नष्ट झालें. बाबा माझ्या त्या दोन लहान मुलाची फारच हेळसांड करूं लागले. ते त्या माझ्या अजाण अर्भकांना म्हणूं लागले, "आतां ती सारी पूर्वीची श्रीमंती, तें तुमचें श्रीमंती खाणेंपिणें, नौकरचाकर, शागीर्द आणि पाणके,

सर्व काहीं आतां, तुम्ही विसरून जा! आतां तुमचे नौकर, शागीर्द, स्वयंपाकीण मोलकरीण, सर्व कांहीं तुमची आई! तीच तुमची सेवा करणार!"

मुलांनीं एकादे वेळीं केळें खावयास मागितलें, तरी बाबा त्यांना टोचून बोलत; तें दुःख मला अगदीं असह्य होई. सासरहून निघतांना मला असे वाटत होतें, कीं, बाबा माझी, माझ्या इस्टेटीची कांहींतरी योग्य व्यवस्था करून, मला योग्य मार्गाला लावतील. पण मी एकपट उदास, तर बाबा दसपट उदास! सर्व अपयशाचे, दुःखाचें, पायगुणाचे, खापर त्यानी माझ्यावरच फोडले.

त्या वेळीं माझी कोणी वाली असेल, तर ती माझी भोळी आई. बाबांच्या गैरहजेरींत, ते घरीं नसतील तेव्हा, ती मला बरें वाटावें म्हणून पुष्कळच माझ्याशी बोलत असे. माझ्यावर कोसळलेल्या दैवी दुःखानें, तिचेहि हृदय करपून गेलें होतें. घरांत तिचें माझें एकमत असे; विरोध मला फक्त बाबांचा. अशा रीतीनें वैधव्यप्राप्तिनतर २ वर्षांचा काल मी गोव्यास, माझ्या माहेरीं काढला.

पण माहेरीं असे किती दिवस काढावयाचे? सर्व आयुष्य? आणि त्या दीर्घ आयुष्याला तरी कांहीं पत्ता होता काय? उलट विधवा बालविधवा दीर्घायुष्याच्या, सुदृढ प्रकृतीच्याच फार असतात. त्यांना गीतेत सांगितल्या-प्रमाणें अग्नि जाळूं शकत नाहीं; पाणी बुडवूं शकत नाहीं! शस्त्रें त्यांचा वध करूं शकत नाहींत, तीं बोथट होतात! आजार उपद्रव त्या विधवांच्यापासून हजारों योजनें दूर पळतात; पूर्वी सौभाग्यकालीं केळीसारखी नाजुक असणारी, कोमलतनु दिसणारी ती स्त्री, वैधव्यप्राप्तिनंतर जगाला हत्तिसारख्या बळाची, काटक, शूर शिपाई गड्यासारखी, पाषाणाहून बळकट, कठिण, वज्रासारखी दिसूं लागते. गरीब बालविधवा म्हणजे पोलादाची घडविलेली मूर्ति आहे, असें सर्व जगाला वाटतें! समाज तिला तसें म्हणतो. खरोखर, हें तिच्यांत केवढें स्थित्यंतर घडतें! पण मी तरतें पोलाद नव्हतें! मी त्या गोष्टीस अपवाद होतें; श्रीमंतींत मी वाढलें होतें. तें चुलीजवळचें घरांतील राज्य मला पसंत नव्हतें.

पतीच्या हयातींत मला ज्ञानाची गोडी लागलेली होती. विद्या संपादन

करण्याची मला फार हौस होती. मनांत राहून राहून एकसारखें येत होतें, कीं, "असें जन्मभर कानाकोपऱ्यांत, वैधव्याचा विचार करून अश्रु गाळण्यांत, निरुपयोगी झालेलें आयुष्य घालविण्यापेक्षां, आपण पूर्वींप्रमाणे पुढें शिकलो, तर बरें नाहीं का होणार? अजून माझ्या शिक्षणाचा काळ आहे!" मनात तो विचार मी आणून, लगेच आईलाहि सागितला. आईला मी दुःखानें म्हटले, "आई! असे दिवस कंठण्यापेक्षां कांहीं शिक्षण घ्यावे, कांहीं कला संपादन करावी, आणि त्यांत मन रमवावें, असें मला वाटतें. शिक्षण घेण्याइतपत अनुकूलता, मला निःसंशय आहे; मी शिकावे, ज्ञानार्जन करावे, असें माझें मन मला सागते."

भोळीभाबडी आई माझे समाधान करीत म्हणाली, "तुझा विचार मुळी-सुद्धां अनुचित नाहीं. तुझ्या वडिलांना जरी ही गोष्ट पसंत पडली नाहीं, तरी मला तुझी योजना पसंत आहे. तूं शिक्षण घे. त्यामुळेहि तुझ्या मनाला बरें वाटेल; तू सुखी होशील."

आईच्या त्या उत्तराने तेव्हां मला बरें वाटले. बाबांना मी चक्क सांगितलें, कीं, "मला तुम्ही परत पुण्याला पाठवा. मी तेथेंच राहून शिक्षण संपादन करीन. विधवेला ज्ञानाचाच आश्रय पाहिजे. अजून मला जगात पुष्कळ आयुष्य काढावयाचे आहे. अज्ञानी, अडाणी विधवा, समाजाला, घरादाराला जड आहे, भारभूत आहे, दुःखदायक आहे. तशी मी तुम्हाला बोजारूप, जड होऊं नये, अशी माझी इच्छा आहे."

मी जर गरीब असते, सासरचें मला काहीं नसते, अगावर दागदागिने नसते, सासरचा मायावी कांचनमृग बाबाना दिसत नसता, तर बाबानी एक काम सांगितल्यावर, गरीब विधवेप्रमाणें मुकाट्याने दहा कामें पडतील तीं करून, बाबांच्या घरीं राहणें भाग होतें. परंतु बाबांना संपत्तिच्या प्राप्तीची जेव्हा जेव्हां लहर येत असे, तेव्हा तेव्हां मी त्याना मूर्तिमंत लक्ष्मीच वाटत असे! तेव्हा त्याना असें वाटत असें, कीं, "मुलीच्या बाबतींत प्रयत्न केला तर पुष्कळ इस्टेट हाताशी निःसंदेह लागेल. निदान तिचे मुलगे सज्ञान झाल्यावर तरी, त्यांचा हिस्सा त्यांच्या भाऊबंदांच्यापासून खात्रीनें हिसकावून

घेता येईल; व आपण श्रीमंत होऊ!" त्यामुळें, मी एखाद्या गोष्टीचा हट्ट धरल्यावर ते माघार घेत. त्याचप्रमाणें याहीवेळीं झालें! पुण्यास मी स्वतः शिक्षणाकरतां जावयाचे, मुलांचेंहि शिक्षण तेथेंच करावयाचें, आपणहि ज्ञान संपादन करावयाचें, एवढा दृढनिश्चय त्यांना मी बोलून दाखविल्यावर, त्यांनी नाइलाज होऊन माझ्या विचारास सम्मति दिली, आणि पुण्यास माझी रवानगी केली.

त्यावेळीं तें सुधारणेचे युग होतें. सुधारक लोक, सुधारणेचे चंडोलगीत गात होते. त्या गीतलहरींनीं देश दुमदुमून गेला होता. सगळीकडे तोच सूर निघत होता. मोठमोठे कर्तबगार पुरुषहि सुधारणेचे गोडवे मुक्तकंठानें गाऊं लागले होते. स्त्रियांना शिक्षण दिलें पाहिजे, निदान बालविधवाचा प्रश्न कळकळीनें सोडविला पाहिजे, असे सर्वांना वाटू लागलें होतें. त्या वेळीं न्यायमूर्ति रानडे, परमपूज्य भाडारकर याच्यासारखे थोर लोकहि, उघड उघड स्त्रियाच्या सुधारणेच्या पुरस्कारास लागले होते. किंबहुना त्यांनीं त्या कृतीस प्रत्यक्ष आरंभहि केला होता. अशा कालांत आणि यौवनदशेंत, पुनः मी पुण्यांत पाऊल टाकले.

त्यावेळीं पंडिता रमाबाईचा गाजावाजा फार झाला होता. सर्वत्र तिचीं स्तुतिस्तोत्रें गाइलीं जात होतीं. विधवा, बालविधवा, अनाथ स्त्रिया, आणि त्यांतल्या त्यांत उच्च कुलातील, श्रीमंत अशा बालविधवा, याच्या सुधारणेच्या प्रश्नास, त्यांच्या उद्धाराच्या प्रश्नास, तिनें "High Class Widows' Home" काढून जोरानें चालना दिली होती. त्यावेळीं पंडिता रमाबाई म्हणजे पूर्वेकडील शुक्राची चांदणी, किंवा चंद्राची शुक्लपक्षांतील कोर होती म्हटलें तरी चालेल. तिच्याजवळ संपत्ति विपुल होती. मिशनऱ्यांचा तिला भरपूर पाठिंबा. आणि हिंदुस्थानांत तिचें कार्य नवीन, त्यामुळें ती तेव्हां, ज्याच्या त्याच्या तोंडीं झाली होती. परंतु मनुष्याचें, मग ती व्यक्ति पुरुष असो कीं स्त्री असो, तिचें सार्वजनिक आयुष्य आणि खाजगी आयुष्य नेहमीं भिन्न आढळतें; किंबहुना विपरीतताच त्यांत अधिक अनुभवास येते; तीच गोष्ट मला पंडिता रमाबाईच्या बाबतींत चांगली अनुभवास आली.

हौसेनें मी पंडिता रमाबाईच्या ‘ शारदा सदन ’ नांवाच्या शाळेंत शिक्षण संपादनार्थ जाऊं लागले. सदनामध्येंच मी रहात असें. माझ्याशिवाय सदनांत राहूनच शिक्षण घेणाऱ्या, श्रीमंत, अशा पुष्कळच, सुस्वरूप बालविधवा तेथें होत्या. त्या प्रत्येक बालविधवेची कहाणी म्हणजे एकेक स्वतंत्र इतिहासच होईल; म्हणून मी माझ्यापुरतेंच सांगतें ! माजरीचीं नखें जशी एकदम कधीं बाहेर दिसावयाची नाहींत, किंवा बाहेर स्पर्शास लागावयाचीं नाहींत, तीच स्थिति कारस्थानी मिशनऱ्याची, आणि त्यांच्या कार्याची होती. परंतु ही कल्पना मला त्या माझ्या बालवयांतच जर आली असती, किंवा कोणी नीट समजावून दिली असती, तर आज हा माझ्या आयुष्याचा क्रांतिकारक इतिहास लिपिबद्ध करण्याचा प्रसंगच माझ्यावर आला नसता !

परंतु, संस्काराचें महत्त्व, हे, फार मोठें आहे. संस्कार काढून टाकण्याची वेळ, तो संस्कार करून घेण्यापूर्वींच ! तीच खरी त्यागाची आणि संयमाची वेळ. पतिराजानी मला खिश्चन मास्तरीण ठेवून माझ्या बालमनावर आधींच एक न कळत संस्कार करून ठेवलेला होता. त्यावेळीं मी पुढें अशी खिस्ती होईन, धर्मांतर करीन, हजारो मैलांचा समुद्रप्रवास करून परदेशात वणवण भटकण्याचा प्रसंग माझ्यावर येईल, ही कल्पना तरी त्याना होती काय ? परंतु होणारे कधींच चुकणार नाहीं, अशी माझी अजूनहि दृढ समजूत आहे !

सदनांत प्रथम प्रवेश केल्यावर, एका दृष्टिनें माझ्या मनाला फार आनंद झाला. तेथलें वातावरण उच्च प्रकारचें, सुसंस्कृत आहे; भक्तिचें, प्रेमाचें वातावरण आहे, असे मला प्रथम अनुभवास आले. परंतु मिशनऱ्याच्यात कोणती ठळक गोष्ट असेल, तर, सावज जाळ्यांत येईपर्यंत ते अगदीं तोंडात खडीसाखर धरून बोलतील. मधाचा लेप त्यांच्या ओठास राहील. पण अनुभवातीं त्यांच्या हृदयांत विष, नव्हे हालाहलच असतें, ही गोष्ट माझ्या. पुढील आयुष्यांत, मला पावलोपावलीं आढळून आली. पण आता त्याचा काय उपयोग ? स्त्रीचें आयुष्य म्हणजे परटाची घडी, ती एकदा का विस्कटली, म्हणजे पुनः नीट बसणें, आणि पूर्ववत् बसणें, अशक्यच.

पंडिता रमाबाई फार गोड बोली होती. तिनें आपल्या गोड वक्तृत्वकलेवर

परदेशांत व्याख्यानांचें व्यासपीठ काबीज केलें होतें. म्हणूनच परकीय मिशनऱ्यांनीं अशा उत्कृष्ट हिंदी स्त्रीची कुशलतेनें निवड करून, तिच्या हातात हिंदुस्थानच्या अडाणी, भोळया, मागासलेल्या हिंदी स्त्रियांच्या सुधारणेची ध्वजा अथवा पताका देऊन, तिला पूर्वेकडे पाठविलें होतें. पंडिता रमाबाईचा इतिहास म्हणजे एक निराळाच ग्रंथ होईल. पंडिता रमाबाईचें माझ्यावर अत्यंत प्रेम होतें. एक तर मी श्रीमंताची पत्नी, कुलीन स्त्री होते; त्याहून मी अति रूपवती होते. युरोपियन समाजांत मिसळण्यास मला कोणतीच हरकत नव्हती. आणि त्या रूपानें, आंग्लस्त्रीप्रमाणें भासणाऱ्या माझ्या रूपानेंच माझ्या सर्व आयुष्याची माती केली.

पंडिता रमाबाईवर तेव्हा त्या काळच्या सुधारक, श्रीमंत लोकाचा फार विश्वास होता. म्हणूनच त्यानीं आपल्या लेकीबाळी, सुना, बालविधवा, निर्भयपणें रमाबाईच्या स्वाधीन केल्या होत्या.

सुमारें दीड दोन वर्षे पंडिता रमाबाईचें अंतःस्वरूप मला नीट कळून आलें नाहीं. परंतु पुढें पुढें तिनें जो एक जोरदार कार्यक्रम आखला, त्यामुळे तिच्या माझ्यामधें विरोध उत्पन्न झाला.

पंडिता रमाबाई भल्या पहाटे कांहीं निवडक मुलींना आपल्या खास खोलींत बोलावीत असे; त्यांत मीहि असे. त्या पहाटेच्या वेळीं पंडिता रमाबाई ख्रिस्ती धर्माचें पुराण, मुलींच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न करी. हिंदु नवरे, त्यांचें अज्ञान, त्यांची अजागळ राहणी, यांवर ती सपाटून टीका करी. व ख्रिस्ती धर्मातले नवराबायकोचे पवित्र संबंध, ती आम्हाला पटवून देण्याचा प्रयत्न करी. ती म्हणे, " ख्रिस्तीधर्मासारखा प्रेमळपणा, जगांतल्या कोणत्याहि धर्मात नाहीं. ज्या तरुण मुली ख्रिस्तीधर्म स्वीकारतात, त्यांना परमेश्वर तात्काल भेटतो; आणि त्यांचीं सर्व दुःखें दूर होतात. कबुतराच्या रूपांत प्रत्यक्ष देवच,—प्रभुच—भूलोकावर येतो; तो तुमच्याकडेहि येईल. देव कबुतराच्या स्वरूपानें प्रकट होऊन ख्रिस्ती स्त्री-पुरुषांशीं प्रेमानें बोलतो. ख्रिस्तीधर्मातल्यासारखें सुख, अन्य कोणत्याहि धर्मात नाहीं. तेव्हा त्या धर्माचा तुम्ही, माझ्या शिष्यिणी होऊन, स्वीकार करा!"

प्रथम प्रथम आम्हाला तिचें म्हणणें मुळींच पटत नसे; किंबहुना आम्ही तिकडे दुर्लक्षहि करीत होतों. पण त्याचें प्रायश्चित्त आम्हांला ती मधून मधून निरनिराळ्या शिक्षा सुनावून देत असे. अशा त्या स्थितींत भोळ्या बालविधवांच्या मनावर ख्रिस्ती धर्माचा कळत न कळत एकसारखा परीणाम होत गेला; आणि एक दिवस असा उजाडला कीं, सदनांतील एका प्रख्यात, घरंदाज कुळातील, श्रीमंत, सुस्वरूप, तरुण, कोकणस्थ बालविधवेनें ख्रिस्तीधर्माचा स्वीकार केला. त्यामुळें पुण्यात, आणि बाहेरहि सर्वत्र फारच मोठी खळबळ उडाली ! पंडिता रमाबाइच्या पांडित्याचा माझ्याहि मनावर तेव्हां परीणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. ख्रिस्तीधर्म स्वीकारण्यास मीहि पंडिता रमाबाईला तोंडी कबूली दिली ! कबूली कसली, जवळजवळ तो मी स्वीकारलाच. तिच्या माझ्यामध्ये जो मतभेदाचा विषय झाला, तो माझ्या मुलाच्या धर्मांतरासंबंधाने. पंडिता रमाबाईचें म्हणणें, "तूं तर ख्रिश्चन होच, पण, तुझीं लहान मुलेंहि तूं मिशनला लिहून दे. तुझीं दोन्ही मुलें मला पाहिजेत !" मी ती गोष्ट, साफ नाकारली त्याबरोबर रमाबाईला फार राग आला. ती माझ्याशी डावपेचानें, सूडबुद्धिनें वागूं लागली. एकांतवासांत नानाप्रकारचे धाकही ती बोलून दाखवूं लागली. "मी अभ्यास करीत नाहीं," असा माझ्यावर खोटाच आरोप करून सर्व मुलींसमक्ष ती मला बाकावर खडे उभें रहावयास लावी; वाक्य चुकलें म्हणून तेच वाक्य, तशा उभ्या स्थितींत ५०० ( पाचशें ) वेळां लिहून काढावयास मला भाग पाडी. फक्त तिनें त्या कालात माझ्या अंगावर हात टाकला नाहीं एवढेंच; पण बाकीच्या सर्व कठोर शिक्षा, मोलमजुरीच्या सर्व शिक्षा, तिनें मला नित्य द्याव्यात, आणि त्या मी मुकाट्यानें नित्य सोसाव्यात, असा क्रम पुष्कळ दिवस चालला होता !

कुलीन घराण्यांतल्या बालविधवाच्या धर्मांतरानें त्या वेळीं सर्वत्र फारच मोठी खळबळ उडवून दिली, हें मी पूर्वी सांगितलेंच. त्या वार्तेमुळें संस्थेकडे पाहणाऱ्या मोठमोठ्या त्या वेळच्या पुढाऱ्याचा दृष्टिकोन बदलला; आणि त्यांनीं आपली शारदासदनाविषयीची असलेली सहानुभूति काढून घेतली.

कै. रमाबाई रानड्यानी पंडिता रमाबाईच्या सदनास तोडीस तोड म्हणून निराळें सदन चालविण्याचाहि संकल्प सोडला. पण त्यामुळें पंडिता रमाबाईच्या कार्यास मुळींच बाध आला नाहीं. स्त्रियांच्या धर्मांतराच्या गवगव्याचा परीणाम एवढाच झाला कीं, पुढें काहीं कालानें पंडिता रमाबाईनें आपल्या सदनाचें स्थलांतर केलें. पण ती गोष्ट, मी त्या सदनातून बाहेर पडल्यानंतरची आहे. माझ्या बाबतींत पंडिता रमाबाईला असें वाटत होतें, की, ' ही आतां आपल्या तावडींत पक्की सापडलेली आहे, तेव्हा हिला पक्की डाबून ठेवण्यास, हिच्या मुलांची मागणी केलीच पाहिजे.' पण तो तिचा प्रयत्न व्यर्थ ठरला.

पंडिता रमाबाईच्या त्या धर्मांतराच्या चळवळीच्या लाटेनें समाजास–हिंदुसमाजास, भूकंपासारखा फारच मोठा धक्का दिला! सदनांतील मुलीबाळींचे पालक अति घाबरून गेले. माझ्या बाबाच्याहि कानांवर पुण्यांतील हिंदु मुलींच्या धर्मांतराची बातमी विद्युल्लतेप्रमाणें जाऊन, तिनें परीणाम केल्यावांचून ती राहिली नाहीं. त्या वार्तेचा बाबांच्या मनावर भयंकर परीणाम होऊन, मला धर्मांतरांतून वांचविण्याकरतां धांवतच ते, माझ्या आईसह पुण्यास आले; व त्यांनीं शक्य तितक्या लौकर, अगदीं त्वरा करून, सदनांतून मला काढून घेण्याचें ठरविलें. त्या गोष्टीनें बाबा अगदीं घाबरून गेले होते. मला अखेरीस शाळेंतून काढली, आणि पुण्यास घरींच बंदिवान करून टाकली! बाबाच्यापुढें तेव्हा दोन महत्त्वाचे प्रश्न होते, कीं, 'माझें पुढें काय करावयाचें?' आणि 'आपल्या मुलीनें धर्मांतर केलें आहे, असें एकदां लोकांना समजल्यावर त्या लोकनिंदेतून आपण कसें पार पडावयाचें?' तेव्हां त्यांना वाटलें, कीं, या बाबतींत श्रीशंकराचार्यांच्याकडे जावें, आणि त्यांचा निर्णय घेऊन मुलीच्या बाबतींत पुढें काय करावयाचें तें ठरवावें; या हेतूनें ते श्रींच्याकडे गेले!

बाबांचें म्हणणें श्रीशंकराचार्यांनीं नीट ऐकून घेतलें, आणि त्यानीं निःसंकोचपणें बाबाना एक भयंकर, रानटी, क्रूर सल्ला दिली. श्रीशंकराचार्य बाबाना म्हणाले, "अजून तुमच्या मुलीविषयीं कोणास कांहींच समजलें नाहीं, तोंवरच तिला तुम्ही झटपट सोवळी करून,–शुद्ध करून घ्या! सोवळी केलीत, तिचें

वपन केलेंत, कीं तिचा दोष जाईल. त्याशिवाय दुसरा दंडक, मार्ग, नाहीं!" बाबांच्या हट्टी, सनातनी धर्मप्रवृत्तिच्या मनःस्थितींत श्रींची आज्ञा म्हणजे एक पलिताच मिळाला. आणि श्रीशंकराचार्यांनीं दिलेल्या त्या मशालीने ते मला जिवंत भाजावयासच उठले! श्रींच्या ठिकाणाहून बाहेर पडतांना त्यांनीं निश्चय केला, कीं, आपल्या मुलीला 'सोवळी' करावयाचें; त्याशिवाय तिचें पातक धुवून जाणारें नाहीं! मग तिचें किंवा आपलें काहींही होवो, पण रूढी मोडावयाची नाहीं. बालविधवेला वपनाशिवाय, तिच्या पातकाची शुद्धि नाहीं!" असा त्यांनीं भयंकर विचार ठरविला.

घरांत येऊन, बाबानी ती गोष्ट आईस सांगितली. मला मात्र ते कांहींच बोलले नाहींत! आईच्या तोंडून जेव्हां ती भयंकर गोष्ट मी ऐकली, तेव्हा, गाईचा वध करण्याकरता खाटिकखान्याकडे ओढून नेणाऱ्या कसाबाची मला आठवण झाली! त्याच्या निर्दय हृदयामध्यें आणि बाबाच्या हृदयामध्ये मला कांहींच फरक दिसला नाहीं. बाबांनीं तो बेत अगदीं निश्चित केला; आणि 'पुनः येतो' म्हणून आईला सांगून बाबा गोव्यास निघून गेले. बाबांचा तो कठोर हेतू आईनें जेव्हा मला स्पष्ट सांगितला, तेव्हा, त्या वपनाच्या रानटी कल्पनेनें, माझ्या काळजांत चर्रर झालें. आधींच वैधव्य म्हणजे विडंबन; त्यांत त्या स्त्रीचें वपन म्हणजे विडंबनाचा कळसच, असें मला तेव्हा वाटले; छे छे, त्या भयंकर कल्पनेचा मला विचारच करवेना. आईवरहि मी तेव्हा खूप रागावले; तिला शिव्याशाप दिले! मन एकसारखें तडफडूं लागलें. या भयंकर विधींतून आपली सुटका कशी होईल, बाबांचें तें अमानुष कृत्य कसें मला टाळता येईल, त्यांच्या तडाक्यांतून मी यावेळीं कशी सुटेन, याच विचार-परंपरेचा मला ध्यास लागून राहिला. जेवण सुचेना, पाणी सुचेना. एकवेळ प्राणत्याग करीन, पण वपन करणार नाहीं, असा मी दृढनिश्चय मनाशीं केला. एकवेळ समुद्राला जाऊन मिळणारी नदी माघारी परतेल, पण मी आपला निश्चय ढळूं देणार नाहीं, असें मी मनाशीं पक्कें ठरविलें. नुसता विचार करूनच मी गप्प बसलें नाहीं, तर आलेल्या त्या संकटांतून कांहीं मार्ग काढण्याचा मी प्रयत्न करूं

लागलें. रूढीशी लढाई करणें म्हणजे टिटवीनें समुद्र हटविण्याचें काम करणें असाच त्याकाळीं वपन-विरोधाचा, सत्याग्रहाचा अर्थ होता! मनुष्याच्या देहाचें कातडें सोलून काढणें, आणि बालविधवेला वपन करून सोवळी करणें, दोन्हींच्या यातना मनुष्याला सारख्याच. एक यातना देहास, एक यातना मनास!

अशा स्थितींत 'धर्मांतर, कां वपन?' हे दोन प्रश्न मला बाबाच्या गैरहजेरींत अहोरात्र भेडसावूं लागले. प्रथम मनाचा कांहींच निर्णय होईना! त्यांतून तें बायकांचें मन! तें पोलादी, न डळमळणारें कोठून येईल? वपन करण्याइतका अपराध तूं कोणता केला आहेस, असें माझें मन मला पुनः पुनः विचारूं लागलें. मी दोषी होते, का बाबा दोषी होते? म्हाताऱ्या नवऱ्याशी माझें लग्न करून द्यावयास मी बाबाना आग्रह केला होता काय? मला तेव्हा लग्न म्हणजे काय, हें समजत तरी होतें काय? आईबापाच्या गुन्ह्याचें, अपराधाचें शासन अज्ञान मुलीला काय म्हणून? उघड उघड एकमेकांमधील वयाच्या अंतरामुळें, जांवयाचा मृत्यु सर्वांना दिसत असतां, तो मृत्यु बाबांच्या दृष्टीलाच तेवढा दिसला नव्हता काय? का, बाबा अज्ञान होते? बाबानींच स्वतः त्या वृद्ध वयस्क जामाताच्या हातावर आपल्या स्वतःच्याच हातांनीं उदक सोडलेलें होतेंना? मुलीचें बलिदान करून द्रव्याशा धरणारा अपराधी, कीं, मी अपराधी? शेळी जिवानिशी जात असतांना खाणारानें तिला वातड म्हणावें, तसाच आईबापानी मुलीला दिलेला वैधव्याचा हा दोष नाहीं काय? एकाचें प्रायश्चित्त दुसऱ्याला काय म्हणून? परंतु असे शहाणे बाप जगांत कितीसे आहेत? छे! माझ्या लग्नाच्या बाबतींत, मी मुळींच, तिळमात्रहि अपराधी नव्हतें आणि वपन करून घेण्यास तर मी मुळीच पात्र नव्हतें. पण मग पुढें काय करावयाचें? मला अशा स्थितींत कोण सहाय्य करणार?

त्या वेळीं मला सर्व ब्रह्मांड आठवलें. काय करावें, कोठें जावें, कोणाला सहाय्याची याचना करावी, का आत्महत्या करून मोकळें व्हावें? काय करावें, हें कांहींच सुचेना! मन अस्वस्थ झालें, आणि त्याचा प्रसादहि भयंकर असाच

मिळाला ! पुष्कळ विचार करता करतां मला माझ्या गुरुदेवतेची, शिक्षयित्री मिस बर्नार्डची आठवण झाली ! ती तेव्हां पुण्यासच होती. मी तिला घाई-घाईनें, सर्व हकिकत, गुप्तपणें कळविली. पंडिता रमाबाईनें सदनामध्यें मुलाच्या धर्मांतराच्या हेतूनें, कसा माझा छळ करून मला त्रास दिला, तेंही तिला मी लिहिलें, आणि शेवटीं, नाइलाज म्हणून तिच्या सहाय्याची अपेक्षाहि केली ! मी पत्रांत लिहिलें, " मिस बर्नार्ड ? तूं मला या संकटांतून सोडवशील, तर मी तुझी जन्माची ऋणी होईन ! " त्यानंतर, मी तिच्या पत्राची वाट पाहूं लागलें !

मिस बर्नार्डचें माझ्यावर फार प्रेम होतें. तशीच ती मनानें समंजस, सुशिक्षित आणि निःस्वार्थी कार्यकर्त्री होती. तिचा एक भाऊ तर अमेरिकेंत एका परगण्याचा गव्हर्नरच होता. तिला माझी दया आली. माझ्यावरील संकटांत उडी घालण्याचा तिनें निश्चय केला, आणि माझ्या पत्रास उत्तर म्हणून तिनें गुप्तपणें मला लिहिलें, कीं,—

" प्रिय सुंदर ?

मी प्रत्यक्ष तुझ्या घरीं येऊन, तुझ्या त्या क्रूर स्थितींतून तुला सोडवणें शक्य नाहीं. तुझ्या सुटकेचा मी शक्य तेवढा बंदोबस्त करते. आमच्याकडे येण्यांत तुझ्या दोन लहान अज्ञान मुलांची फार अडचण आहे. एक तुझा मुलगा तर ५ वर्षांचा आहे. तरीपण कांहींहि करून मी तुला या भयंकर संकटांतून सोडवतें. तुझें संकट तें माझेंच संकट असें मी समजतें. तूं अमुक दिवशीं....अमक्या ठिकाणीं आपल्या मुलांना घेऊन ये; तेथें माझी गाडी उभी असेल, त्यांतून तूं माझ्याकडे निर्भयपणें ये; पुढील काय व्यवस्था करावयाची तें मी मागाहून ठरवेन."

तुझी,
मिस बर्नार्ड.

याप्रमाणें पत्र येताच, मला पुष्कळच धीर आला. धर्मांतर करीन, प्राण गेला तरी हरकत नाहीं, पण वपन करणार नाहीं, एवढा मी पूर्ण निश्चय केला, आणि त्या दिवसाची मी वाट पाहूं लागले.

शेवटीं बर्नार्डनें पत्रांत लिहिल्याप्रमाणें, एक दिवस मी गुप्तपणें, आईसहि न कळवतां, दोन मुलांना घेऊन घराबाहेर पडलें; आणि मनाची व देहाची सर्व शक्ति एकवटून त्या गाडींत मुलासह पाऊल टाकलें. त्याच दिवशीं नकळत मी हिंदुधर्म सोडला आणि खिस्तवावर पाऊल टाकलें, असेंच आतां मला वाटतें.

मी थोड्याच वेळांत मिस बर्नार्डकडे सुरक्षित पोंचलें. तिनें माझें प्रेमानें, हंसतमुखानें स्वागत केलें; आणि पुण्यास आतां मला अधिक काळ ठेवता कामा नये, धोक्याचें आहे हें जाणून, मला तिनें पुनः मुलांसह नाशिकच्या मिशनकडे पाठवून दिलें. नाशिकच्या मिशनची चालिका आणि मिस बर्नार्ड यांचें वांकडें होतें. पण मिशनऱ्याच्या कार्यात असा कडक नियम आहे कीं, "वैयक्तिक द्वेष हा व्यक्तिपुरताच; कार्याला त्याचा उपसर्ग लागता कामा नये! एका मिशननें सहाय्य मागितलें असतां, दुसऱ्या मिशननें कोणत्याहि प्रकारची कुरकुर न करतां, प्रथम ताबडतोब सहाय्यच केलें पाहिजे." त्या नियमामुळें नाशिकच्या मिशन-चालिकेस जरी मनांतून मला ठेवून घ्यावयाचें नव्हतें, तरी शिस्तीकरतां म्हणून, तिला मला आश्रय देणें भागच पडलें.

नाशिकला पोंचतांच मी आईला एक पत्र लिहिलें, कीं, "आई! तूं माझ्याविषयीं काळजी करूं नकोस! मी वपन करणार नाहीं. मी खुशाल आहे. योग्य वेळीं मी तुला पत्र पाठवीन अथवा माझा पत्ता कळवीन. पुनः पत्र येईपर्यंत तूं माझा तपास करूं नकोस; किंवा तूं माझ्याविषयीं थोडीहि काळजी करूं नको. बाबांना सांग, कीं, 'ज्या दिवशीं तुम्ही आपल्या मुलीचें म्हाताऱ्या नवऱ्याशी लग्न लावून दिलें, तो अविचार केला, त्याच वेळीं तुमची मुलगी मेली आहे! आतां तिच्या वपनाची आवश्यकताच राहिली नाहीं! तो त्रास मी तुम्हाला देऊं इच्छित नाहीं;' असें बाबाना सांग!" याप्रमाणें मी पत्र लिहून टाकलें.

मिस बर्नार्ड आणि नाशिकची मुख्य चालिका यांचें वैमनस्य असल्यामुळें नाशिकमिशनच्या त्या बाईनें मला फारच त्रास दिला. अन्न-पाण्याचे, राहण्याच्या जागेचे फारच हाल केले. पुढें ते हाल मला मुळीच सोसवेनात असें झाल्यावर, पुण्यास मी मिस बर्नार्डला पत्र लिहिलें, कीं 'मला या हालांतून सोडव.' बर्नार्ड स्वतः नाशिकला आली. तिलाहि तत्पूर्वी भीति वाटत होती कीं, "माझा तपास लोकांना लागेल!—माझा तपास होईल!" ती भीति दूर केल्यावांचून तिच्या मनाला स्वस्थता मिळणें शक्य नव्हतें. म्हणून तिनें एक नवीनच मार्ग काढला व तो मार्ग तिनें मला अवलंब करावयास सांगितलें.

बर्नार्डचा मार्ग अपूर्व होता! तिची आपल्या धर्मावरची श्रद्धाहि अपूर्व होती. माझ्याकरतां तिनें तेव्हा फारच कष्ट सोसले व पाण्यासारखा पैसा खर्च केला. तो खर्च तिचा स्वतःचा होता, असे मला मागाहून समजलें. नाशिकला येऊन तेव्हा मिस बर्नार्डनें मला सांगितलें, "मी सांगेन तसें आतां तूं वाग; तुझ्या मोठ्या मुलाला तर हिंदुस्थानच्या कायद्याच्या कक्षेच्या बाहेर नेऊन ठेवलें पाहिजे. आणि तुलाहि पुणें नाशिकपासून दूर ठेवलें पाहिजे. तेव्हां, आतां तुला मी सांगेन तसा पोषाख केला पाहिजे. तुला मुसलमानी बेगम झालें पाहिजे! तुझ्याकरता एक फर्स्टक्लासचा डबा मी रिझर्व करीन. मी तुझ्याबरोबर असेनच; पण नाशकाहून निघून मद्रासला पोंचेपर्यंत तूं तोंडावर बुरखा घेतला पाहिजेस; गोषांत राहिलें पाहिजेस! मुसलमानांच्या राहणीप्रमाणें बिनचूक तूं कांहीं काल वागलें पाहिजेस, तरच तुला मद्रासपर्यंत मला नेतां येईल."

मिस बर्नार्डची ती अट मी कबूल केली आणि बेगमेचा वेष धारण करून, दोन मुलांनाहि मुसलमानी वेषांत बरोबर घेऊन, त्या गुप्त वेषानें मी कल्याण-स्टेशनपर्यंत येऊन पोंचलें!

## प्रकरण ३ रें



# ख्रिश्चन पतिशी विवाह

गुप्तवेष घेऊन मिस बर्नार्डबरोबर मी निघाले, ती मद्रासला सुखरूप पोचलें. प्रथम प्रश्न होता मुलांच्या संरक्षणाचा. त्यासाठीं मिस बर्नार्डने मला सिलोनला कॅंडीकॉलेज दाखविण्यासाठीं नेले. लहान मुलाना तेथें ठेवून घेऊन त्याच्या उच्च दर्जाच्या शिक्षणाचीहि तेथें उत्कृष्ट सोय होती. कॉलेजची व्यवस्था पाहून मला फार समाधान झालें. आणि तेथें थोरल्या मुलास शिक्षणाकरतां ठेवण्याचा मी निश्चय केला, व तशी व्यवस्थाहि केली. धाकट्या मुलाच्या बाबतींत त्याला पुण्यास नेऊन सर्व शिक्षण देण्याची जबाबदारी मिस बर्नार्डने आपल्यावर घेतली. व मद्रासच्या मिशनमध्ये माझी शिकण्याची व्यवस्था करून मिस बर्नार्ड धाकट्या मुलास घेऊन पुण्यास गेली मुलाच्या ताटातुटीचा तो माझ्यावर पहिला प्रसंग होता. परंतु वियोग सहन करण्याशिवाय मला गत्यंतरच नव्हतें. मुलांच्या शिक्षणाची एवढी सोय करण्याशिवाय मी काय अधिक करणार होतें? आता मला शिक्षणसंपादनार्थ भरपूर वेळ मिळाला होता. तशा विद्यार्थिनीच्या स्थितींत मद्रासला मी ३ वर्षें काढलीं. पण तेथल्या हवामानाला, त्या मद्रासी भाषेला, रीतिरिवाजाला मी अगदी कंटाळले. तेव्हां मिस बर्नार्डनें माझी इच्छा जाणून, शिक्षणाकरतां मुंबईस राहण्याची माझी व्यवस्था केली. मुंबईस मी मिशनच्या शाळेंत जाऊं लागले. त्यावेळीं मी इंग्रजी ६ व्या इयत्तेंत असेन. त्यावेळपर्यंत माझ्याकडे कोणाचीहि वाईट दृष्टि गेलेली नव्हती; व मीहि पण सुखांत होतें. पण तरुण विधवा आणि मांसाचा गोळा हीं दोन्ही सारखींच आहेत. पापी पुरुषांची गिधाडी नजर त्यांच्यावर पडल्यावांचून कशी राहील? मी तर त्यांतून सौंदर्याची एक प्रकारची पुतळीच होते; सौंदर्याची ज्वालाच होतें! दुसऱ्याचें माझ्याकडे आकर्षण होईल, असेंच माझें तेजस्वी रूप होतें! पण परमेश्वराला स्मरून मी सत्य सांगतें. कीं. मुंबईला येऊन शाळेला जाऊं लागेपर्यंत पुनर्विवाहा-

विषयीं, प्रेमसंबंधाविषयीं माझ्या मनांत थोडीहि कल्पना उद्भवलेली नव्हती. तो विचारच माझ्या मनांत येत नसे; इतकी मी शिक्षण घेण्यांत तल्लीन झालेली होते. तो विचारच मी करीत नसे. पण माझ्या प्राक्तनांत काहीं अद्‌भुतच लिहिलेलें होतें. तें विधिलिखित जर मला आधीं समजतें, तर किती बरें झालें असतें!

एक दिवस शाळेची पिकनिक पार्टी होती. त्यासाठीं आम्ही सर्व विद्यार्थिनी-विद्यार्थी, बोरवलीला पार्टीकरता गेलो होतो. यावेळीं माझें वय सुमारें २५ वर्षांचें असेल. शाळेची पिकनिक पार्टी म्हणजे दुसऱ्या शाळांना, मोठमोठ्या व्यक्तिनाहि निमंत्रण दिलें जाते. तशा निमंत्रणातून एक जोशी या आड-नावाची व्यक्तीहि बोरवलीला आलेली होती. पार्टीचा देखावा अत्यंत मनोहर होता. त्या वेळीं मी समारंभातून मिरवत असतां त्या व्यक्तिचें लक्ष, प्रथम मजकडे वेधलें. जोशी हे मूळचे कोकणस्थ ब्राह्मण. एका तीर्थक्षेत्राचे ठिकाणीं एका देवस्थानाचें, त्याचें घराणें पुजारी होतें. वडिलांच्यावर आपत्ति आल्या-मुळें त्यानीं ख्रिस्तीधर्म स्वीकारलेला होता. आपल्या बंधूच्या निमंत्रणानें मिस्टर जोशी परगावाहून मुद्दाम पार्टीकरतां आलेले होते. अशा रीतीनें मी त्याच्या प्रथम दृष्टीस पडलें! पार्टीच्या वेळीं केवळ प्रणय हेतूनें जोशांचें माझ्याकडे लक्ष वेधलें आहे व त्याच दृष्टिनें ते मजकडे पहात आहेत, अगर पहात होते, ही गोष्ट पार्टीच्या वेळीं तर माझ्या ध्यानात आली नाहीच, पण पुढें कित्येक महिनेहि ती गोष्ट मला समजली नाहीं. पण पार्टीनंतर एवढाच प्रथम चमत्कार झाला, कीं, माझ्याभोंवतीं अनेक अद्‌भुत गोष्टी घडूं लागल्या. त्या गोष्टींना अद्‌भुत गोष्टी असें म्हणण्यापेक्षां मी त्या चमत्काराच्या कृत्यांना 'प्रणयाचीं कारस्थानें' असेंच नांव देते. माझ्या ओळखीचे असलेले लोक, आणि जोशांच्याहि ओळखीचे असलेले लोक, अशा लोकांच्याकडून, प्रत्येक सुटीला, मला त्याच्या घरीं फराळासाठीं, किंवा अन्य निमित्त्यानें, निमंत्रणावर निमंत्रणें येऊं लागलीं! मीहि अल्लडपणें, फारसा दूरवर विचार न करतां, त्या निमंत्रणांचा स्वीकार करीत गेले. आश्चर्याची गोष्ट अशी, कीं, मी जेथें जेथें जाई, तेथ तेथें जोशी हे अचूक हजर असावयाचेच! परंतु तशा

प्रसंगीसुद्धा लग्नाबाबत मला काहीं प्रत्यक्ष विचारण्याचें साहस त्याचे हातून झालें नाहीं. मला तेव्हा त्यांच्याबद्दल कसलीच शंका नव्हती.

पुढें मी थोडे दिवस विश्रांतीकरतां आणि पाहुणी म्हणून पुनः एकदा शारदासदनमध्यें सहज गेलें असतां, तेथे मिस्टर जोशी याचेबद्दल पुष्कळच माहिती मला उपलब्ध झाली. मला समजून चुकले कीं, एकंदरीत जोशी यांची वर्तणूक चांगली नाही. मी पुनः लग्न करावें, याच्याविरुद्ध मिस बर्नार्डहि होती. आणि जोशाच्याबद्दल तर तिला मुळींच आदर नव्हता.

त्यावेळीं मिशनच्या कांहीं कार्याकरतां मुंबईहून मला अहमदाबादच्या मिशनकडे पाठविण्यात आलें. तेथें मिस शॉयर नावाची एक चालिका होती. ती अविवाहित होती. तो काळ 'मोठ्या दुष्काळा'चा होता. चोहोंकडे, विशेषतः मध्य हिंदुस्थानांत तेव्हां दुष्काळाचा कहर उडाला होता. अन्नाविना हजारो लोक, बायका मुलें, मृत्युमुखीं पडत होतीं. त्यावेळीं अहमदाबादच्या मिशननें फारच मोठी कामगिरी केली. दुष्काळपीडित माणसाचे अस्थिपजर थवे, अन्नाकरता, एकाद्या टोळधाडीप्रमाणें चोहोंकडे भटकत होते. लहान मुलाना तर काहीं किंमतच नव्हती. प्रत्येकाला आपला जीव प्यार झालेला होता. मोठ्या माणसानाच जर अन्न नाहीं, तर तेथें अर्भकांना कोण विचारणार ? रेल्वेचे डबे भरभरून लहान मुलें, तितक्याच बायका, तितकेच पुरुष, त्यावेळीं मिशनकडे आश्रयार्थ येत असत. मोठ्या स्त्रीपुरुषाचीं जेथें जेथें सोय लावून देतां येईल, तेथे तेथें ती लावून देऊन, लहान मुलांना मात्र मिशन सांभाळण्यास घेत असे. चारचारशें, पाचपांचशे मुलें तेव्हा नित्य मिशनकडे येत असत. कित्येकांच्या आईबापांचा, पालकाचा तर कांहींच पत्ता नसे. आम्ही तीं अनाथ मुलें स्वीकारून निरनिराळ्या मिशनकडे पाठवून देत होतो. केवळ त्याकरता मग, मिस शॉयरनें बलसारला एक खास मिशनहि उघडलें. शॉयरला जरूर लागणाऱ्या मराठी भाषेचें, दुभाष्याचें सहाय्य तेव्हा मीच करीत असे. दुष्काळपीडितांच्या सेवेचें तें कार्य, मी मोठ्या उत्साहानें तेव्हां बराच काल केलें. तेथून मी नंतर थोडे दिवस विश्रांतीच्या हेतूनें वेंगुर्ल्यास गेलें. वेंगुर्ल्यास माझ्या यजमानांची स्थावर इस्टेट, शेतीभाती विपुल प्रमाणांत होती. तिचें

काय काय झालें आहे, हेंहि मला पहावयाचें होतें. त्या कार्यात वेंगुर्ल्यास, मी मग्न असतां एक दिवस मला मिस शॉयरकडून एक महत्त्वाची तार आली. ती तार म्हणण्यापेक्षा एक लांबलचक पत्रच, तिनें मला तारेच्या स्वरूपांत पाठविलेले होते. त्यात मिस शॉयरने 'आपण फार आजारी' असल्याचा उल्लेख केला होता, आणि तातडतोब निघून येण्याविषयीं मला विनंति केली होती.

तार मला मिळताच निःशंक मनानें मी बलसारला गेले. पण तेथे जाऊन पाहते तो मिस शॉयर मुळीसुद्धा आजारी नव्हती; चांगल्या स्थितींत आणि ठणठणीत असलेलीच मला उलट दिसली ! त्या प्रकारानें मला फार आश्चर्य वाटले. मनातून मी थोडी साशंकहि झाले. शॉयरला पाहताच हंसत हंसतच मी तिला म्हटले, " तूं तर प्रकृतीने चांगली धट्टीकट्टी आणि खडखडीत बरी दिसते आहेस, मग अशी खोटी तार, तूं काय म्हणून केलीस ?"

मिस शॉयरनें आपला अपराध कबूल केला; पण तिने मला विनवणीच्या स्वराने, केविलवाणेपणानें म्हटले, " सुदर ? माझें तुझ्यावर अत्यंत प्रेम आहे ! "

मी हंसतच उत्तर दिले, " होय आहे ! मग त्याला एवढी तार कशाला करायला पाहिजे होती ? त्यामुळे आपलें प्रेम अधिक वाढले काय ? "

पुनः मिस शॉयर केविलवाणेपणाने म्हणाली, " तुझ्यासाठीं मिस्टर जोशी हे झुरत आहेत. त्याना कांहीं सुचेनासें झाले आहे. तुझ्याशी लग्न करावें अशी त्यांची अत्यंत इच्छा आहे. तूं लग्न करशील आणि तेहि जोशी यांच्याशीच करशील, तर फार बरें होईल. त्यात तुझे कल्याणच होईल ! "

" लग्न ? " या प्रश्नानें तेव्हा मी दचकल्याशिवाय राहिलें नाहीं. ज्या मरणाला मी रात्रंदिवस अलीकडे भीत होते, तेच मरण माझ्यापुढें मूर्तिमंत उभें राहिलें. त्यावेळीं मिस्टर जोशी हेहि शॉयरच्या बंगल्यात–आंत लपून बसलेले होते, ही गोष्ट तिनें मला प्रथम कळूंच दिली नाहीं.

मिस शॉयरचा तो प्रश्न ऐकून मी तिला थोड्या रागानेच म्हटलें, " मला तूं जोशीशीं लग्न करायला सांगतेस, त्यापेक्षां तूच का त्यांच्याशी लग्न करीत

नाहींस ? तूं अजून अविवाहित, कुमारिका आहेस. मला आग्रह करण्यापेक्षा तूंच लग्न करशील, तर मी तुला आणि जोशांना, दोघांनाहि आशीर्वाद देईन!"

मिस शॉयरनें तेव्हां माझी फारच मनधरणी केली. अनेक प्रकारच्या प्रेमाच्या कानगोष्टी तिनें मला सांगितल्या. मिस्टर जोशी यांचे मजवर कसें प्रेम आहे, हें तिनें विशद करून सांगितलें. ती तेव्हा पुनः म्हणाली, "जोशी हे पदवीधर आहेत; पुढेहि ते उच्च शिक्षण घेणार आहेत. तूंहि आता शिकलेली आहेस. तुझें हित आणि अहित दोन्ही तुला समजत आहेत. जोशी हे फार चांगले गृहस्थ आहेत. असा सज्जन मनुष्य मी पाहिला नाहीं. तुला तर ते अगदी योग्य पती आहेत." जोशाचें वकीलपत्र घेऊनच, बॅरिस्टरच्या आवेशानें मिस शॉयर तेव्हा बोलत होती!

मी दृढनिश्चयानें म्हटले, "जोशाच्याविषयीं मी सर्व गोष्टी ऐकलेल्या आहेत. त्याची चालचलणूक, वागणूक, कॅरॅक्टर, चांगली नाहीं, असें मला पूर्ण समजलें आहे. अशा चंचल, विषयी, वाईट आचरणाच्या व्यक्तीशी मी कधीच लग्न करणार नाहीं. त्यांचें मुखावलोकन करण्यासही मी तयार नाहीं. ते माझ्यावर प्रेम करीत आहेत, ही गोष्ट अलीकडे माझ्या लक्षांत येऊन चुकली आहे!" मी रागावूनच उत्तर दिलें.

पण, मी येथें भगिनींना विचारतें, कीं, बायकांना 'दृढनिश्चय' हा शब्द पूर्ण अर्थानें ठाऊक आहे काय ! ठाऊक असतो काय ? त्या दृढनिश्चय करूं शकतात काय ? तसें उदाहरण जगांत एकाद्या तरुण, रूपसंपन्न, श्रीमंत स्त्रीचें आहे काय ? पुरुषांच्या स्तुतीला, त्याच्या डोळ्यातून निघणाऱ्या नाटकी अश्रूंना, विरहाच्या हावभावांना स्त्री बळी पडली नाहीं,–पडणार नाहीं,–पडत नाहीं, असें कधीं अपवादाला तरी घडलें आहे काय ? त्याबद्दल मी साशंकच आहे !

मिस्टर जोशी, आमच्या दोघींच्या त्या संभाषणाच्या वेळीं आकस्मात् एका खोलींतून, पडदा सारून, दीनवाणे, डोळे पुशीत पुढें आले. त्यांना आकस्मात् तेथें पाहून मी क्षणभर स्तंभितच झालें. स्त्रियांच्याकरतां पुरुष काय-

काय धाडसे करतात त्याची पूर्ण खात्री पटली. पुरुषांच्यावर संतापलेली स्त्री, पुरुषाच्या गैरहजेरींत काय वाटेल तें बोलूं शकेल; पण तोच पुरुष समोर दिसल्यावर तिच्यांत थोडा तरी बदल झाल्यावाचून राहणारच नाहीं. माझेंहि अगदीं तसेंच झालें !

जोशी पुढें येऊन व माझी खात्री पटविण्यासाठीं हातातील एक पत्र माझ्या-पुढे धरून अत्यंत गयावया करीत साश्रु नयनानीं मला म्हणाले, "सुंदर ? मी वाईट कॅरेक्टरचा नाहीं ! हें पत्र पहा. माझं तुझ्यावर अत्यंत प्रेम आहे. आज कित्येक महिन्यांपासून म्हणजे पिकनिकपार्टीच्या वेळेपासून, तुझ्यासाठीं मी झुरतों आहे. गेले तीन दिवस, या घरात तुझ्यासाठीं मी अहोरात्र रडत आहे. माझी तू निराशा करूं नकोस. माझ्यातील दोषाबद्दल तुला कोणीतरी मुद्दाम खोटेनाटें सांगितलेलें आहे. या एकाच छन्नी पत्रावरून माझ्याबद्दल तुझी खात्री होईल. घरच्या मंडळींचे व माझें वाकडें आहे. त्यानीं माझ्यावर भलभलते आरोप करून घरातून मला हाकलून लाविले आहे. मी अपराधी नाहीं. भावजयीचे व माझे वाकडे आहे. ती माझ्याविषयीं खोट्यानाट्या कंड्या उठवते आणि माझ्यासबंधीं गैरसमज होईल असें खोटेंनाटे लोकात सागते. घरची कोणाची मदत न घेतां मोठ्या कष्टाने आजपर्यंतचें शिक्षण मी संपादन केले आहे. सध्या मला नौकरीहि आहे; तुझ्या वाचून मात्र आता मी जिवंत राहणार नाहीं. तुझ्यावर मी, माझ्या प्राणापेक्षाहि अधिक प्रेम करीत आहे; तेव्हा तूं माझी निराशा करूं नकोस, आणि मला जीवदान दे ! माझ्याशी तूं लग्न कर !"

मी मनाला तेव्हा विचारले, "काय करूं ?"

माझ्या मनानें उत्तर दिले, "तुला योग्य वाटेल तें कर; पण तूं हे करते आहेस, तें काहीं बरोबर नाहीं." मी जोशाना व मिस शॉयरला विचारलें, "हें तुमचें सारें बोलणें खरें आहे काय ? का मला तुम्ही फसवत आहा ! अजून मी इतके दिवस शुद्ध राहिलें, त्या मला, गरीब हिंदु अनाथ अबलेला पेचांत आणून, भ्रष्ट करण्याचा तर तुमचा बेत नाहींना ? अशा दगाबाज मैत्रिणी जगांत फार असतात, म्हणून तुलाच मी विचारतें आहे शॉयर ?

आपल्या मैत्रिणीचा बळी देऊन आपला स्वार्थ साधणाऱ्या,–कार्यभाग साधणाऱ्या मैत्रिणी आजकाल जगांत विपुल आहेत. तुझ्यावरून तसा तर्क मी कां करूं नये ?"

मिस शॉयर कृतज्ञतेच्या स्वरानें पण गंभीरपणे उद्गारली, "सुंदर! तशी फसवणुकीची गोष्ट मी मुळींच करणार नाहीं. तूं विनाश्रित लता आहेस, तुला हा वृक्ष आधाराला योग्य आहे; याचा आश्रय कर, एवढेंच सागते!"

मनाला पुनः मी विचारले, "काय करूं ? तूं यापुढें सुखी होणार आहेस काय ? बालविधवेला पवित्रपणानें जीवन काढता येणे यापुढें शक्य आहे काय ?"

मन म्हणालें, "नाहीं! तूं लग्नच कर. त्यामुळेंच तूं सुखी होशील. हें लग्न खरेंखुरें लग्न आहे; तुझ्या जीविताला हा कायमचा आधार आहे. हे लग्न पूर्वीप्रमाणें बळजबरीनें होत नाहीं; प्रेमानें, समजून उमजून होत आहे. तेव्हा तुला पुढे पश्चात्ताप करण्याची वेळ खात्रीनें येणार नाहीं. बालविधवेला, सुस्वरूप सुंदर तरुण बालविधवेला यापुढें जग निर्दोषी राहू देणार नाहीं! तिला एकलकोंडें जीवन समाज कंठूं देणार नाहीं!"

मिस्टर जोशी यानी तेव्हा माझी फारच मनधरणी केली. माझ्यापुढे, पायांशीं, अनेक आणाशपथा घेतल्या; मिस शॉयरनें स्वतः जोशांच्या चांगल्या वर्तणुकीची जामिनकी दिली; तेव्हा मी विचार केला, कीं, जोशी यांच्याशीं विवाहानें बद्ध व्हावें. हिंदुधर्मांत आता आपणाला परत जातां येणें अशक्य आहे. आणि आपल्याला कायमचा आश्रय असल्यावांचून तर आपलें चालणार नाहीं. तेव्हां आपल्या जीवनाला आमरणान्त आधार म्हणून जोशांच्याशीं लग्न करणें हेच इष्ट आणि युक्त! ते सच्छील असतील, मला फसवणार नाहींत, दुःखाच्या खाईत ढकलणार नाहींत, पश्चात्तापाच्या अग्नींत खात्रीनें लोटणार नाहींत, असें मला तेव्हा वाटलें.

पण माझें तेव्हाचें तें वाटणें, अगदीं भ्रममूलक होतें, खोटें होतें; दोन मनांपैकीं एका मनाचें तें उत्तर होतें! घेतलेला आश्रय खोटा ठरणार होता, एवढेंच येथें मी म्हणून ठेवतें!

त्यावेळीं मला जोशांच्याबद्दल मोह पडला! आणि त्यांच्या जाळ्यांत मी सापडलें. त्याच्या म्हणण्यास रुकार द्यावा असें मनाला वाटलें! तेव्हा मी धैर्य धरून त्याना विचारलें, "तुम्ही मला धर्मपत्नीच्या नात्याने आजीवन सांभाळणार असाल, तरच मी तुमच्याशी लग्न करीन. नाहींतर आगींतून निघून फोफाट्यात पडल्यासारखी स्थिति या लग्नानें होणार आहे! तुम्ही पुरुष चंचल मनाचे, आम्ही बायकाच खंबीर मनाच्या. यावेळीं मी तुमच्यावर विश्वास टाकतें, पण तुम्हीं मला फसवूं नका. पूर्ण विचार करून माझ्याबद्दल काय ते ठरवा!"

जोशी उद्गारले, "देवाशपथ! मी तुला जन्मभर कधींहि अंतर देणार नाहीं! किंवा कोणत्याहि निमित्यानें, कधीं मी तुझा त्याग करणार नाहीं! वाकडे पाऊल मी कधींहि टाकणार नाहीं. आजपासून मीं तुझ्या आज्ञेंत राहीन; तूंच आतां या जोशाच्या जीविताची सर्वस्वी मालकीण. मी तुला आपली आजपासून हृदयसम्राज्ञी समजतो!"

त्या गोड बोलण्याला मी भाळलें, आणि त्यावेळीं त्या दिवशी जोशांच्या म्हणण्यास मी संमति दिली. जोशाना अत्यंत आनद झाला; मलाहि धन्यता वाटली. मिस शॉयर तर माझ्यावर तेव्हा फारच प्रसन्न झाली. तिने मला भेटीदाखल अनेक वस्तू, प्रेमाच्या देणग्या म्हणून दिल्या. त्याच दिवशीं मी माझ्या कायेचें, देवाला अंतर्यामीं साक्ष ठेवून, जोशाच्याकरता समर्पण केले! पण ते कायावाचामनोभावें केलेले समर्पण पुढे व्यर्थ गेले!–मी पश्चात्तापांत पडलें. कशा रीतीनें, ते विस्तारपूर्वक पुढील भागात सांगेन. दुसरे दिवशीं वलसारला ५०० लोकाच्या देखत, माझें लग्न, खिस्तीधर्मातील एका व्यक्तीबरोबर झालें, एवढेंच येथें सांगून, हें प्रकरण पुरे करते.

## प्रकरण ४ थें



( स्वामीजीनीं सांगितलेली हकिकत )

# केशवानंद सरस्वति स्वामींचा उदय

वडिलाचें नांव बाळकृष्ण बगाजी चितळे. ते दशग्रंथी वैदिक आचारशील अग्निहोत्री ब्राह्मण होते. आजोबांच्या वेळेपर्यंत ७ पिढ्या, ओळीने, वडील पुरुष संन्यास घेत आले होते. वडिलांचा स्वभाव अग्निप्रमाणें तापट, कडक. आमचें घराणें अत्यंत जुनें. वडिल खरे नशिबवान होते; तितकेच दुर्दैवीहि होते. त्यांच्या नशिबाची गोष्ट अशी, कीं, ते वेदाभ्यास करीत असतां, त्यांनीं आपल्या संन्यासी वडिलांची अत्यंत मनोभावें सेवा केली; तेव्हां माझ्या त्या संन्याशी आजोबानीं माझ्या वडिलाना विचारलें, " तुझी काय इच्छा आहे ? " वडिलानीं उत्तर दिलें, " आपल्याला एक लाख रुपये मिळावेत, अशी आपली फार इच्छा आहे! दारिद्र्याचा आपल्याला अगदीं कंटाळा आलेला आहे. " आजोबा माझ्या वडिलांच्यावर अगदीं प्रसन्न झाले, आणि त्यांनीं आशीर्वाद दिला, कीं, " एकच लाख काय, पण तूं दोन लाखांचा आसामी होशील ! " असें उद्गार काढून, त्यानी प्राण सोडला. तेव्हांपासून वडिलांची, त्या आशीर्वादाच्या शब्दावर अपरंपार श्रद्धा होती. पण एक लाख गरीब ब्राह्मणाला मिळणार कोठून ? चार आणे भोजन–दक्षणा मिळण्याची पंचाईत, तेथें लाख रुपये येतील कोठून ? पण नशीब ही कांहीं एक अपूर्व गोष्ट आहे ! कांहीं काल तरी वडिलांचें नशिब बलवत्तर ठरणारें होतें. तो काल येतांच, ते खरोखरी दोन लाखांचे आसामी झालें, आणि संन्याशी आजोबाचा आशीर्वाद खरा ठरला !

त्यांच्या नशिबाची गोष्ट, मी मुद्दाम येथें नमूद करून ठेवीत आहे. त्यामुळें अनेक लोकांना उद्योगाची स्फूर्ति होईल. आणि मीहि पण पुढें कसा नशिबवान किंवा दुर्दैवी ठरलों, तें नीट समजून येणार आहे.

वडील रोज विचार करूं लागले, कीं, रोज चार आणे दक्षणा कोणी दिली, तरीहि, जन्मांत दोन लाख साठतील कीं नाहीं, याची शंका; मग मला हे दोन लाख मिळणार कोठून ? वडिलांची प्रतिदिवशीं अगदीं निराशा होत चालली; भिक्षुकवृत्तीचा त्यांना अगदीं कंटाळा आला. ते दिवस, उत्तम लिहिणें वाचणे येणाराला, भाग्यशाली नौकरी मिळवून देणारे होते. वडिलांना वाटलें, "भिक्षुकीचा त्याग करून, नोकरी मिळाली तर पत्करावी."

त्या उद्देशानें एक दिवस वडील, मोठा वशिला लावून, त्या वेळच्या चिपळूणच्या सबजज्जाकडे गेले, आणि म्हणाले, "मला नौकरी पाहिजे !"

सबजज्जानें प्रश्न केला, "लिहिता वाचतां कितपत येते ?"

वडिलानी एक कोरा कागद घेतला, आणि त्या सबजज्जापुढें लिहून दाखविले,–

## "बाळकृष्ण बगाजी चितळे चिपळूण"

वडिलाना तेवढीच सहीच करतां येत होती. तेवढया 'बाळकृष्ण बगाजी चितळे चिपळूण' या चौदा अक्षरानीं त्यानीं तो मोठा कागद, संपूर्ण भरून टाकला !

सबजज्ज त्या आंब्या एवढ्या ठळक अक्षरांनीं स्तंभित झाले! ते म्हणाले, बालकृष्णा ? तू कावळे हाकायला जा ! आमच्याकडे नौकरीला लायख नाहींस!"

वडील सबजज्जाना म्हणाले, "आपल्या सारख्या थोरांचें वचन हेंच मला प्रमाण ! मी कावळे हाकायला जातों ! ते काम तरी मला येईल कां नाहीं ?"

सबजज्ज म्हणाले, "अवश्य येईल !" म्हणून माझे वडील 'कावळे हाकायची नौकरी' शोधायला निघाले !

**"कावळे हाकणें,"** याचा अर्थ फारच थोड्या जणांना समजला असेल ! **पांखरें हांकणें, आपण ऐकतों; पण कावळे हाकण्याची प्रथा कोठें जगांत रूढ नाहीं ! पण घाटावर, चिपळुणास, ते काम फारच मोठें होतें.**

त्याचें कारण देशावरून गुळाच्या खूप गाड्या चिपळुणास व्यापार-निमित्त्यानें येत असत. हजारो गुळाच्या ढेपा मैदानांत उघड्या पडत. कावळ्याचे थवेच्या थवे त्या ढेपांना चोची मारून गूळ काढून नेत; त्यामुळें कावळे हाकणे किंवा कावळे हाकण्याची नौकरी पत्करणें, हा तेव्हां एक धंदाच होता; त्यास अनुसरून सबजज्ज माझ्या वडिलाना म्हणालें होते.

वडील तेव्हां ‘ कावळे हाकण्याच्या नौकरीकरता ’ एका गुजराथी व्यापाऱ्याकडे गेले. त्याने माझ्या वडिलाना रोज ८ आण्यावर ‘ कावळे हाकण्याची नौकरी ’ दिली !

कावळे हाकण्याची नौकरी वडिलानी फारच इमानेइतबारें केली. ती पाहून तो व्यापारी मनुष्य खूष झाला. तेव्हा त्यानें बढतीकरतां वडिलाना दुसरी उत्तम दर्जाची जागा दिली, ती म्हणजे गुळाची व मालाची चोरी दुकानातून कोण करतो, त्यावर पाहरा करण्याची. तीहि नोकरी वडिलानीं चोख केली व व्यापाऱ्याचा विश्वास त्यानी चांगल्या रीतीनें संपादन केला.

पुढें त्या व्यापाऱ्याकडून पडावानें पुष्कळसा माल मुंबई बंदरात जात असे. तेव्हा एक दिवस, तो गुजराथी व्यापारी माझ्या वडिलाना म्हणाला, “ बालकृष्ण ! तूं पडावाबरोबर मुंबईला जातोस ? ” वडिलानी उत्तर दिलें, “ अवश्य जातों. मुंबईला जाण्यांत मला आनंद वाटेल. मी केव्हाही जायला तयार आहे ! ”

योगायोग असा, कीं, व्यापाऱ्याचें नशिब म्हणा अगर माझ्या वडिलांचा पायगुण म्हणा, त्या व्यापाऱ्याला, प्रत्येक पडावाच्या खेपेस, खूपच नफा होत गेला. आणि त्यानें तें सर्व श्रेय, माझ्या वडिलाच्या पायगुणास दिलें. इतकेंच नव्हे तर तात्काळ त्यानें, बालकृष्णपंतांना ३०० रुपये पगाराची कायम नौकरी दिली. तीनशें म्हणजे दरमहा २५ रुपये. याप्रमाणें वडील व्यापारव्यवसायांत पडले. हळु हळूं त्या व्यापाऱ्याचें माझ्या वडिलांच्यावर फारच प्रेम जडत गेलें, आणि त्यानें माझ्या वडिलांना आपल्या व्यापारांत आठ आण्याची भागीदारी दिली. या वेळीं वडिलांना खूपच फायदा होत गेला.

कांहीं वर्षानंतर, त्या व्यापाऱ्याचा एक मुलगा, जो त्याच्या देशावर एकुलता एक होता, तो मृत्यु पावल्याचें आकस्मात एक पत्र, त्या व्यापाऱ्यास आलें. त्यामुळें त्यास उपरति झाली, आणि तो, आपला सर्व व्यापारव्यवहार बंद करून देशावर जाण्यास निघाला. तेव्हां तो माझ्या वडिलाना म्हणाला, "बालकृष्ण ! मला या सर्व संपत्तिचा, संसाराचा आता वीट आला आहे; मी जातों ! माझ्यामागें माझें नांव, माझा धंदा कुणी चालवील, असा कोणी लायक मनुष्य, तुझ्याशिवाय मला दिसत नाहीं. जर तुझी इच्छा असेल, तर हा सर्व व्यापार, तूं आपल्या ताब्यांत घे आणि चालव ! मला कांहीं नको ! मी देशाला जाणार हे निश्चित."

वडिलानी त्या व्यापाऱ्यास कृतज्ञतेनें उत्तर दिलें, "तुमच्या नावाला मी जपेन, आणि तुमचा व्यापार मी कसोशीनें पुढे चालवीन."

त्या उत्तरानें त्या व्यापाऱ्याला फार आनंद झाला, आणि सर्व व्यापार माझ्या वडिलाच्या स्वाधीन करून तो स्वदेशाला निघून गेला. तोच व्यापार वाढवता वाढवतां, पेढीचा व्यापार उघडून, खरोखरीच 'दोन लाखाची' वडिलानी कमाई केली. जमीनजुमला घरेंदारें, स्थावर इस्टेटहि त्यानी खूप संपादन केली. या वैभवकालात आईने आपल्याला एक उत्कृष्ट ८०० रुपये किंमतीची नथ करवून घेतली होती. ती नथ मात्र, वडिलांच्या आपत्तिच्या काळीं, मी मंत्रविद्यासंपादन करण्याकरतां चोरून घेऊन, एका जादुगाराला मूर्खपणानें देऊन टाकली. नथेचा खूप तपास करण्यात आला, पण, घरचाच चोर असल्यावर, तो कोठून सापडणार ? त्या नथेबद्दल आईला अपरंपार दुःख झालें. ज्या वेळीं मी आईच्या ९७ वे वर्षी तिला अंतिमकालीं भेटायला गेलों, तेव्हा आईजवळ तिची कांहीतरी आठवण म्हणून, एकादी जिन्नस मागितली. आई दुःखी हृदयानें म्हणाली, "केशवा ! एक ८०० रुपयांची नथ मी जिवाभावापलीकडे जपून ठेवली होती, ती मंत्रासारखी घरांतून नाहींशी झाली ! आतां माझ्याजवळ आशीर्वादाशिवाय काय आहे बाबा !" त्या वेळीं माझ्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले; किती वर्षांनीं मी माझा अपराध कबूल करीत होतों ! मी सद्गदित कंठानें आईला म्हटलें, "आई ! ती तुझी

नथ मंत्राकरतांच,–मंत्र संपादन करण्याकरतांच गेली ! तूं दुःख करूं नकोस ! मीच तुझी ती नथ चोरून, एका मान्त्रिकाला दिली आणि त्याच्यापासून ‘जीभ कापून ‘हळदकुंकु’ काढून दाखविण्याचें’ शिकलों ! आई ? ती तुझी नथ मला मिळाली. त्याच वेळीं तिनें आनदाश्रूंनीं, प्रेमाश्रूंनीं डोळे मिटले ! माझ्या भावानें केवळ दारूच्या व्यसनाकरतां, वर्गणीकरता, आपल्या आजीची बुगडी घेतली होती; मी त्याच्याच भावानें नथ चोरली, केवढी ही अघटित घटना ! *

कर्तबगारीनें इस्टेट संपादन करणाऱ्या, कर्तृत्वशाली, अशा त्या वडिलांच्या पोटीं माझा जन्म झाला होता. माझा जन्म झाला, तेव्हां वडील पुनः व्यापारांतील नुकसानीमुळें विपत्तीत आले होते. त्यांच्या मुनिमाने आंतबट्ट्याचा व्यापार केल्यामुळें, जबर ठोकर बसून वडिलाच्या आयुष्यांत पुनः उलथापालथ झाली होती. तो पायगुण माझा म्हटला तरी चालेल !

माझ्यापेक्षा वडील तिघे भाऊ होते. ते सर्व वेदाभ्यासी होते. पण माझें चारित्र्य, चरित्र, कांहीं वेगळेंच होणार असल्यामुळें मी मात्र त्या सर्वांहून विलक्षण रीतीनें वागूं लागलो होतों. त्यांतूनच माझा हिमालयांतील रात्रीचा ७०० मैलाचा प्रवास निर्माण झाला ! व हिमालयांतील अनेक अद्भुत चमत्कार मी पुढे पाहिले ! पण त्या सर्वांचा जो पाया लहानपण, तें मला आधीं सांगितलें पाहिजे ! म्हणजे वाचक माझ्याबरोबर योग्यरीतीनें प्रवास करूं शकतील.

लहानपणीं माझे एक जवळचे नातेवाईक होते. ते गांजा अतोनात ओढत असत. मी एकदां त्यांच्या घरीं गेलों होतों. चिपळूणपासून तें गांव जवळच होतें. तेव्हां मी अवघा ९ वर्षांचा होतों. ते माझे नातेवाईक एक सुप्रसिद्ध वकिल होते. पण गांजाचें त्याना फारच भयंकर व्यसन लागलें होतें. गांजाची चिलीम ओढून ते बहिर्दिशेला निघून गेले, म्हणजे कुतूहलानें, ‘ हा चिलमीचा

---

*श्री. शं. दि. करंदीकरकृत “ मी दारुड्या कसा झालों ? ” किं. १२ आणे, हें रहस्यपूर्ण पुस्तक वाचा. पत्ताः—बी. एन्. कुलकर्णी, एस्. बी. लिथो प्रेस, सांगली.

काबळे हाकायची नौकरी पत्करून दोन लाखांचे
असामी झालेले भाग्यवंत



कै. श्री. बाळकृष्ण बगाजी चितळे

काय प्रकार आहे ?' हें जाणण्याच्या हेतूनें, मी गांजा ओढण्याचा चुकून प्रयत्न सुरू केला होता! एक दिवस मी चिलीम ओढून पाहण्याच्या प्रयोगांत तल्लीन झालो असता, आकस्मात परतून ते माझे नातेवाईक, माझ्यापुढें दत्त म्हणून उभे राहिले! त्यांना माझ्या त्या गाजासेवनाचें फार आश्चर्य वाटलें! ते म्हणाले, "केशव ? तूहि गाजा ओढतोस ? किती दिवस झाले बाबा या उद्योगाला ?"

मीहि भीत भीत, पण खरें तेंच उत्तर दिलें, "होय, ओढत असतों. तुमच्या घरीं येऊनच मी हें व्यसन शिकलों!"

नातेवाईकानी माझें पारिपत्य करण्याच्या ऐवजीं मला शाबासकी दिली! ते म्हणाले "बरे तर! ओढ! खुशाल, चापून ओढत जा! भिऊं नको!" त्या सहानुभूतीचा, उत्साहाचा माझ्यावर फार वाईट परिणाम झाला. मी पुढें त्या गांजाच्या व्यसनाधीन झालों! लहान वयांत अशा रीतीनें गांजा ओढणें ही फार भयंकर गोष्ट होती. पण गुरुच असा खबीर भेटला, कीं, त्यानें मला त्या व्यसनाचा आशीर्वादच दिला! माझ्या त्या गाजागुरुजींनीं केवळ गांजाच्या नादात सर्व इस्टेटीची, वकिलीवृत्तीची राख करून टाकली! आणि शेवटीं तेहि स्वतः धुळीस मिळाले. पण माझी हकिकत निराळी! माझें भवितव्यहि निराळें! त्या व्यसनातील नैपुण्याच्या जोरावर, पुढे मी ८ हजार नग्न संन्याशांचे महतपद मिळविलें!

त्या नातलगाच्याकडून पुनः मी चिपळुणास आलो. चोरून गाजा ओढण्याची संवय नित्य वाढू लागली. एक दिवस माझ्या थोरल्या भावानें मला त्या व्यसनांत पकडून घरच्या न्यायाधिशापुढे—कोर्टापुढें उभें केलें. घरचें मॅजिस्ट्रेट कोर्ट म्हणजे माझे वडील; आणि त्याची शिरस्तेदार किंवा सिव्हिल कोर्ट म्हणजे आई! मॅजिस्ट्रेट कोर्टात माझा खटला सुनावणीस निघाला; तो असा कीं, 'मी केशव विडी ओढत असतो. केशव विडी ओढतो कीं नाहीं ?' माझ्या थोरल्या भावाला वाटलें होतें, मी विडीच ओढावयास शिकलों आहे. मी गांजा ओढत होतों, हें त्यास अज्ञानानें समजलें नाहीं!

वडिलानी मला विचारलें, "केशव ! खरे सांग, तूं विडी ओढतोस कीं नाहीं ?"

मला खोटें रडण्याचें, मार खाण्याच्या आधींच रडून आकाशपाताळ एक करून सोडण्याचें सोंग उत्तम साधत असे. मी ओक्साबोक्शी रडण्याचें सोंग करून वडिलाना म्हटलें, "हा दादा गाजा ओढतो; मला ओढ म्हणत होता; मी ओढत नाहीं म्हटलें, म्हणून माझ्यावर खोटा आरोप करून, यानें तुमच्यापुढें आणले आहे !" वडिलानी मला खूप तंबी दिली; धाक दाखविला. थोरल्या भावानें माझ्या असत्याचा पूर्ण इन्कार केला. त्यानें खरी पाहिलेली हकिकत वडिलाना पुनः पुनः सांगितली. शेवटीं त्या निर्णयाकरता आई पुढें झाली ! आणि तिनें आम्हा दोघानाहि उभें करून दोघाच्याहि तोंडांचा वास घेतला ! अर्थात थोरल्या भावाच्या तोंडास मुळीच वास येत नव्हता; माझ्या तोंडास मात्र भरपूर गांजाचा वास येत होता !

आई त्या वासानें भयभीत होऊन, कोर्टाला, एकदम ओरडून म्हणाली, "या केशानेंच तंबाखु ओढली आहे. याच्याच तोंडास वास येतो आहे ! खात्रीनें यानेंच तंबाखु ओढली...!"

तशाहि स्थितींत मी आग्रहानें म्हटलें, "नाहीं ! मी तंबाखु ओढली नाहीं ! विडी ओढली नाहीं !"

तेव्हां मला मॅजिस्ट्रेट कोर्टाकडून – बाबांच्याकडून जबर शिक्षा सुनावण्यात आली. पण तेवढ्यानें माझें व्यसन सुटलें नाहीं. फक्त मी 'गंजड्या' म्हणून त्यांच्या उपहासास पात्र ठरलों !

उपहास ! उपहास होणें ही फार वाईट गोष्ट आहे. सर्व रोगांचें मूळ जसें खोकला हें आहे, तद्वतच सर्व भांडणतंट्यांचें मूळ, एकानें दुसऱ्याला हंसणें हें आहे. उपहास होणें हें भांडणांचें मूळ आहे. ती तेवढी गोष्ट झाली नसती, तर कदाचित् मी भावी आयुष्यांत एक सुधारलेली निराळीच व्यक्ति होऊन राहिलों असतों.

'मी गाजा ओढतों,' ही गोष्ट माझ्या मित्रपरिवारांत स्फोट झाल्यावांचून, समजल्यावाचून राहिली नाहीं. त्यावेळीं मीं मराठी शाळेंत शिकत होतो. माझ्या गाजा ओढण्याचा गवगवा नुसता मित्रपरिवारांतच होऊन राहिला असें नव्हे, तर सर्व शाळाभर 'केशव गांजा ओढूं लागला,-विडी ओढूं लागला,' म्हणून माझी ख्याति ताबडतोब झाली! मला त्याचें फारच दुःख झालें. माझ्या दुःखाचा जो कडेलोट झाला, तो निराळ्याच प्रकारें. कोर्टमार्शल चौकशी झाल्यानंतर दुसरेच दिवशीं, शाळेत ती बातमी, एकाद्या अत्तराच्या घमघमाटाप्रमाणें पसरली! आणि मी त्या दिवशीं वर्गात पाटीदप्तर घेऊन पाऊल टाकतांच, प्रत्येक विद्यार्थ्यानें हाताची लटकी चिलीम करून, माझ्या-पुढें दम मारून दाखविण्याचा भरपूर साग्रसंगीत अभिनय करून दाखविण्यास कमी केलें नाहीं! त्यामुळें, माराच्या शिक्षेवर अधिकच मीठ चोळलें गेलें. वर्गांचे शिक्षक आल्यावर त्याच्या देखतहि माझी भरपूर विटंबना झाली. त्यामुळें सर्व वर्गात, सर्व शाळेत मी गांजेकस, गाजाबहादुर, गंजड्या म्हणून ठरलों! माझ्या उपहासास पारावार राहिला नाहीं! सर्व प्रकारें मला अपकीर्ति सोसावी लागली. ती माझी निंदा मला इतकी असह्य झाली, कीं, दुसरे दिवसापासूनच मी शाळेला रामरामच ठोकला! अशा रीतीनें माझ्या विद्यार्जनाचा आकस्मात भयंकर शेवट झाला.

पण तेवढ्या निंदेनें मी भ्यालों काय? नाहीं! गांजा मिळविणें त्या वयांत कठिण काम होतें, पण माझें व्यसन मुळींच सुटलें नाहीं. उलट, व्यसन गुप्तपणें कसें चालवावें हें मला समजलें; नव्हे, त्याचे मला एक प्रकारें शिक्षणच मिळालें! मी विचार केला, एवीतेवीं आपलें नांव गावांत बद्नाम झालें खरें; मग गाजा सोडून देण्यांत, सेवन न करण्यांत काय बहादुरी आहे? माझें व्यसन चालू राहिलेंच पाहिजे!

वडिलानी मला तदनंतर सुधारण्याचा पुष्कळच प्रयत्न केला, पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं; उलट मी अधिकच जागरूक व्यसनी झालों! मी त्यानंतर एक भयंकर विचार केला, कीं, आपण आतां घरदार सोडावें; आणि कोठें तरी पलायन करावें! तसा दृढनिश्चय करून मी एक दिवस संधी साधून

घराबाहेर पडलों. तो प्रथम पायी पायीं प्रवास करीत, ' मला आईबाप कोणी नाहींत '—म्हणून खोटें रडून लोकांना सागत, कऱ्हाडास येऊन पोचलों. भूक लागली कीं रडावयाचें एवढें मला ठाऊक होतें ! त्यामुळें उपासमार झाली नाहीं ! कऱ्हाडला जाऊन एका ठिकाणीं मी तसा रडत बसलो असतां, एक ब्राह्मण पोलीस माझ्याकडे आला, आणि त्यानें माझी नीट चौकशी केली. मी त्याला सर्व खोटे नाटे सांगितलें. त्या शिपायाच्या ओळखीचे एक वकील तेव्हा तेथे होते. त्याना मूलबाळ नव्हतें; पुष्कळ इस्टेट होती. त्याना एकादा गरीबाचा मुलगा पाळावयाचा होता. शिपायानें मला त्या वकिलाच्या घरीं प्रवेश करून दिला. मी तेव्हा दिसण्यांत चांगला, आणि मुंज झालेला होतों. वकिलाना मी फार आवडलो. त्यानी माझी आपल्या बायकोकडून उत्कृष्ट व्यवस्था केली. जसा कांहीं मी त्याचा औरस मुलगाच ! चार आठ दिवस गेल्यावर त्या वकिलाच्या मनांतून मला शाळेत पाठवावें असें आले. माझ्या बाबतींत त्यानीं फार मोठ्या महत्त्वाकांक्षा मनात धरल्या; आणि त्यानी मला एक दिवस विचारलें, " अरे ! तुला इथल्या शाळेंत घालावयाचें आहे, तेव्हा तुझी सारी हकिकत सांग; म्हणजे तुझ्या शाळेच्या हेड्मास्तरकडून, तूं शाळा सोडल्याचा दाखला पोस्टानें मी मागवून घेईन ! आणि मग तुला शाळेंत पाठवीन ! "

" दाखला ? आणि पुनः शाळा ? " जें मला नको होतें, तेच अचूक पुनः माझ्या वांटणीस आलें. पण तेव्हांहि मी भ्यालो नाही. मी न भितां, त्या आश्रयदात्या वकिलास चापून उत्तर दिले, " माझे आईबाप वारले आहेत ! मी पालगड गांवचा राहणारा ! तिथल्या मराठी शाळेंत माझे शिक्षण झाले ! "

माझ्या समर्पक उत्तरानें वकिलाना फार समाधान वाटलें. ते माझी भोळ्याभावानें समजूत घालीत म्हणाले, " तूं रडूं नकोस बाळ ! मी तुझें सर्टिफिकेट तुझ्या पालगडच्या मास्तरकडून आणवीन. तुला इथे नीट शिक्षण देऊन, पुढें वकीलहि करून टाकीन ! " मी तेव्हां, ' भावी वकील होण्यास ' संमति दिली !

पण त्या नंतर माझी मात्र पांचावर धारण बसली. वकीलसाहेब पालगडच्या हेड्मास्तरला दाखला पाठवून देण्यासाठीं पत्र घालतील, आणि पालगडच्या

शाळेंतच काय, पण पालगड गावांत, तालुक्यातहि माझ्या नांवाचा मुलगा नाहीं, असें हेड्मास्तर कळवितील, मग आपली अब्रू कशी राहणार ? छे, छे, तें सारें माझें खोटें बोलणें, माझ्या आंगलट येणारें होतें ! तेव्हां पुनः मी निश्चय केला, या वकील साहेबाच्या घरालाहि आपण कायमचा रामराम ठोकायचा !

वकिलानी तेव्हा मोठ्या हौसेनें आणि प्रेमानें माझ्या अंगावर बऱ्याच बहुमोल जिन्नसा घातलेल्या होत्या. ते सर्व सोन्यामोत्याचे दागिने मी हळूच काढले, आणि नीट बाधून वकिलांच्या एका खास पेटींत ठेवले. त्या सोबत एक चिठ्ठीहि लिहून ठेवली, कीं, "हे तुमचे सर्व दागिने मी येथें काढून ठेवलेले आहेत. मी पळून जात आहे. माझा तपास तुम्ही करूं नये. मी तुमचा एकहि दागिना घेतलेला नाहीं. माझे पहिले कपडे घेऊन मात्र मी, जात आहें !"

मी पळून गेल्यावर पुढे आतापर्यंत त्या वकिलाचे काय झालें, तें मला ठाऊक नाहीं. मी तात्काळ तें घर सोडलें, आणि पंढरपूरचा रस्ता धरला. मध्यंतरीं मार्गात मला पुष्कळच काबाडकष्ट करावे लागले. शामगाव नावाच्या एका खेडेगावात राहून, डोक्यावर शिधोरी घेऊन, गुरेहि राखावीं लागलीं ! त्यांतहि मी आनंद मानला. पण सागावयाची मुख्य गोष्ट, 'गाजा सुटला नाहीं !' शामगावहून मी पंढरपुरास जाऊन पोचलों. भिक्षेकऱ्यांच्या पंक्तीस जाऊन बसून, जय जय विठ्ठल, जय जय विठ्ठल, असा घोष करीत, आजुबाजूचा भाग दणाणून सोडला ! कोठून माझ्या आयुष्यांत त्यावेळीं मला इतकें वैराग्य आलें होते ते एक विठ्ठल जाणें ! त्या वेळीं पंढरपूर-वारीचे दिवस होते. चिपळूणचा एक गृहस्थ आपल्या स्नेह्यासह वारीस आला होता. मी डोळे मिटून "जय जय विठ्ठल !' करीत बसल्याचें पाहून त्याला आश्चर्य वाटले. संशयानें तो माझ्या अगदीं जवळ येऊन आणि माझा चेहरा नीट निरखून पहात, आपल्या स्नेह्यास म्हणाला, "अरे ! हा तर आपल्या बाळकृष्ण बगाजींचा मुलगा ! इकडं कसा ?" "अरे केशा !" म्हणून त्यानें मला हाकहि मारली !

ते शब्द माझ्या कानांत एकाद्या तापलेल्या तेलाप्रमाणें, किंवा तापलेल्या लोखंडाच्या सळईप्रमाणें शिरले ! मी रागानेंच त्यांना म्हटलें, "कुठला केशा !

आणि कुठले बाळकृष्ण बगाजी ? माझं नांव सदाशिव नारायण केतकर; मी पालगडचा राहणारा ! कुठें पालगड आणि कुठं तुमचें तें चिपळूण !

त्या हाक मारणाऱ्या गृहस्थाबरोबर असलेला त्याचा स्नेही तेव्हां उद्गारला, " अरे, मुलांसारखी मुलें, माणसासारखीं माणसें पुष्कळ दिसतात. उगीच तुला आपलं, या पोराबद्दल वाटतं आहे ! "

तेव्हां तो मला हाक मारणारा गृहस्थ निश्चयपूर्वक आपल्या स्नेह्यास म्हणाला, " छे छे ! हा आपल्या बाळकृष्ण बगाजींचा मुलगा केशवच ! " असें म्हणत ते दोघे निघून गेले !

माझी मात्र भीतीने तारांबळ उडाली. मला वाटलें, 'आता येथें,– पंढरपुरांत, अधिक काळ काढणें ठीक नाहीं !' असें मनांत आणून, मी त्याच दिवशीं रात्रीं स्टेशन गांठलें ! मला एक गोष्ट ठाऊक झाली होती, कीं, रडण्याचें, रडत बसण्याचें सामर्थ्य हें कांहीं अपूर्व आहे. त्यानें दुसऱ्या मनुष्याचें खात्रीनें आकर्षण होतें. खऱ्या रडण्यानें परमेश्वरहि भेटेल ! मी स्टेशनवर प्लॅटफॉर्मवर जाऊन मोठमोठ्यानें रडत बसलों ! रडण्याचें माझें एक पालुपद ठराविक होतें. इतक्यांत गाडी आली. मला मोठमोठ्याने रडतांना पाहून गार्डाला दया आली. त्यानें माझी चौकशी केली. गार्ड होता कोकणस्थ ब्राह्मण; आडनांव साठे ! त्यानें मला आस्थेनें विचारलें, " बाळ ? तूं कोण ? कुठला ? आणि जाणार कुठं ? "

मी रडत रडत म्हटलें, " मी राहणारा मूळचा काशीचा. मला काशीला परत जावयाचे आहे. तेथें माझी एक सख्खी मावशी आहे. मला आईबाप नाहींत; ते पंढरपुरासच वारले ! मला काशीला जावयाचें आहे ! गार्डला पांडुरंगानें माझ्या बाबतींत बुद्धि दिली ! इतकेंच नव्हे तर त्या दयाळु गार्डानें माझी नीट व्यवस्था करून, माझ्याजवळ एक पत्रहि लिहून देऊन, आपल्या गाडींत बसवून घेऊन, योग्य मार्गानें त्यानें माझी इटारसीला रवानगी केली ! तेथून मी बनारसला सुखरूप जाऊन पोंचलों.

दोन लाखांची असामी वडिलानी संपादन केल्यावर बनारसला—काशीमध्यें त्यांनी दानधर्म करून केवढा नांवलौकिक संपादन केलेला होता, त्याची मला तेव्हा कल्पनाही नव्हती. दोन लाख मिळून सुस्थिती आल्यावर ते काशीला गेले होते. इतके जरी ते श्रीमंत झालेले होते, तरी त्यांच्या पिढीजात पोषाखांत थोडाहि बदल झालेला नव्हता. त्यांच्या पोषाखांत विशेष गोष्ट होती, त्यांच्या पंचाची! गुडघ्याखालीं त्यांचा पंचा नव्हता. पागोटें मात्र प्रचंड, गाडीच्या चाकाएवढें मोठें. तशा स्थितींत ते काशीला गेल्यावर एक दिवस सहज एका वाण्याच्या दुकानीं गेले. त्याना पाहिजे होती थोडीशी पिठी साखर! वडिलानी वाण्याच्या दुकानीं जाऊन विचारले, "साखरेचा खंडीचा भाव काय?"

वाणी हंसला! तो म्हणाला, "का हो ब्राह्मण भटजी, साखर तुम्हाला किती घ्यावयाची आहे? छटाक, अर्धा छटाक, शेर, पावशेर? खंडीचा भाव कशाला?" असें म्हणून त्यानें माझ्या वडिलाच्याकडे उपहासानें पाहिलें.

वडील म्हणाले, "तुझ्याजवळ किती साखर आहे?"

वाणी थट्टेनें म्हणाला, "आहे, दहावीस गोणी! आणखी तुम्हाला पाहिजे असली तर बाहेरून आणून देईन. किती लाखाची आपणांस खरेदी करावयाची आहे?" वाणी उपहासानें विचारीत होता.

वडिलानी गंभीरपणें उत्तर दिलें, "तुझ्याकडे दहावीस गोण्याच साखर आहे? मग तूं कांहीं फार **मोठा** व्यापारी दिसत नाहींस!"

वाण्याची पक्की खात्री होऊन चुकली, कीं, माझे वडील नुकतेच वेड्याच्या इस्पितळांतून बाहेर पडून काशींत आलेले आहेत! त्यानें त्यांची, गरीब फाटका ब्राह्मण म्हणून अधिकच थट्टा आरंभिली! वाण्यानें तेव्हा वडिलांच्या प्रश्नास उत्तर दिलें, "तुम्हाला भटजी जितकी साखर घ्यावयाची असेल, तितकी घ्या, खरेदी करा! पाहिजे तेवढी द्यावयाला मी समर्थ आहे. पैसे मात्र कनवटीला किती आहेत, ते आधीं मोजून पहा!"

वडिलांनी तशाहि स्थितींत गंभीरपणें पुनः विचारलें, "मग खंडी साखरेचा भाव सांग ना! मला खंडीभर साखर घ्यावयाची आहे, असें समज."

वाण्याची मात्र आता परिपूर्ण खात्री झाली कीं, या ब्राह्मणाला साखरेचें गोड वेड लागलेलें आहे! तोहि ईर्ष्येस चढून उपहासाने म्हणाला, "आधीं पैसे तर काढा! मग खंडी, दोन खंडी, चार खंडी, जी कांहीं साखर तुम्हाला पाहिजे असेल, ती देतो!" त्या वाण्याला त्या वेळपर्यंत सारी थट्टाच वाटत होती.

वडिलानीं निश्चयपूर्वक वाण्यास उत्तर दिलें, "पैसे काय आता इथे मी देईन, पण तूं, मी मागेन तेवढी साखर आतां इथेच देशील ना? नाहीं दिलीस तर तुझें सगळें दुकान लुटून नेईन! ठरला तुझा माझा सौदा! तुझ्या दुकानांत असेल नसेल तेवढी साखर मी खरेदी केली!"

वाणी अधिकच इरेस पडून म्हणाला, "मी या काशींतला सधन आणि मोठा साखरेचा व्यापारी आहे. भटजीमहाराज, तुम्ही सर्व साखरपेठच खरेदी करून टाकाना! बाजारांत उगीच चिमुटभरहि साखर शिल्लक राहावयास नको! आपण कोणत्या वेड्यांच्या इस्पितळांतून काशीला आलांत?"

वडिलांना आतां मात्र राग अनावर झाला. ते म्हणाले, "या थट्टेचा परीणाम फार वाईट होईल. मी पुनः एकदा तुला पूर्ण शुद्धिवर राहून सांगतों, कीं, तुझ्या दुकानात असलेली सर्व साखर मी घेतली! आणखी तुला जितकी पुरवता येत असेल तितकी मी घेण्यास तयार आहे. एक कणहि बनारसला ठेवावयास मी तयार नाहीं. करार मात्र आताच या क्षणीं केला पाहिजे!"

वाण्यानें स्तंभितपणें विचारलें, "पैसे?"

वडिलानीं उत्तर दिलें, "या बैठकीलाच!"

ब्राह्मणाची फजिती करावी म्हणून वाण्यानें आपल्या मुनीमाला दुकानांत किती साखर आहे हें विचारावयास सांगितलें.

पुनः वाणी उपहासानें म्हणाला, "माझें सर्व दुकान खरेदी करावयाचें आहे कीं, सर्व साखरपेठ?"

वडिलानीं खणखणीत स्वरांत उत्तर दिलें, "मी ब्राह्मण आहे; माझ्या तोंडांतून जो शब्द निघाला, तो मी परत कधीं घेणार नाहीं. आपला शब्द परत

घेणें म्हणजे, आपली खालीं जमिनीवर पडलेली थुंकीच स्वतः पुनः आपण चाटून घेणें आहे! मी ब्राह्मण आहे. मी असें कर्म करीत नाहीं. आणि तूंहि व्यापारी आहेस, तेव्हां तूंहि असें निंद्य वर्तन करूं नकोस. तुझा माझा सौदा आता ठरला आहे! मी खुळा असो कीं शाहणा असो, तुझ्याजवळ असलेली सर्व साखर मी खरेदी केली आहे! चल, माप कर!"

वाणीहि ईर्ष्येस पेटलेला होता; त्यानें म्हटले, "पैसे काढा! ४० हजार रुपयांची साखर मी आता तुम्हाला देतों."

वडिलानीं उत्तर दिलें, "घेतली साखर! चाळीस हजारांची साखर मी खरेदी केली. काशींतील सर्व साखर एवढीच आहे काय?"

वाणी म्हणाला, "एवढीच! घ्या!"

वडिलानीं काखोटीचें दप्तर काढून त्या वाण्याच्या दुकानांतच बसून हुंडी लिहून दिली! सही केली, "--बाळकृष्ण बगाजी चितळे, चिपळूण! आज मुक्काम काशी!"

तीं अक्षरें त्या व्यापाऱ्याच्या दृष्टीस पडतांच वीज चमकावी त्याप्रमाणें त्याच्या डोळ्यापुढें त्या सहीनें अंधारीच आली! तो घाबरून वडिलांचे पाय धरीत म्हणाला "आपणच बालकृष्ण बगाजी चितळे? चिपळूणच्या पेढीचे मालक?"

वडिलानीं उत्तर दिलें, "होय! पण आता हा व्यवहार मोडणार नाहीं. साखर मला पाहिजे. काशीस माझी पेढीच आहे."

वाणी फार रदबदली करूं लागला; पण करार होऊन चुकला होता. त्याला साखर पुरवणें भागच होतें. सांगावयाचें तात्पर्य एवढेंच होतें, कीं, तीन दिवस काशीला बाजारपेठेंत चिमूटभर साखर राहिली नाहीं. सर्व साखरेची खरेदी वडिलानी केली. तो त्यानी तेव्हां एक मोठा व्यापारच सहज केला. सर्व साखर खरेदी करून पुनः तीच साखर तिथल्या व्यापाऱ्यांना तेजीमध्यें परत विकली; त्यांत त्यांना ५ हजार रुपये नफा झाला! त्याचीहि त्यांनी पुनः साखरच खरेदी केली, व ती ब्राह्मणांचे कडून लुटली! जितकी साखर ज्या ब्राह्मणाला नेतां

येईल तितकी त्यानें न्यावी, असें त्यानी जाहीर केलें. भिक्षुकांची खूप गर्दी उसळली. एका लोभी ब्राह्मणानें तर एक पोतें उचलून नेण्याची प्रतिज्ञा केली; पण पोते भरून पाठीवरून नेत असतां दहापांच पावलें जातो न जातो, तोच पोत्यानिशी पाठीचा कणा मोडून खालीं पडला! मोठ्या कष्टानें त्याच्या पाठीवरचें पोतें दूर करून त्याचा जीव वांचविण्यांत आला. केवळ वडिलाच्या पंचावरून आणि पागोट्यावरून साखरेची वरील गोष्ट विकोपास गेलेली होती.

काशींत माझी ना ओळख, ना पाळख. गंगेच्या घांटावर बसून पुनः मी रडूं लागलों. तेथेंहि एका ब्राह्मणाचें माझ्याकडे लक्ष वेधलें, आणि त्यानें मला सहाय्य केलें.

काशीस कांहीं दिवसांनीं मला एका बड्या साधुमहाराजांची संगत मिळाली. ते एका प्रख्यात हिंदी राजाचे धर्मगुरु होते. अर्थात् त्यांच्या कृपेनें मला तेथेंहि नियमित गांजा ओढावयास मिळूं लागला, हें सांगावयास नकोच. बड्या साधुमहाराजानी माझी चांगली परीक्षा करून, व आपला शिष्य म्हणून मला आपल्याबरोबर नेपाळांत प्रथम नेलें. त्या वेळीं गुरुसेवेंत, आणि विद्यार्जनाकरतां, त्याचप्रमाणें योगाभ्यासाकरतां म्हणून, मी एकंदर नऊ वर्षें हिमालयांत प्रवास करून काढलीं. तो रोमांचकारी, रहस्यपूर्ण आयुष्यवृत्तात मी पुढील प्रकरणांत सागेन!

## प्रकरण ५ वें



# स्वामींचें अमोघ ब्रह्मचर्य

मनाला एकसारखी तळमळ लागली होती, कीं, "देव आपणाला भेटावा!" त्यासाठीं मी गुरु शोधत होतों. जो गुरु मी केला होता, त्याच्यापासूनहि मला पाहिजे तसे समाधान लाभले नाहीं. नेपाळहून बद्रिनाथ, बद्रिकेदार याच्याहि यात्रा करून, हिमालयात ठिकठिकाणीं मी तेव्हा वास्तव्य केलें; पण आयुष्याला दिशा दाखविणारा खरा गुरु भेटेना. तशा स्थितींत पहिल्या त्या गुरुच्या सेवेत एकंदर मी ९ वर्षे काढलीं. त्या नऊ वर्षांत गुरुदेवाकरता, त्यांच्या सेवेकरता मी पुष्कळच खडतर तपश्चर्या अंगिकारली; त्या अवधींत योगाभ्यासाचे ज्ञान करून घेतलें. त्या नऊ वर्षांत माझ्यांत फारच स्थित्यंतर झाले होतें. तेव्हा मी कडकडीत ब्रह्मचर्य पाळलें होतें. 'ब्रह्मचर्यव्रत' म्हणजे एक अपूर्व आनंद आहे. त्या आनंदाची खरी कल्पना, खऱ्या ब्रह्मचाऱ्यालाच येईल. नाटकी आणि सिनेमावाल्या ब्रह्मचाऱ्याला ती कल्पना येणें शक्य नाहीं. श्री ज्ञानेश्वरानीं 'ब्रह्मचर्यव्रता'ची जी महत्त्वाची व्याख्या केली आहे तीच खरी ब्रह्मचर्याची व्याख्या. त्यानीं म्हटलें आहे कीं, जन्म घेतांना आईचा-स्त्रीचा, जो कांहीं स्पर्श झाला, तेवढाच स्त्रीस्पर्श! अन्यथा ब्रह्मचर्य व्रत हेच खरे व्रत. त्यावेळीं माझें वय १९।२० वर्षांचें असेल. तेव्हा मी केवळ कंदफलांवरच रहात असे.

एक दिवस गुरुदेव मला म्हणाले, "अरे केशव! तूं आतां एकदा आपल्या घरीं जाऊन वडिलांना भेटून ये; तुला इकडे येऊन फार वर्षे झालीं आहेत."

माझ्याहि मनांत ती गोष्ट येत होती. मी खूप लांबलचक सुरेख जटा वाढविल्या होत्या. शरीर पिळदार आणि गोटीदार केलें होतें. अनेक गूढ विद्या, मंत्र, औषधी वनस्पती यांचें थोडेबहुत ज्ञानहि प्राप्त करून घेतलें

होतें. गुरुदेवानी जा म्हणताच, घरीं जाण्याची माझी उत्सुकता अधिकच वाढली; आणि जटाजूटधारी बालयोग्याच्या वेशात मी चिपळुणास गेलों.

पण हाय ! घरीं जाऊन मीं कोणतें दृश्य पाहिलें ? माझे तिघे वडील भाऊ, अल्प वयात लग्न करून घेऊन परलोकवासी झाले होते. त्याच्या बायका विधवा, नव्हे सोवळ्या झालेल्या होत्या. अल्पवयातील त्या बालिकाची ती स्थिति महान योग्यांच्या हृदयाचाहि थरकांप करणारी होती; योग्यालाहि महादुःखांत बुडवून टाकणारी होती. माझा काळजांत त्या देखाव्याने चर्रर झालें. मनाला उपरति झाली, कीं, आपण पुनः घरीं कशाला आलों ? हें दगडालाहि पाझर फोडणारं दृश्य बघण्याकरतांच ना ? छे छे ! मनुष्याने लग्न करणें, ऐन तारुण्यांत त्यानें मृत्यु पावणें, आणि त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या तरुण पत्नीनें वपन करून, समाजांत विडंबनास पात्र होणें, यापेक्षा जगात स्त्रीजातीला वाईट गोष्ट कोणती ? त्यासाठीं पुरुषाने लग्न न करणेंच उत्तम !

पण तो लग्न न करण्याचा दृढनिश्चय, माझ्या २० व्या वर्षाचा होता. पुढें मी संसारी झालों !—संन्यासी असतांना ससारी झालों ! ! ती माझी कथा पुढें येईल. मात्र चिपळुणास पोचल्यावर तो हृदयद्रावक देखावा पाहून, ब्रह्मचर्यव्रत पाळण्याची अधिकच दृढ प्रतिज्ञा केली; आणि त्याप्रमाणें वागलोंहि. गांजाचें व्यसन मात्र सुटलें नव्हतें. त्या शिवाय मी थोडाहि भ्रष्ट झालो नव्हतों. योगमार्गाचें साधन करून मला परमेश्वर शोधावयाचा होता; जगांतील ते अपूर्व महा सत्य शोधावयाचें होते; तें मी माझ्या पुढें ध्येय ठेवलें होतें; असो.

चिपळुणास गेल्यावर प्रथम मी वडिलाना आणि आईला साष्टांग नमस्कार घातला. त्यांना अतिशय आनंद झाला. वडील डोळयांत पाणी आणून म्हणाले, "...तूं आलास बरे झालें; माझी स्थिति सर्व प्रकारें आता खालावली आहे. तुझें मला सहाय्य पाहिजे. तुझे थोरले भाऊ इहलोकांतून निघून गेले आहेत. मुनीमाच्या अव्यावहारिक धोरणानें माझा व्यापारधंदा नष्ट झाला आहे. माझ्या आयुष्यांत पुनः क्रांति झाली आहे. आतां तूं पुनः, परत कुठें जाऊं नको ! "

वडिलांच्या त्या शब्दांनीं माझ्या अंतःकरणाची कालवाकालव केली. मनांत विचार आला, कीं, वडिलांना वृद्धापकाळीं सहाय्य करणें, हा पुत्रधर्म आहे. तो

धर्म मी आधीं पाळला पाहिजे. माता पिता हे सुद्धां आपले देवच नाहींत काय ? त्याची भक्ति करणें, म्हणजे परमेश्वराची भक्ति करणेंच आहे. वडिलांना दारिद्य आलें आहे, तर तें आपण नष्ट केलेंच पाहिजे. मग त्यासाठीं कोणतेंहि क्षुद्र, हलकें काम करावयास लागो ! द्रव्यप्राप्तिकरता मी मार्ग शोधावयास लागलो. तेव्हां मी दहा हजार रुपये मिळविण्याचा संकल्प केला. तत्क्षणीं जटाभार पार उतरून टाकला. कोणत्या सन्मार्गाचें आचरण करून पैसे मिळवावे, हा फारच महत्वाचा प्रश्न होता. विद्या, विश्वविद्यालयाची डिग्री, अपूर्व बुद्धिमत्ता, किंवा एकादी अपूर्व कला, या सर्वांचें माझ्याजवळ भोपळ्या-एवढे पूज्य होते ! पण जादुविद्येचा लहानपणापासून मला नाद होता; त्या विद्येचा उपयोग करून घ्यावयाचें मी ठरविले ! त्याप्रमाणें लगेच हस्तपत्रिका काढून, हिमालयातील जडीबुटींचें, मंत्रतंत्राचें, अंगाऱ्या धुपाऱ्याचें साधन मी सुरू केलें. आणि तेव्हापासून माझी अगदीं ठाम समजूत झाली, कीं, **भुतें मनुष्याला अतोनात द्रव्य-सहाय्य करतात !** ताईत, दोरे या केवळ प्रत्यक्ष सिद्धीच आहेत ! मीहि ताईत आणि अंगारे देऊं लागलो. खर्च फार नव्हताच ! तेव्हा माझा ‘ **बलभीम ताईत** ’ फार गुणकारी, प्रभावी, आणि लोकप्रिय ठरला होता ! लोकाना गुण येतो कीं नाहीं, याचा मी विचारच केला नाहीं. मला पैसे मिळतात कीं नाही हा मुख्य प्रश्न होता; आणि तो प्रश्न समाधानकारक रीतीने सुटण्यास प्रारंभहि झाला. वडिलांना मी ताबडतोब दरमहा ३०।४० रुपयांची सहज मदत करूं लागलो. हळूहळू मी माझें अवडंबर वाढविलें. जादूचे, मोहिनीविद्येचे, भुते काढण्याचे, असे नानाविध प्रयोग मी सुरू केले. भुतामध्यें तर अनेक तऱ्हा आणि अनेक जाती होत्या; त्यांच्या थोड्याशा जाती मी येथें देतो.

( १ ) **भूत किंवा पिशाच्च** ( २ ) ब्रह्मराक्षस ( ३ ) वीर ( ४ ) बीर ( ५ ) पीर ( ६ ) पितर ( ७ ) पिंपळावरचा मुंजा ( ८ ) साधा वेताळ, व ( ९ ) आग्या वेताळ ( १० ) सटवी ( ११ ) मरिआई ( १२ ) डाकिनी ( १३ ) शाकिनी ( १४ ) यक्षिणी ( १५ ) अप्सरा किंवा परी ( १६ ) भैरव ( १७ ) भवानी ( १८ ) डाइस. या प्रत्येकाचें मी वर्णन करूं लागलों तर

एक स्वतंत्र ग्रंथच निर्माण होईल. व तसा ग्रथ लिहिण्याचा माझा मानसहि आहे. अमावास्या आणि पौर्णिमा म्हणजे या धंद्यातील लोकांची चादरात-रुपयांची पौर्णिमाच. थोडक्यांत तदनंतर सांगावयाचें म्हणजे मी लौकरच एक नामांकित जादुगार झालो. दुनिया झुकत होती, झुलविणाराच पाहिजे होता! मी तेव्हा वाचेनें, पोषाखाने, आचरणानें अगदीं नवीन मनुष्य झालो. जीभ कापून हळदकुंकुवाचा ढीग पाडून दाखविणे, हातचलाखीचे अनंत प्रयोग, पत्त्याचे प्रयोग, जड वस्तूंना सचेतन करण्याचे प्रयोग, नजरबंदीचे प्रयोग, घड्याळांचे स्तंभन विद्येचे प्रयोग, असे नाना प्रयोग, मी सुरू केले. आणि कांहीं ठरातिक काल खूप लाबवरचा, हजारो मैलाचा दौरा काढून जवळजवळ दहा हजार रुपयाची कमाई करून वडिलाना आणून दिली. त्यावेळीं वडिलांना अत्यंत आनंद झाला. तेव्हाचा माझा युरोपियन पोषाख, त्या पोषाखावरचे हजारो बिल्ले, सर्टिफिकेटाचीं लांबलचक भेंडोळी रंगीबेरंगी मोठमोठ्या जाहिराती, या सर्व गोष्टी पाहून, माझ्या वडिलाना व आईलाहि फार आश्चर्य वाटलें. पूर्वीचा मी जटाजूटधारी संन्यासी पण आता एकाद्या काळ्या अव्वल साहेबाच्या वर मी राहणीनें राहू लागलो, हे पाहून त्यावेळीं वडिलांना विस्मय न वाटेल तर काय होईल? केवढे माझ्यांत स्थित्यंतर, वेषांतर झाले होतें!

बायकांच्या कल्पना आणि त्यांचीं मनोराज्यें हीं पुरुषांच्यापेक्षां केव्हाहि भिन्नच असतात. ती माझी भरभराट, आणि साहेबी थाटमाट, ऐश्वर्य पाहिल्यावर साहजिकच आईला आणि सर्वांनाच वाटलें, कीं, 'केशवाचे आतां लग्न करावें!' त्या दृष्टीनें प्रयत्न सुरू झाले; जो तो त्या धोरणाने माझ्याशीं बोलूं लागला. पण 'लग्न' म्हटलें कीं, माझ्या अंगावर कांटाच येत असे. मी मरेन कीं काय, ही भीति सर्वांत मला अधिक वाटत होती! त्या भीतीचा पगडा तेव्हा माझ्यावर विशेष होता. लग्नाचा प्रश्न मी टाळत होतों. पण एका गृहस्थानें तेव्हा आपल्या मुलीकरतां मला इतकी कांहीं गळ घातली, कीं, लग्नाचा विचार करणें मला भागच पडलें. लग्न करावें, असें मनांत येऊं लागलें; आणि पूर्वीचा अविवाहित राहण्याचा माझा निश्चय तेव्हा कांहीं काल

डळमळला! मी माझ्या लग्नाकरतां खूप तयारी चालविली; माझ्याजवळ तेव्हां द्रव्य मुबलक होतें. बहुतेक सर्व दागिने मी तयार करविले; लग्नास लागणारा भारी किंमतीचा सुंदर कपडालत्ताहि खरेदी केला; आणि मुहूर्त पाहून ४।८ दिवसांत माझें लग्न होण्याचेहि निश्चित ठरलें!

पण, माझें मन कुठें लग्नास तयार होतें? ते मुळींच तयार नव्हतें! त्यानें ऐन वेळीं दगा दिला! पुनः मी शेवटीं मूळ निश्चयाकडेच वळलो. आणि पुनः जो दृढनिश्चय केला, तों दागदागिन्याच्या, कपड्यालत्त्याच्या आणि जादूच्या पेट्यांसह मी एकदम थेट हरिद्वारच गांठलें! त्यावेळीं मला पराकाष्ठेचें वैराग्य उत्पन्न झालें होते. वाचकाना सत्य सांगूनहि खरें वाटणार नाहीं, अशी माझी तेव्हा स्थिति झाली. मी त्या अलंकाराच्या, वस्त्राच्या, जादूच्या सामानाच्या सर्व पेट्या जशाच्या तशा, गंगेच्या विशाल प्रवाहात नेऊन कोणाच्या हातीं न लागतील अशा खोल आणि दूरवर सोडून दिल्या! त्यावेळीं मी पुनः संन्यास धारण करण्याची प्रतिज्ञा केली, आणि ताबडतोब वडिलाना आणि मुलीच्या बापास निस्पृहपणें, निर्लोभपणें पत्र लिहिलें, कीं, "आणखी काहीं काल मला लग्न कर्तव्य नाहीं. परमेश्वर अजून मला भेटलेला नाहीं. मनाला पाहिजे तसे समाधान नाहीं. शिवाय अंतर्ज्ञानानें मला असें समजलें कीं, ज्या मुलीशी माझें लग्न व्हावयाचें आहे, तिच्या कमनशिबानें, फारच थोड्या कालांत तिला भयंकर देवी येतील व त्यांत तिचा शेवट होईल! म्हणून मला लग्न कर्तव्य नाहीं!"

सांगावयाचें आश्चर्य असें, कीं, माझें भविष्य खरे ठरलें. फारच थोड्या कालांत, त्या मुलीला खरोखरीच देवी येऊन तिचा मृत्यु झाला, असे मला मागाहून वृत्त समजलें. मी मात्र तेव्हा त्या लग्नाच्या बेडींतून सुटलों.

जादूच्या विद्येचाहि मला कंटाळा आला होता. कारण, त्यात सारें खोटें! लोकांची सारी दिशाभूल—फसवणूक! हें पाप आतां पुरें झालें असें मला वाटलें. मी हजारो भुतें काढलीं; बाटलींत भरलीं; जमिनींत गाडलीं; पण, एकहि खरें भूत मला आढळलें नाहीं! भुताला पकडण्याकरतां मी जंग जंग पछाडलें आहे, पण अस्सल भूत जग ज्याला भूत म्हणून म्हणतें, तें माझ्या

कधींच दृष्टीस पडलें नाहीं. सर्व जादुगार लबाड आहेत, असें मी माझ्या अनुभवानें सांगतों. सर्व कांहीं लबाडी आहे, फसवणूक आहे. जगांत मुळीं भूत नाहींच. मी खूप तपास केला आहे, भगीरथ प्रयत्न केला आहे. अनुभवासाठीं आयुष्याचा पुष्कळच भाग मी खर्ची घातला आहे, आणि आतां मी खात्रीनें सांगत आहें, कीं, देव देव म्हणून ज्याला म्हणतात तो देव जगांत कोठें दिसण्याजोगा नाहीं. निदान चर्मचक्षूंना तरी तो दिसण्याजोगा नाहीं. जगांत कोठेच खरीं भुतें नाहींत! 'जादू' म्हणजे केवळ एक फसवणूक आहे. खरें समाधान त्यांत मिळणार नाहीं. अंगाऱ्याधुपाऱ्यानें बायकांना मुलें झालीं असतीं,—होत असतीं,—तर नवऱ्यांची काय जरूरी आहे? तसा खडखडीत सवाल तुकोबांनीहि केलेला आहे. परंतु लोकाची अंधश्रद्धाच, भोळाभावच, असा विलक्षण आहे, कीं, मी सत्य सांगावयास गेलों तरी लोकांना तें पटणार नाहीं. पण कटु सत्य म्हणून स्वानुभवाने मी सागत आहें, कीं, सगळे महाराज हे खोटे, ढोंगी आहेत. त्याना परमेश्वर मुळींच कधीं भेटलेला नाहीं. सगळ्या बुवांचे चमत्कार हेहि साफ खोटे आहेत; त्यांत काहींहि तथ्य नाहीं. सर्व कांहीं लबाडी, थोतांड आहे. तशी पूर्ण खात्री झाल्यावर मला तर त्या विद्येचा अगदीं वीट आला होता! वास्तविक मी फार मोठमोठ्या ठिकाणीं म्हणजे कलकत्ता, कराची, दिल्ली वगैरे ठिकाणीं हिंदी आणि युरोपियन दोन्ही समाजांपुढें अद्भुत जादूचे प्रयोग केले होते. पण सर्व काहीं खोटें. सत्याचा लवलेशहि त्यांत नाहीं. म्हणून पुनः परमेश्वर शोधण्याकडे, त्या कार्यासाठीं गुरु शोधण्याकडे माझी प्रवृत्ति झाली. ती माझी व्याकुल स्थिति इतक्या थराला पोचली होती कीं, अहोरात्र मी परमेश्वरासाठीं रडत होतों; अश्रूंच्या धारा चालल्या होत्या. एकाद्या लहान मुलाप्रमाणें अश्रु ढाळीत मी पुकारा करीत, परमेश्वराला हाका मारीत, चहूकडे फिरत होतों; आणि देवाला हरतऱ्हेनें आळवून, प्रार्थना करून म्हणत होतों, कीं, देवा! मला तुझ्या भेटीसाठीं एकादा तरी चांगला गुरु भेटूं दे! शेकडो कोस बर्फांतून, अरण्यांतून, दऱ्याखोऱ्यांतून, अनेक संकटांतून, मी तेव्हा प्रवास केला; पण कोठेंहि सच्चा गुरु भेटला नाहीं. सगळीकडे गुरूंचा भाव गुरांच्या बाजारांतील

पशुहून अधिक नाहीं ! ते गुरु अडक्यास तीन ! सगळे गुरु, सगळे बुवा, सगळे शंकराचार्य, लबाड, ढोंगी, विकारास बळी पडलेले, आणि अंथरलेल्या भगव्या छाटीवर कामवासना पूर्ण करून घेणारे, दांभिक, इंद्रियांचे दास–गुलामच, असे मला आढळले. कोणी बुवा व्यसनांचे लोभी, कोणी पक्के द्रव्यलोभी, कोणी कीर्तिलोभी, कोणी स्त्रीलोभी, प्रत्येक बुवाला परमेश्वरप्राप्ति-शिवाय, कशाचा ना कशाचा लोभ आहे ! हिमालयांत मी शेकडों मठ पाहिले. पण सगळीकडे ' माझा मठ कसा वाढेल, माझा शिष्यपरिवार मेंढरांच्या कळपासारखा मोठा कसा होईल, मला पालखी, उच्चासन, महंतपणा यांची प्राप्ति कशी होईल, हीच सर्व मठाधिपतींना, आचार्यांना अहोरात्र चिंता ! ते बुवा, ते शंकराचार्य, ते महंत, ते महाराज, आणि ते आनंद, मोठमोठीं उत्तुंग मंदिरें बांधतील, मठ बांधतील, आणि वाद निर्माण करून ठेवतील; पण धर्माचा पाया मंदिरांत कुठें आहे, तो मात्र कोणी कोठे दाखवूं शकला नाहीं ! ही स्थिति हिंदुधर्मांतीलच केवळ आहे, असे नाहीं; तर सर्व धर्मांतच धर्मतत्वाची दिशाभूल झालेली आहे. देवळें, मंदिरें, चर्चेस, मशिदी यांच्या इमारतींबद्दल, त्यांच्या पायांच्या जागेबद्दल आम्हीं स्वाभिमान धरून झगडतों, भांडतों, मारामाऱ्या करतों, सत्याग्रह करतों; परंतु त्या देवळाच्या, मंदिराच्या, चर्चेसच्या, आणि मशिदींच्या पायांमध्यें, कोणतीं उदात्त धर्मतत्वें घातलेलीं आहेत, त्या तत्वाकडे मात्र त्या जातींपैकीं कोणाचेंच लक्ष नाहीं ! आम्हांला दगड, चुना, माती, पायांच्या खुणा या गोष्टी डोळ्यात तेल घालून शोधावयास पाहिजेत ! पण दगड, चुना, लाकडें हीं काय तत्वें आहेत ? तत्वाचा, धर्माचा, मूळ पाया, त्याची बांधणी मात्र आम्हांला शोधावयास नको आहे. दगड, चुना, सत्ता आणि मत्ता हीं खरीं त्या मंदिरांचीं पायांतील तत्वें नसून, तत्व हाच पाया आहे, तो मात्र कोणी शोधत नाहीं ! अस्सलपेक्षा नकलेची किंमत फार; सत्यापेक्षां दांभिकपणाला किंमत फार, अशीच जगाची स्थिति झाली आहे. म्हणून मला ढोंगी गुरूंचा अगदीं कंटाळा आला.

पण कंटाळा येऊन मनाचें थोडेंच समाधान होणारें होतें ? मन सारखें कांहीं तरी अज्ञात सुखाकरतां तळमळत होतें; रडत होतें; आक्रोश करीत होतें,

टाहो फोडीत होतें, परमेश्वराला हाका मारीत होते! चकचकतें तें सारें सोनें नव्हे, पितळ आहे, असें मनाला वाटूं लागलें. पण पुनः मन म्हणत असे, कीं, सगळीकडे पितळच तुला दिसत असलें, तरी, कुठें एकाद्या ठिकाणीं तरी, सोनें हें असणारच!–असेलच! म्हणून त्या सोन्याचा तूं शोध कर! त्या शोधाकरतां मी जे कष्ट केले, हाल सोसले, दमन केलें, त्याचा संपूर्ण इतिहास पुढें ओघाओघानें सांगेन. पण देवाचा आणि गुरूचा शोध करीत हिमालयांतून, गंगोत्रीवरून, जम्नोत्रीवरून, गहन गूढ प्रदेशातून मी जो धाडसाने प्रवास केला, आणि त्यांत जे चमत्कारिक अनुभव मी स्वतः घेतले, त्यातील कांहीं थोडे येथें सांगून, पुढें जाणें इष्ट होईल. म्हणजे वाचक मजबरोबर प्रवास करूं शकतील. कांहीं थोडेच अनुभव मी येथें सांगतों.

एकदां मी गंगोत्रीवरून एकटाच प्रवास करीत असतां, रात्रीच्या वेळीं एक भयंकर क्रूर सिंह, मला आकस्मात दूर अंतरावर दिसला. अंतर दूर कसलें, अवघ्या १०।१५ हाताचे! दोघांनाहि त्यावेळीं कल्पना नव्हती, कीं, आपण दोघे एकमेकांना इतक्या जवळ भेटूं! मी एका वळणाला ओलांडून पुढें जातों, तों सिंह माझ्यापुढे उभा! तो हिमालयांतील, ताजातवाना, खरा पशूंचा राजा सिंह! मूर्ति अत्यंत भव्य, विशाल! डोंगरी मोठ्यात मोठ्या आवळ्याएवढे त्याचे तेजस्वी डोळे! क्षणमात्र दोघांची नजरानजर होतांच, माझी मात्र पांचावर धारण बसली! सर्वांग घामाने डबडबून गेलें! 'शश मंडळांत कोल्हा, म्हणतो 'मी सिंहगर्जना करतों'। जोंवरि न पाहिला 'गज–मुक्ताफळ–कवळ भक्षिता' हरि तो!॥ हे श्री मयुरकवींचें वर्णन अत्यंत सत्य आहे. त्या आर्येतील कोल्ह्याची आणि दुर्बळ मनुष्याची स्थिति अगदीं एकच आहे! तीच स्थिति तेव्हा माझीहि झाली! साक्षात् मृत्यूच माझ्यापुढें माझा घास करण्यासाठीं उभा! माझ्या हातांत तेव्हा मला मोठा मुसळाएवढा दंडा होता. पण तो दंडुका चालविणार कोण, कसा, आणि कोणावर? हात लुलेच झाले होते; त्यांत सामर्थ्यच राहिलें नव्हतें. पाय जमिनींत जणु कांहीं खिळे मारून रोवले होते! मनांतल्या मनांत मी तेव्हा देवाचें नांव घेऊं लागलों! पण भीतीनें जीभ तोंडांत आडवी पडली होती! तो भयानक प्रसंग मी जन्मभरहि

विसरणार नाहीं. सिंह आतां अंगावर झडप घालणार इतक्यांत मला एक अपूर्व युक्ति सुचली, आणि त्यामुळेंच माझा प्राण वांचला! माझ्या हातांतील दंडा तर केव्हांच गळून पडला होता! माझ्या मनांत तेव्हा एक अपूर्व कल्पना सुचली. माझा उजवा हात आकस्मात झोळीकडे वळला, आणि तत्क्षणीं झोळींतून मी एक भला मोठा नारळापेक्षाहि मोठा शंख बाहेर काढला. माझ्याबरोबर नेहमीं एक भला मोठा, वाजविण्याचा शंख असे. मी तो शंख बाहेर काढून, अंगांत असेल नसेल तेवढें बळ खर्ची घालून, तो असा कांहीं जोरानें वाजविला, कीं, त्या शंखाच्या दुमदुमणाऱ्या आवाजानें भयभीत होऊन क्षणार्धांत तो सिंह उड्या मारीत कोठें अदृश्यहि झाला! तो सिंह भयानें पळत असतां, थोडासा जीव धरलेल्या माझ्या डोळ्यांनीं मी त्यास पहात होतों, पण माझ्या तोंडाचा शंख कांहीं अर्धातास पर्यंत सुटला नाहीं, इतका मी घाबरून गेलो होतों! सिंह पूर्णपणें अदृश्य झाल्यावर माझ्या [illegible] थोडी शांतता आली! त्या भयाचें मी कितीहि वर्णन केलें, तरी तें प्रत्यक्ष अनुभवावांचून कळावयाचें नाहीं! ती माझी 'सिंहभेट' अपूर्व! शंखनादाला सिंह भितो, पण शंखनादानें हत्ती अंगावर चवताळून येतो, असा कांहीं विलक्षण अनुभव, मला त्या भयंकर प्रवासांत आला.

त्यानंतर एकदा मला एक प्रचंड अजगर भेटला. सुमारें २५ हात तो लांब होता; व १॥ फुटाहून अधिक त्याची शरीराची रुंदी होती. रात्रीं माझ्या पायाला एकदम गार कांहीं तरी लागलें, म्हणून मी दचकलों; काय गार लागलें म्हणून न्याहाळून जों पाहतों, तों प्रचंड अजस्र अजगर! मी जो तेथून धूम ठोकून एकसारखा भयानें पळत सुटलों, तो अर्धा मैल तरी विद्युत्गतीनें पळालों असेन! मला प्रथम वाटलें, कीं तो महाविषारी भयंकर सर्पच असला पाहिजे! अर्धा मैल पळाल्यावर आणि आपण आतां सुरक्षित आहों अशी मनाची पूर्ण खात्री झाल्यावर मनांत प्रश्न उद्भवला कीं, 'आपण कां भ्यालों!' सर्पाला पाहून भ्यालों कीं नाहीं! माझ्यांत जसा जीव आहे, तसाच त्याच्यांतहि आहे. जीव हा जर इथून तिथून सारखाच, तर मग मलाच तेवढें जिवाचें भय काय म्हणून वाटावें? हा भ्याडपणा योग्याला न शोभणारा, पुरुषवृत्तीला लाजविणारा

आहे, असें मनांत येऊन, पुनः मी माघारीं फिरलों. मी परत येऊन त्या अजगराला न्याहाळून पाहीपर्यंत, आपल्याला कोणी स्पर्श केला आहे, किंवा एक मनुष्य आपल्या भयानें अर्धा मैल पळून जाऊन, पुनः परत आला आहे, व आपणास पाहतो आहे, याची त्यास क्षितिहि नव्हती; शुद्धहि नव्हती ! मी जेव्हां अगदीं त्याच्याजवळ गेलों, तेव्हा स्वारी हळूहळू आपला मुक्काम, आपलें अवजड शरीर, हालवूं लागली होती ! व स्वतःच्या राजवाड्याकडे, वारुळाकडे निर्धास्तपणें, बेगुमानपणें निघाली होती. त्याचा तो राजवाडा पाहण्यासाठीं मी मोठ्या उत्सुकतेनें त्याच्या मागोमाग गेलों. स्वारी वारुळांत निर्धास्तपणें जाऊन बसल्यावर मी पुढें प्रवासास लागलों. त्या अजगर-भेटीनेंहि, त्या चांदण्यारात्रीं, माझ्या विचारांत पुष्कळ क्रांति केली.

त्यानंतर एका वेळीं एका अघोर योग्याशीं गाठ पडली. मी नेहमीं सर्व प्रवास रात्रींच करीत असे. देवाचें आणि गुरुचें मला अगदीं वेडच लागलें होतें. गिरिगुहांत रात्रीं, जेथें जेथें म्हणून अग्निप्रकाश दिसेल तेथें तेथें मी जाऊन, गुरु भेटतो काय, म्हणून शोध करीत असे. तशा प्रकारें एका काळोख्या रात्रीं मी प्रवास करीत असतां एका ठिकाणीं दूर अंतरावर एक प्रचंड शेकोटी मला दिसली. निर्भयपणें मी तेथें गेलों. एक धिप्पाड जटाजूटधारी मनुष्य, त्या भयानक मध्यरात्रीं त्या शेकोटीजवळ एका उच्चासनावर बसला होता. त्याची मुद्रा, त्याची गर्दन इतकी भयंकर दिसत होती कीं, सामान्य मनुष्य भीतीनेंच मृत्यु पावावयाचा ! दिसावयाला तो मनुष्य दिसत होता एवढेंच; पण मी तर त्याला मनुष्यरूपी राक्षसच म्हणेन. कारण त्याचें शरीर एवढें दांडगें होतें कीं, मोठ्यात मोठ्या शरीराच्या पैलवानाचें शरीर म्हणजे त्याची केवळ एक मांडी होती. उंच तर भयंकरच. बोटांचीं नखें तीक्ष्ण आणि सुमारें तीं पाऊणफूट लांबीचीं ! त्या नखांनीं पुढें माझ्यावर चांगलाच प्रहार केला ! मी तेव्हां अगदीं निर्भयवृत्तीनें वागत होतों. माझ्या जीविताची आशा, तेव्हां मी सोडूनच दिली होती. मरणाचें तेव्हा मला कांहींच वाटत नव्हतें. आणि त्या वेळीं तर मी कडकडीत ब्रह्मचर्याचें पालन केलें होतें. ते दिवस थंडीचे होते. धुमीजवळ मी बेलाशक जाऊन,

निर्भयपणें धुमीपुढे आपले हात पुढें करून, मीहि शेकत बसलों. एका प्रकारें माझें तें वागणें त्या अघोर योग्यास अपमानास्पदच होतें. मी तसा निर्भयपणें शेकत बसतांच, त्यानें आपले लालबुंद क्रुद्ध डोळे वटारून मजकडे टक लावून पाहिलें. ती मानवी नजर होती, असें कोण म्हणेल? ती हिंस्र श्वापदाचीच नजर होती! तो कांहीं बोलला नाहीं. पण थोड्याच क्षणांत त्यानें क्रुद्ध होऊन, शेकोटीपुढें केलेल्या माझ्या हातांच्या बोटांवर आपला लांब सांडस असा कांहीं जोराने मारला, कीं, विंचवाच्या नांगीच्या वेदना मला क्षणभर जाणवल्या! मीहि मुर्दाडच. मी त्या शेकोटीपासून मुळीच हटलों नाहीं. पुनः त्यानें क्रोधानें आपला प्रचंड चिमटा दुसऱ्यादा माझ्या हातावर मारला; आणि गर्जना करून म्हणाला, "हट जाव! हात मागें कर!...हात मागें घे!"

जागचें थोडेंहि न हालतां किंवा तिळमात्रहि हात मागें न घेतां मी त्यास निर्भयपणें उत्तर दिलें, "मी हात माघारीं घेणार नाहीं!"

त्याबरोबर चिडून पुनः त्यानें आपला लांब सांडस माझ्या हातावर फटकावला! त्याप्रमाणें त्यानें आपल्या बसल्या जागेवरूनच चिमट्यानें मला धुमीपासून दूर करण्याचा, लोटण्याचा प्रयत्न केला; पण तो त्याचा प्रयत्न निष्फल झाला;–मी दूर झालों नाहीं!

थोड्या वेळानें अधिकच क्रुद्ध होऊन, मला त्यानें रागानें विचारलें, "तुम कौन हो?—तूं कोण आहेस?"

मी शांतपणें उत्तर दिलें, "मी संन्यासी आहे. मै संन्यासी हूं!"

त्यानें माझी थोडीहि पर्वा केली नाहीं. तो अधिकार गाजवण्याच्या स्वरानें, नव्हे 'हुकूम' म्हणूनच म्हणाला, "जा! जल ले आव;–जा, पाणी घेऊन ये!"

मी निर्भयपणें उत्तर दिलें, "मी पाणी आणणार नाहीं! संन्यासी कधीं कोणाची सेवा करीत नसतो! मी तुझ्या ठिकाणीं आलों असतांना तूंच मला जल दिलें पाहिजेस! मीं कधींच पाणी आणणार नाहीं!"

माझ्या त्या वाक्यांनीं, त्याच्या आधींच भडकलेल्या क्रोधाग्नींत तेलच पडलें; ते माझे शब्द साधे न राहतां 'पेटतें पाणी'च झाले. तो गर्जना करून मला म्हणाला, "तूं मला जाणत नाहींस? मी कोण आहें हें तूं जाणत नाहींस?"

मी सत्यपणें उत्तर दिलें, "मी मुळींच जाणत नाहीं!" तेव्हा तो करकरा आपले दांत चावीत गर्जना करून मला म्हणाला, "मला या भागांत अघोर योगी म्हणतात. मी सिंह वाघ यांचें मास खातों. तुझ्यासारखीं कोवळीं माणसें मी माझ्या नखांनीं फाडून अर्धीकच्ची खातों. स्मशानांतील प्रेतें ओढून आणून खातों. तुला जिवंत रहावयाचें असेल, तर इथून निघून जा!"

मी उर्मटपणें उत्तर दिलें, "मी मुळींच जाणार नाहीं; इतकेंच काय, या थंडीच्या वेळीं, या धुमीपासूनहि मी हालणार नाहीं!"

त्या माझ्या उत्तराबरोबर त्या अघोर योग्यानें फाडदिशीं पुनः एकदां आपला लांब सांडस मारला, आणि आपल्या तीक्ष्ण नखाच्या लांब बाहूंनीं, आपल्याकडे मला ओढून घेतलें! मीं पूर्णपणे त्यांच्या तावडींत सांपडलों! थोड्याच क्षणांत त्यानें आपलीं तीक्ष्ण नखें माझ्या अंगावरून अशीं कांहीं ओरबाडलीं, कीं, माझ्या शरीरांतील मासच त्यानें बाहेर काढलें. केळीच्या सोपटाचे तंतु काढावे, तशी त्यानें माझ्या सर्वांगाचीं सालपटें काढलीं, आणि मला रक्तबंबाळ करून टाकलें! माझ्या शरीरातून रक्ताच्या धारा वाहूं लागल्या. एकाद्या कोरफडीप्रमाणें त्यानें माझी अवस्था केली. त्याची माझी तेव्हां खूपच झटापट झाली. त्यावेळीं ब्रह्मचर्याच्या बलाचा आत्मविश्वास माझ्यामध्यें प्रचंड प्रमाणांत वास करीत होता. मी त्याच्याशी इर्ष्येनें युद्ध सुरू केलें. त्याच्या जटा दोरखंडासारख्या आणि फारच लाबच लांब होत्या. मी जरी त्याच्यापुढें एकादें मूल शोभत होतों, तरी माझ्या बलाबरोबर मी एक युक्तिहि लढविली. त्याच्या लांब जटा त्याच्या काखेंतून त्याच्याच पाठीवर अशा काहीं जोरानें मी ओढून घेतल्या, कीं, लगाम घातलेला घोडाच तो झाला! वेसण असलेल्या बैलास ज्याप्रमाणें वाटेल तिकडे, हिसका देऊन ओढावें, त्याप्रमाणें मी त्याच्या पाठीवर त्याच्या जटा घट्ट ओढून धरल्या. केसाच्या वेदनांनीं त्यालाहि कांहीं हालचाल करतां येईना! अशा रीतीनें त्या अघोर योगी राक्षसाशीं मी २।३ तास म्हणजे अगदीं पहाटेपर्यंत भयंकर युद्ध केलें. शेवटीं तो ताळ्यावर आला. तो म्हणाला, "तूं बलवान मनुष्य दिसतो आहेस. मी तुला त्रास देणार नाहीं. तूं आतां मला सोड! त्यानें माझी फारच करुणा भाकल्यावर मी त्याला

सोडलें. त्यानंतर तो चांगला ताळ्यावर आला. त्यानें आपल्या आश्रमाजवळच्या झाडींतून कसला तरी वनस्पतीचा पाला आणला; आणि तो चेचून त्यानें माझ्या रक्तबंबाळ शरीरावर त्याचा रस चोळला. फार थोड्याच क्षणांत माझें रक्त पार थाबलें; इतकेंच नव्हे तर वेदनाहि पार नाहींशा झाल्या. त्यावेळीं तो अघोर योगी माझ्यावर फारच संतुष्ट झाला. तो म्हणाला, " तूंच आज माझ्या आयुष्यांत, मला टक्कर देणारा बलवान प्रतिपक्षी भेटलास. नाहींतर आतांपर्यंत मी किती लोकाचे, किती पशूंचे प्राण घेतले आहेत! असें म्हणून त्यानें एका गुहेकडे चलण्याचा मला आग्रह केला. मी जेव्हां त्या गुहेत प्रवेश केला, तेव्हां तशा त्या काळोख्या रात्रीं विद्युत्प्रकाशाहूनहि अधिक लखलखाट तेथें दिसत होता! बहुमोल कपडे, रत्नें, दिव्य वनस्पति, संपत्ति, नरमुंडें, हाडे, कातडीं, यानीं ती गुहा गच्च भरून गेली होती. तेथे अनेकविध चमत्कारिक पदार्थ होते, जे मी कधीं जन्मांतहि पाहिले नव्हते! तो माझ्यावर प्रसन्न होऊन म्हणाला, " यातून तुला काय पाहिजे असेल तें तें घे! मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें. मला सर्व सिद्धि अनुकूल आहेत. मी केवळ तुझी परीक्षा पाहिली. मी येथें अघोर तप करीत आहें. "

मी उत्तर दिले, " मी संन्याशी आहे. सन्याशाला कशाची इच्छा असणार? तुझ्याजवळ गाजा, चरस, किंवा तत्सम काहीं मादक पाला, अगर पेय असेल, तर ते मला दे! मला त्याची मात्र जरुरी आहे. मी त्याचें सेवन करीन. " असें मी म्हणतांच त्याने मला यथास्थित गांजा आणि चरस अर्पण केला. मीहि त्यांचा तेथें यथास्थित समाचार घेऊन, आणि परस्परानीं परस्परांस आशीर्वाद दिल्यावर विजयानें पुढें निघालों!

पण ब्रह्मचर्याचें सामर्थ्य हें अद्भुत आहे, हें मला यावेळीं सांगावयाचें आहे. ब्रह्मचर्याचा मला तेव्हा फारच अभिमान. एक दिवस एका जंगलांतून उतारावरून प्रवास करीत असतां मला एक सुंदर प्रचंड जलाशय दिसला. तेथें डोळे फिरवून टाकण्याजोगी एकीकडे दरड होती. आणि कित्येक रानटी हत्ती त्या जलाशयांत मनसोक्त क्रीडा करून परत चालले होते. त्यांच्या जाण्याचा मार्ग होता, माझ्याच बाजूनें. हत्तीला फार दूरवरून माणसाचा वास येतो. कित्येक

हत्ती यथास्थित जलक्रीडा करून पुनः पुनः त्या दरडीच्या कडेकपारीला येऊन आपलें ढुंगण जोरजोरानें घाशीत उभे रहात होते. मला त्या हत्तीच्या दृष्टीच्या टप्प्यांतून सुटणेंहि महा मुष्किलीचें होतें. एकाद्या हत्तीची जरी नजर माझ्याकडे वळली, तरी बस्स होतें! त्याने माझा पाठलाग करून चेंदामेंदाच करून टाकला असता. मी फार भयभीत झालों. पण जाणार कोठें आणि कसा! परत फिरावें तर वारा उलटा, आणि चढण! त्यावेळीं मला पुनः अपूर्व बुद्धि सुचली. मी धैर्य धरून दबत दबत त्या कडेकपारीच्या कांठास गेलों, आणि एक हत्ती ढुंगण घासण्याच्या ऐन रंगांत आला असतांना, त्याचें हातीं लागणारें शेपूट मी पकडून तें वर असें कांहीं मागें खेंचलें, कीं, त्या यातनांबरोबर हत्ती चित्कार करून मोठमोठ्याने ओरडूं लागला! त्याचा तो भयाचा आवाज ऐकतांच क्रीडा करणारे हत्ती वाट मिळेल तिकडे धांवत सुटले! मी ज्या हत्तीचें शेपूट धरलें होतें, त्यास मी दिसणेंच शक्य नव्हतें; आणि त्यास मागें वळून पाहणेंहि मी अशक्य करून सोडलें होते! सर्व हत्ती निघून गेल्यावर आणि शेपूट धरलेल्या हत्तीपासून स्वसंरक्षणाची पूर्ण तजवीज करता येईल अशी मनाची खात्री झाल्यावर मी त्याचें शेपूट सोडून दिलें. ब्रह्मचर्यबलाचें सामर्थ्य कोणत्या प्रकारचें असतें याचा जो मी तेव्हां अनुभव घेतला, त्याबद्दल मला नेहमीं अभिमानच वाटतो. उलट पुढें मी संन्यासमार्ग सोडून देऊन एका वेश्येच्या घरीं गेलों असतां, तेथेंहि ब्रह्मचर्यबलाचा जो अनुभव आला, तोहि विपरीत! तो अनुभव मी पुढें ओघाओघानें सांगेन. हत्तीच्या सामर्थ्याशीं टक्कर देणें, हें ब्रह्मचर्यबलावांचून मला तेव्हां शक्यच नव्हतें. हत्तीच्या भयसूचक चित्कारानें बाकीचे हत्ती माझ्याकडे न वळतां, वाट फुटेल त्या दुसऱ्या मार्गानें निघून गेले; व मी पूर्ण निर्धास्त झालों.

परंतु त्यावेळीं ब्रह्मचर्यबलानें जितका मी महत्पदाला चढलों, तितकाच माझा पुढें अधःपात झाला हें सांगण्यास मला दुःख वाटतें! तेव्हा मनाची खात्री पटली कीं, ब्रह्मचर्य पालन करणें ही गोष्ट सोपी नाहीं. भगव्या छाटीवर ब्रह्मचर्याचा नित्य अधःपात करणारे साधु, संन्याशी आणि ब्रह्मचारीच फार! भगव्या वस्त्रावर आणि भगव्या छाटीवर, मृगाजिनावर आणि व्याघ्रांबरावर

ज्यांचा अधःपात चुकूनहि झाला नाहीं, असा एकहि साधु, बुवा, महंत, शंकराचार्य, मला आजपर्यंतच्या जन्मांत भेटला नाहीं. आणि परमेश्वराचा शोध लावणारा तर कोणीच आढळला नाहीं! सर्व बैरागी, संन्यासी, आचार्य आणि साधु, धर्माचें केवळ एक साधन करून त्या द्वारें द्रव्यार्जन करीत असतात, एवढाच त्यांच्या परमार्थाचा अर्थ आहे. आजकाल तर कोठेंहि पाहिलें तरी संन्याशाचे, बुवाचे, साधुमहाराजांचे, रामदासांचें निशाण घेऊन मिरवणारांचे, शंकराचार्यांचेसुद्धां, त्या आपल्या भगव्या छाटीवर, बेहद्द विलास चाललेले आहेत. ब्रह्मचर्याचें, वैराग्याचें, परमार्थाचें सारें त्या बुवांचें ढोंग आहे, अशी माझी खात्री झाली. 'बुवा तेथें बया। वृक्ष तेथें छाया ॥' हा न्याय कोणत्याहि बुवाचे ठिकाणीं सुटलेला नाहीं, किंवा कोणी बुवा त्यास अपवाद नाहीं! भगव्या छाटीआड सुभद्रेचें चुंबन घेणारे कपटी अर्जुनबुवाच आजकाल सर्वत्र आहेत. स्त्रीचें सान्निध्यावांचून त्यांना भरभराट नाहीं; स्त्रीच्या सान्निध्याशिवाय त्यांचा परमार्थ पुरा होत नाहीं; स्त्री-श्रोत्या-शिवाय त्यांच्या कथांना, उपदेशांना रंग नाहीं; असें असतांना ते लोक भगवीं वस्त्रें कां वापरतात हें समजत नाहीं! त्या पवित्र भगव्या वस्त्राचा आजकालचे साधु, महाराज, बैरागी, शंकराचार्य, ब्रह्मचारी, रामदासी, संत आणि महंत, आपल्या ब्रह्मचर्याचा नाश करून किती अपमान करीत आहेत, याची त्यांना कल्पनाहि नाहीं. भगव्या छाटीवर आपला अधःपात होऊं देण्यापेक्षां आपला पराजय कबूल करून, एकेक साधु आणि संन्याशी, एकेक शंकराचार्य आणि संत महंत, महाराज, संसारी होईल, तर जगाचा उद्धार अधिक लौकर होईल; पण याविषयीं अधिक, मी पुढें सांगेन!

## प्रकरण ६ वें



( नर्स सुंद्राबाईनें सांगितलेली हकिकत )

# अमेरिकेंत मी मोलकरीण झालें !

जेथें माझा देश नाहीं, जेथें माझा पैसा नाहीं, जेथें माझे लोक नाहींत, अशा विदेशांत जाण्याचें, भावी आयुष्यांत, मी धाडस केलें! बलसारला लग्नविधि झाल्यावर मी मिस्टर जोशी याना म्हटलें, "तुम्ही प्रथम अंबाल्याला जाऊन नौकरीवर हजर व्हा, संसाराची सगळी तयारी करा, म्हणजे मी मागाहून येतें."

पतिराजानी ती गोष्ट मान्य केली, आणि एक महिन्याच्या अवधींत मला त्यानी अंबाल्यास नेली. जाताना मी एकटीच आहे असें पाहून त्यानी बलसारहून एक सेविका म्हणून, माझ्या मदतीसाटीं १७।१८ वर्षांची देखणी मुलगीहि बरोबर घेतली. त्यावेळीं त्या मुलीविषयीं माझ्या मनात कोणतीहि शंका नव्हती. पण अंबाल्याला गेल्यावर, फारच थोड्या दिवसांत, माझ्या डोळ्यांना पतिच्या दुराचरणाचा देखावा दिसूं लागला. लग्नानंतर माझे कांहीं थोडे दिवस आनंदांत गेले! पण अवघ्या दोन महिन्यातच एके दिवशीं सुप्रभातीं, पतिराजांचा एक भयंकर रोमान्स मी पाहिला! त्या त्याच्या अनुचित प्रकाराची तत्पूर्वी माझ्या ध्यानींमनीं सुद्धा कल्पना नव्हती.

जी तरुण मुलगी घरच्या कामकाजाकरतां अंबाल्याला नेली होती, तिच्यावर माझ्या पतिराजांची नजर गेलेली होती. अंबाल्याला पोचतांच त्यांच्यांत चोरटा प्रेमसंबंध सुरू झालेला होता. घरचा मालकच मोलकरणीवर कशी पापी नजर ठेवतो, याचें तें एक उदाहरणच होतें. मला वाटे, मोलकरीण नेहमीं माझ्या डोळ्यांसमोर आहे, मग पतिराज हे तिच्यावर कसें प्रेम करतील? परंतु पुरुषांचीं चोरटीं प्रेमें बायकांना फारच थोडीं कळतात! जेव्हां त्यांच्या पापांना वाचा फुटून तीं बाहेर येतात, डोकावतात, तेव्हाच आपला पुरुष बिघडला

आहे, हें त्या गरीब बिचाऱ्या स्त्रीच्या ध्यानीं येतें. नाहींतर पुरुषांचीं चोरटीं प्रेमें, बायकाना सहज कळणेंच शक्य नाहींत. माझ्या आडकाठीमुळें मोलकरणीशीं गांठभेट घेण्यास त्यांना कधीं संधीच मिळत नसे. शिवाय, त्यांना माझा धाकहि वाटत असे. पण ते मला—आपल्या बायकोला भितात, ही माझी अगदीं चुकीची समजूत होती.

त्यांच्या प्रेमाचा सर्व चोरटा संबंध भल्या पहाटे चालत असे! ती तरुण मोलकरीण मुलगी पहाटे माझ्या आधीं उठे; व कामास लागण्याचें निमित्त करी. माझे पतिराजहि 'मॉर्निंग वॉक'च्या निमित्यानें पहाटे माझ्या आधीं बिछान्यावरून उठत. आणि दोघे एकीकडे जाऊन एकांत करीत! दोघांचा संकेत ठरलेला असे; त्या प्रमाणें मी उठण्याच्या आंत एकमेकांना भेटण्याची ते संधी साधून घेत. आपल्या नवऱ्याच्या पापाविषयीं, अधःपाताविषयीं, दुराचरणाविषयीं कोणी तरी हिंदी स्त्री लिहील काय? शक्यच नाहीं! पण मी हें प्रथमच लिहितें आहें. कारण, अन्याय सहन करणें हा सुद्धा एक प्रकारें अन्यायच त्या व्यक्तिनें करणें आहे. आतां यापुढें खरें सागण्यांतच, पतीचीं पापें चव्हाट्यावर आणण्यांतच, स्त्रीसमाजाचा खरा उद्धार आहे. हा प्रश्न एकीदोघींच्या सुखदुःखाचा नाहीं; सर्व हिंदी स्त्रीजातीच्या सुखदुःखाचा, जीवनाचा प्रश्न आहे.

मला त्या उभयतांचा संशय येऊं लागताच मी कांहीं दिवस त्यांच्यावर पाळत ठेवली. पण पुरुष कामांध झाल्यावर, व्यभिचारी बनल्यावर, त्याला स्थळ काळ व्यक्ति, नातें, यांची कुठें पर्वा असते? एके दिवशी पहाटे महाराज—पतिराज—उठून गेल्यावर मीहि सहज म्हणून उठलें, आणि पायखान्याकडे जाऊं लागलें; तों माझे ते पतिदेव त्या तरुण मुलीशीं, देवतेशीं, व्यभिचार करण्यांत रत झाले होते. "चोर धरावा, तर मोटे! आणि जार धरावा, तर खाटे!" अगदीं त्या म्हणींतल्याप्रमाणें ती चोरी मुद्देमालासकट मी पकडली होती! त्या दोघांचा तो निर्लज्जतेचा, पशुतुल्य प्रेमाचा देखावा पाहून मी तर स्तंभितच होऊन गेलें! आणि त्या देखाव्याच्या अचंब्यानें क्षणमात्र पुतळीप्रमाणें उभी राहिलें! त्या दोघांना काय बोलावें, कोणत्या

शब्दांनीं बोलावें, हेंच मला समजेना! ती तरुण मुलगी मात्र लज्जित होऊन झटकन घरांत निघून गेली. पण पतिराजाना कोठेंच पळून जाता येणें शक्य नव्हतें. मी त्यांचा निषेध करीत, खेदस्वरानें त्यांना उद्देशून म्हटलें, " काय हें ! किती ही तुमची निंद्य,—नीच गोष्ट! याकरतांच तुम्ही माझ्याशीं लग्न लावले काय? आपल्या लग्नाच्या पवित्र धार्मिक शपथा घेऊन अजून पुरते दोन महिने सुद्धा पूर्ण झाले नाहींत, तों त्याच्या आधींच, तुम्ही असें दुराचरण करतां? असा गुप्तपणें व्यभिचार करतां?" जोशांच्याबद्दल पहिल्यांदा जें माझें मन विटलें, तो तोच क्षण!

माझे शब्द मोजके आणि थोडेच होते. पण त्यांच्या मार्गे शक्ति होती. त्या माझ्या शब्दांचा जोशांच्या मनावर परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. त्यानी आपल्या अपराधाचा तात्काळ स्वीकार केला; आणि " कृतापराधाबद्दल एक वेळ आपल्याला क्षमा कर," असें ते म्हणाले. क्षमेसाठीं ते तेव्हा फारच गयावया करूं लागले. त्या मुलीबद्दल मला त्यानी तेव्हा पुष्कळच खोट्यानाट्या गोष्टी सांगितल्या. ते म्हणाले, "मी काय करूं? अंबाल्याला आल्या दिवसापासून तिनें मला फार आग्रह चालविला होता! ती इतकी चावट मुलगी आहे, याची मला या वेळपर्यंत कल्पना नव्हती! पण ती कमालीची चावट आणि कामार्तवा आहे! तिनें होऊन माझ्याशीं गैरवर्तन सुरूं केलें. तिच्या खाणाखुणांचा, चिठ्याचपाट्यांचा, सांकेतिक भाषेचा अतिरेक झाल्यावर, केवळ चुकून, ही आजची गोष्ट माझ्याकडून घडली! पुरुषाचें मन किती अधीर, उतावीळ तें तुला ठाऊकच आहे. मी दोषी नाहीं! ती दोषी आहे! दिसावयाला ती १७।१८ वर्षांची असली, तरी आहे ती २० वर्षांची. बांधा लहान एवढेंच. मी आतां तुझ्या पायाची शपथ घेऊन सांगतों, कीं, जन्मांत यापुढें मी परस्त्रीवर प्रेम करणार नाहीं; तसें प्रेम करून तुला फसवणार नाहीं! मला तूं यावेळीं क्षमा कर! मी तुझी माफी मागतों; ती मुलगीच जातीची चावट आणि वाईट आहे!"

खरा प्रकार काय होता, कोण अपराधी होतें, तें सारें मला समजून चुकलें होतें. पतिच्या त्या व्यभिचारीवर्तनानें माझें मन चिडून गेलें. पण चिडून,

संतापून, मी काय करणार होतें ? पतिला कोणतें आणि कसलें शासन करणार होतें ? पतिला शासन करतां न येणाऱ्या माझ्यासारख्या अबला जगांत थोड्या का असतील, असें तेव्हा मला वाटलें. पतिचा व्यभिचार पाहूनहि 'आपलेच नशिब खोटें' म्हणून स्वतःच्या कपाळावर हात मारून घेणाऱ्या गृहिणीच फार. या विचाराशिवाय माझ्या मनांत कोणते विचार तेव्हा येणार ? मी माझ्या मनाची त्यावेळीं कशीबशी समजूत घातली आणि पतिचा तो अपराध मी सहन केला. इतकेच नव्हे तर त्याना त्यांच्या गैरकृत्याबद्दल त्यावेळीं मी क्षमाहि केली !

पण, मला असें वाटतें, कीं, स्त्रियांनीं गैरवर्तुणुकीच्या पुरुषांना कधींहि क्षमा करूं नये. स्त्री गप्प राहिली, मूग गिळून बसली, त्यावेळीं नम्र झाली, तिनें सहनशीलपणा दाखविला, कीं, अन्यायी, चढेल, उद्दाम नवऱ्याचा ब्रह्मसमंध, ब्रह्मराक्षस तिच्या कायमचा मानगुटीस बसला म्हणून समजावें. ते पुरुष मग नाकानें वागीं सोलूं लागतात; जमीन मऊ लागली म्हणून कोपरानें आणि बुटानीं खणूं लागतात ! त्या सालस स्त्रीचा ते यथास्थित फायदा घेतात ! तिच्या सहनशीलपणामुळें स्त्री ही, त्या कामांध नवऱ्याची केवळ 'बलि' बनते ! माझीहि स्थिति त्याहून कांहीं भिन्न होती, असें नाहीं.

लग्न झालेल्या वर्षींच मी गरोदर राहिलें; आणि लग्न झाल्यापासून १। वर्षांतच मला त्याच्यापासून मुलगा झाला. पतिचा व्यभिचार थांबला नाहीं. त्यांची पशुवृत्ति दिवसेंदिवस वाढतच होती. त्यांच्या कामांधतेची मजल इतक्या दूरवर गेलेली होती, कीं, माडीवर दुपारच्या वेळीं ते सहज वाचत बसले असता, खालीं अंगणांत एकादी तरुण मोलकरीण गवत काढीत असली, तरी ते तिला नेत्रकटाक्षानें माडीवर बोलावीत; ५।१० रुपयांची नोट तिच्यापुढें करीत; आणि आपली इच्छा पूर्ण करून घेत ! अशा अनेक गोष्टी मला कधीं समजत तर कधीं न समजतांना घडून जात, त्यांचा मला पत्ताहि नसे !

ज्या ज्या वेळीं गुन्हा पकडावा, त्या त्या वेळीं ते माझ्या पायांवर डोकें ठेवण्याचें व क्षमा मागण्याचें नाटक अगदीं बरोबर वठवीत. आणि डोळ्यांत

अश्रु आणल्यासारखें करून मला म्हणत, "हें बघ, तूं म्हणजे माझी देवता आहेस. तुझे चरण धुवून मी तें पाणी तीर्थ म्हणून प्यालों, तरीहि मी माझ्या पापांतून मुक्त होणार नाहीं. मला क्षमा कर!" तसें ते वागले म्हणजे मला त्यांची दया येई व मग मी गप्प बसे.

पण माझ्या त्या गप्प बसण्यानें ते सुधारले काय? नाहीं! ते अधिकच उन्मत्त झाले, अधिकच दुराचारी झाले. परदारासक्तता हा त्यांचा एक स्वभावच होऊन बसला. फरक कांहीं पडला असेल तर तो एवढाच, कीं, ते पुढें आपल्या नीच कर्मांबद्दल अधिक गुप्तता ठेवण्याची काळजी घेऊं लागले!

पुनः लग्न करून, मी सुखी होईन असे जें मला लग्नापूर्वी वाटलें होतें, तें मात्र दिवसेदिवस खोटें ठरूं लागलें, आणि माझें आयुष्य प्रति दिवशीं खिन्न, उदास होत चाललें.

अंबाल्याला मला जाऊन दीड वर्ष झाल्यावर एक दिवस ते म्हणाले, "मला किनई, या हिंदुस्थानांत अगदीं कंटाळा आलेला आहे. अमेरिकेंत जाऊन उच्च शिक्षण घ्यावेंसें मला वाटतें. तुझ्या दोन्ही मुलांना सिलोनहून आणि पुण्याहून मी आणवून घेतों, आणि आपण पांच जण अमेरिकेला जाऊं! अमेरिकेला गेल्याशिवाय आपली उन्नति नाहीं, आपणांस मोठेपणा नाहीं!"

कांहीं दिवस मी त्या गोष्टीस मुळींच संमति दिली नाहीं. पण पुढें पुढें त्यानीं मला इतकी बनवली, कीं, आपण सर्वांनीं अमेरिकेला जावेंच असेंच मलाहि पण वाटूं लागलें! आणि मी त्यांच्या म्हणण्यास संमति दिली.

पण अमेरिकेला जाण्याची गोष्ट सोपी होती काय? पैशाची व्यवस्था प्रथम करावयास पाहिजे होती. माझ्या अलंकारांची अनेक हजारांची रक्कम बँकेंत शिल्लक होती. माझ्या पतिराजाना माझ्यापेक्षां, माझ्याकडील पैसा आधीं पाहिजे होता. माझा पहिल्या दोन मुलांच्याकडे जिव्हाळा आहे, ही गोष्ट त्यानी अगदीं बरोबर ओळखली होती. त्यांना जेव्हा जेव्हा पैसा लागे, तेव्हा तेव्हा त्या जिव्हाळ्याच्या नाजूक प्रश्नास माझ्यापुढें ठेवून, पैशाची ते मागणी करीत. माझ्या पहिल्या मुलांच्याबद्दल बाह्यात्कारी ते फार कळकळ दाखवत! त्यांच्याविषयीं मायाळुपणानें

ते मला म्हणत, "तूंच सांग, आपलीं थोरा मोठ्याचीं मुलें अज्ञानांत राहणें चांगलें आहे काय ? तीं मुले बुद्धिवान आहेत. लहानपणापासूनच तीं अमेरिकेला राहिलीं, म्हणजे तीं आपलें नशिब काढतील ! त्यांच्याबरोबरच माझेंहि उच्च शिक्षण तिकडे होईल; तूंहि शिकशील ! या लोकांत ज्ञानाशिवाय दुसरें काय पवित्र आहे ? गीतेंत तर तुझ्या, केवढा महा अर्थाचा श्लोक भगवंतानीं सागितलेला आहे, " नहि ज्ञानेन सदृशं, पवित्रमिह विद्यते ! । " तूंच विचार करून पहा ! तसे शिक्षण संपादन करणें आपणास अगदीं शक्य आहे. यासाठीं तूं आपले बँकेंतील सर्व पैसे माझ्या ताब्यांत दे; मी तुझ्या मुलांना इकडे घेऊन येतों; आणि बेधडक, खुशाल, आपण सर्वजण अमेरिकेला जाऊं ! अमेरिकाखंड केवढें मोठें आहे ! मिस शॉयर तुझी जिवलग मैत्रिण आहे. तिला तूं आग्रहाने पत्र लिही. म्हणजे तिच्या वशिल्यानें आपल्याला अमेरिकेचा कार्यभाग सुखासमाधानानें साधतां येईल ! आज पैसे माझ्या जवळ नसले, तरी ते मी अमेरिकेंत मिळवीन. आणि तुझे पैसे तूं जेव्हां, जेथें, ज्या क्षणीं मागशील, तेव्हा, तेथें, त्या क्षणीं, मध्यरात्रीं, अपरात्रीं सुद्धा तुझे तुला परत करीन ! माझे शब्द म्हणजे लिहिलेल्या प्रॉमिसरी नोटेचेच ते शब्द आहेत असें समज ! "

अमेरिकेला पतिबरोबर जावें, मुलांचेहि शिक्षण अनायासें होऊन तीं योग्य मार्गाला लागतील, असें मलाहि वाटलें. पण दुर्दैवानें अमेरिकेंत माझ्यापुढें कोणतें पंचपक्वान्नांचें ताट वाढून ठेवलें जाणार आहे, याची त्या क्षणीं थोडी सुद्धां कल्पना माझ्या मनांत आली नाहीं. माझ्या स्वखुषीनें बँकेंतील रक्कम मी त्यांना काढून दिली. त्यांनीं सिलोन व पुण्याहून दोन्हीं मुलांना स्वतः आणलें. मिस शॉयरकडून अमेरिकेंत राहण्याची मी सोय लावली; आणि एक दिवस, एका कुमुहूर्तावरच तीन मुलांच्यासह आम्हीं उभयतां, अमेरिकेला जाण्याकरतां, इटालियन बोटीवर चढलों ! माझ्या पतीना एक धाकटा भाऊ होता. त्यालाहि त्याना अमेरिकेस बरोबर न्यावयाचें होतें. पण ती गोष्ट त्यांनीं मला मुळींच कळूं दिली नव्हती. अमेरिकेसारख्या दूरच्या प्रवासास पतिबरोबर त्याचा भाऊहि येत आहे, याचें मला फार आश्चर्य वाटलें; व त्या क्षणीं फार रागहि आला. मी पतिराजांना विचारलें, "तुम्हीं आपल्या भावाचें तिकीट काढलेंत तरी कसें ! तो

पैसा कोठून आणला? अमेरिकेला आपल्यालाच पैसा पुरेल कीं नाहीं याची शंका आहे; मग याचा खर्च तुम्हीं कसा भागविणार ? मी तुम्हाला अगदीं स्पष्ट सांगतें, कीं, माझ्या पैशातून हा खर्च तुम्ही करतां कामा नये!" पैशाचा जास्त हिशोब दाखवून, जास्त पैसे बॅंकेतून त्यानीं आधींच काढून तजवीज केला होती! माझें खोटें समाधान करण्याच्या हेतूनें तेव्हा ते म्हणाले "हें बघ! मी त्याच्या पैशाची अगदी निराळी व्यवस्था केलेली आहे. ती तुला सांगून काय उपयोग? मी त्याचा थोरला भाऊ; त्याच्याहि शिक्षणाची काळजी मलाच वहावयास नको का? शिवाय, त्याच्यासाठीं आपण आपला स्वतःचा पैसा थोडाच खर्च करणार आहों! तूतं तो तुझा मी उसनवार म्हणून घेतला आहे, एवढेंच. बघ तर अमेरिकेंत गेल्यावर त्याची मी कशी स्वतंत्र सुरेख व्यवस्था केली आहे ती! नंतर त्याचें तो पाहून घेईल!"

मला मात्र, त्यांचें तें बोलणें मुळीच पटलें नाहीं. मला आनंद व्हावा म्हणून ते पुनः म्हणाले, "आपण अमेरिकेंत गेल्यावर आपल्याला कांहींहि कमतरता नाहीं; लक्ष्मीच्याच नगरांत आपण जात आहों! तूं आनंदानें माझ्याबरोबर आतां अमेरिकेला चल म्हणजे झालें!"

त्यावेळीं माझें मन फारच खट्टू होऊन गेलें. द्रव्यभय हें सगळ्यांत मोठें भय. द्रव्यावरच प्राण अवलंबून. आणि पुढें अमेरिकेंत झालेंहि तसेंच! कारण, पैशाच्या अभावीं तेथें माझ्यावर अत्यंत कठीण काळ गुदरला! पैशाकरतां तेथें डोळ्यांतून अश्रुधारा काढाव्या लागल्या! तशा स्थितींत आम्ही सर्वजण अमेरिकेला निघालों!

तेव्हां मी इटालियन लाइननें एक महिन्याचा प्रवास करून अमेरिकेचा किनारा गांठला. इटाली येथें मध्यंतरीं आमची बोट ८ दिवस थांबली. व्हेसुवियस पर्वत तेव्हां आपल्या मुखांतून भयंकर ज्वाला बाहेर सोडत होता, व दगड फेकत होता. इटाली शहर बघून बोटीवर येईपर्यंत प्रवाशाच्या जिवांत जीव नसे. कारण तसा तो पर्वत क्रुद्ध होऊन आणि रागीट असा धूर सोडूं लागल्यावर धरणीकंप केव्हा कोणत्या क्षणीं होईल याचा नियमच नसे. रात्रीं बोटीवरून त्या जळत्या व्हेसुव्हियसच्या विराट स्वरूपाकडे दृष्टि लावून

पाहण्याचें साहस फारच थोड्यांच्या अंगीं असे. एक महिन्यानें आमचे पाय अमेरिकेच्या किनाऱ्यास लागले. कुठें हिंदुस्थान आणि कुठें अमेरिका? आपल्या लोकांना अमेरिकेची फारच थोडी कल्पना आहे.

किनाऱ्यास बोट लागल्यापासून संकटांची परंपरा माझ्यामागें सुरू झाली! त्यावेळीं माझ्या धाकट्या मुलाच्या डोळ्यांत थोड्याशा खुपऱ्या झाल्या होत्या. अमेरिकन डॉक्टर आम्हांला तपासण्यासाठीं बोटीवर आला. तेव्हां मुलाच्या डोळ्यांतील खुपऱ्या पाहून तो एकदम दचकून दूर सरला! तो म्हणाला, "किती हा भयंकर रोग घेऊन, तुम्ही आमच्या देशात आलांत! हा भयंकर रोग घेऊन तुम्ही आलांत तसें परत हिंदुस्थानांत जा! आमच्या सुंदर देशाला तुमच्या या भयंकर रोगाची फार भीती आहे; 'कंटेजिअस डिसीज' आहे हा! मी तुम्हाला बोटीवरून उतरण्यास परवानगी देणार नाहीं!"

डॉक्टरच्या त्या बोलण्यानें माझ्या तोंडचें पाणीच पळालें! अमेरिकन लोक खुपऱ्यांना इतके भितात याची मला कल्पना नव्हती. त्यांतून, मुलाच्या खुपऱ्या मुळीच महत्त्वाच्या नव्हत्या. इतक्या लाब आम्ही प्रवास करून आलों तें काय, आणि केवळ लहान मुलाच्या खुपऱ्यांच्या निमित्त्यानें परत हिंदुस्थानांत जावयाचें? तेव्हां पतिराजानाहि कांहीं सुचेनासें झालें! तेहि गोंधळून गेले! उतारू बोटीवरून उतरतांना त्याच्या प्रकृतीची कसून तपासणी नेहमींच करण्यांत येते व ज्यांना उतरण्याची परवानगी मिळत नाहीं, त्यांना, अमेरिकन सरकार, पदरचा प्रवासखर्च देऊन, मूळ स्थळाला पोचवितें.

डोळे तपासणारा डॉक्टर म्हणजे एक भव्यच पुरुष होता. वर्ण गाजरासारखा लालबुंद! अमेरिकन लोकांचें इंग्रेजी बोलणें हें इंग्लिशमनपेक्षां फारच भिन्न आणि मजेदार असतें! तो आवाज प्रत्यक्षच ऐकला पाहिजे. मी पतिला म्हटलें, "आतां काय करतां? हिंदुस्थानला परत फिरायचं?"

पतिराज पक्के वस्ताद होते! ते म्हणाले, "ऊंहूं! मी कांहीं हिंदुस्थानांत परत येणार नाहीं. तूं पाहिजे तर मुलांना घेऊन परत हिंदुस्थानला जा; तुला पुष्कळच समुद्रप्रवास झाला आहे! तुझ्या हातांवर 'दीर्घ समुद्रप्रवासाच्या

रेषा' स्पष्ट आहेत, असें तूं मला एकदां सांगितलेंच आहेस; आतां तो दीर्घ समुद्र-प्रवास झाला !"

मी म्हटलें, "माझ्या हातांवर 'दीर्घ समुद्रप्रवास रेषा' आहेत, ही गोष्ट तर निश्चितच; पण तो प्रवास पतिसह आहे. पतिला सोडून संपणारा नाहीं ! तेव्हां मी एकटी परत जाऊं शकत नाहीं, ही गोष्ट निश्चितच. शिवाय, इतक्या दूरवर मला घेऊन येऊन आता तुम्ही मला सोडतां काय ? मी कांहीं परत जाणार नाहीं !"

नंतर मी त्या डॉक्टरला आर्जवपूर्वक म्हटलें, "या खुपऱ्या अगदीं साध्या आहेत; लौकरच बऱ्या होतील. या तुमच्या अडचणींतून आमची सुटका होण्याचा दुसरा कांहीं मार्ग नाहीं काय ?"

डॉक्टरनें स्पष्ट उत्तर दिलें, "दुसरा उपाय नाहीं. उपाय म्हणजे एकच, कीं, या तुमच्या लहान मुलाला तीन महिनेपर्यंत किंवा त्याहून अधिक काल, एकट्यालाच, एलिस आयलंडमध्यें ठेवलें पाहिजे ! ही अट कबूल असेल, तरच तुम्हां इतर माणसांना किनाऱ्यावर उतरण्याची परवानगी देण्यात येईल. एलिस आयलंड-मध्यें अशा भयंकर खुपऱ्याच्या आजारी माणसांकरतां, केवळ डोळ्यांचें, सर्व सुखसोयींनीं सज्ज हॉस्पिटल आहे; तेथें आम्ही या मुलाला नेऊन ठेवूं आणि त्यासाठीं त्याला, तुम्ही बंदरावर उतरण्याच्या आधीं, आमच्या लोकांच्या ताब्यांत दिलें पाहिजे ! त्यानंतर या मुलावर तो पूर्ण बरा होईपर्यंत संपूर्ण आमचाच ताबा राहील !"

मी काकुळतीनें म्हटले, "माझा हा मुलगा बरा झाल्यावर मला पुनः भेटेल ना ? मला तो परत मिळेल ना ?"

डॉक्टरनें उत्तर दिलें, "अवश्य मिळेल ! महिन्यांतून एकदां तुम्हाला त्याला भेटतांहि येईल. मात्र दुसऱ्या कोणत्याहि माणसाला त्याच्याबरोबर जातां येणार नाहीं !"

दुःखीकष्टी अंतःकरणानें मग मी डॉक्टरला म्हटलें, "मग याला न्या तर !" पण ते शब्द मी मुखावाटें कसेबसे उच्चारले खरे, पण त्या वेळीं माझ्या

अंतःकरणाची किती कालवाकालव झाली, तें काय सांगूं ! ‘ विश्वनाथ ! ’ म्हणून मी तर हंबरडाच फोडला ! तोहि अवघा सहा वर्षांचा. त्यानेंहि माझ्या गळ्याला दोन्ही हातांनीं घट्ट मिठी मारली, व तो मला कांहीं केल्या सोडेना. पुत्रवियोगाचा तो प्रसंग अत्यंत दुःखद.

अखेरीस मनाची समजूत घालून, मी माझें हृदय कठिण केलें; आणि डॉक्टरला करुणवाणीने हाक मारून म्हटलें, “ डॉक्टर ! या माझ्या बाळाला, तुम्ही नीट जपून न्या ! काळा आदमी म्हणून तुम्ही त्याची गय करूं नका; मी तुम्हाला भाऊ समजतें ! ” तेव्हा, माझ्या डोळ्यांतून तर अश्रूंच्या धाराच चालल्या होत्या; पण इतर प्रवाशांचेंहि मन त्या प्रसंगानें द्रवल्याशिवाय राहिलें नाहीं. डॉक्टरनें ती माझी विनंति मान्य केली, आणि मुलाला ताब्यांत घेतलें !

सुधारलेले लोक साध्या खुपऱ्यांना सुद्धा किती भितात, त्यांचें किती भय बाळगतात, हें हिंदी लोकांनीं शिकण्याजोगेंच आहे.

माझ्या मुलाला कसे एलिस बेटाकडे नेण्यांत आलें, ते येथें थोडक्यांत सांगितलें पाहिजे. त्यावरून अमेरिकन लोकांची आरोग्याच्या शिस्तीविषयीची आस्थेची कल्पना येईल.

डॉक्टरच्या ताब्यांत विश्वनाथाला देतांच, तो जणु कांहीं त्या डॉक्टराचा कैदीच झाला ! लगेच दोन शिपाई आले; त्यानीं शिस्तीनें माझ्या मुलाला आपल्या दोघाच्यामध्यें घेतलें; आणि त्यास निष्ठुरपणे एलिस बेटाकडे घेऊन गेले. त्यावेळीं होणारें पुत्रवियोगाचें दुःख, एकटी पुत्रवती माताच जाणेल.

मी तेव्हा फारच दुःखी झालें. मिस्टर जोशाना मात्र विश्वनाथबद्दल कांहींच वाटलें नाहीं ! कारण तो त्यांचा औरस मुलगा कुठें होता ! बापाचें हृदय तें नव्हतें. त्यांना उलट असें वाटत होतें, कीं, ही बायकोची पीडा आतांच, इथूनच परत हिंदुस्थानकडे जाईल, तर फार बरें होईल ! पण ती गोष्ट शक्यच नव्हती.

वास्तविक मला अमेरिकेला नेण्याचा पतिचा उद्देश अंतर्यामीं अगदीं भिन्न होता. धनवति स्त्रीचें साधन करून घेऊन त्यांना अमेरिकेंत सुख आणि मजा लुटावयाचीं होतीं.

मुलाला डॉक्टरच्या स्वाधीन करून त्याची एलिस बेटांत रवानगी केल्यावर आम्ही अमेरिकेंत पाऊल टाकलें. मिस शॉयरनें जरी तेथें व्यवस्था केली होती, तरी ती मिस्टर जोशाना मुळींच पसंत नव्हती. त्यांना स्वतंत्रपणें आणि चैनीनें रहावयास पाहिजे होतें. माझ्याजवळ असलेल्या थोड्याबहुत पैशावर अखेरचा डल्ला मारून त्यांना आपला स्वार्थ साधावयाचा होता. त्यासाठीं तर अमेरिका गांठली होती. नाहींतर, पुढें त्यांनी माझे अनन्वित हाल मुळींच केले नसते; किंवा अनाथासारखें मला अमेरिकेंत एकटीला त्यानी सोडलें नसतें.

हिंदुस्थानांतून निघतांना प्रारंभींच मी पतिराजाना म्हटलें होतें, कीं, “अमेरिकेंत थंडी अतिशय असते असें म्हणतात, तेव्हा उबेचे कपडे आपण हिंदुस्थानांतूनच घेऊन जाऊं! कारण, हिंदुस्थानांत तें कापड स्वस्त पडून पैशाची बचत होईल.”

पण अमेरिकेच्या स्वर्गसुखाच्या कल्पनेनें भारलेले माझे पतिराज, तें माझें म्हणणें थोडेंच ऐकणार? ते तेव्हा माझी कांहींतरी समजूत घालीत म्हणाले, “इथल्या उबदार कपड्यांचा अमेरिकेंत कांहींच उपयोग नाहीं! ज्या देशाची थंडी त्याच देशाचा कपडा पाहिजे. अमेरिकेची थंडी निराळी, हिंदुस्थानची थंडी निराळी! अमेरिकेंत अमेरिकेचेच उबदार कपडे आपण विकत घेतले पाहिजेत.” त्यावेळीं मी नाइलाज होऊन त्यांच्या म्हणण्यास संमति दिली होती, आणि निघतांना थोड्याहि उबदार कपड्यांची बरोबर सोय करून घेतली नव्हती. त्या गोष्टीचें प्रायश्चित्त अमेरिकेंत जातांच, आणि गेल्यावर मला भरपूरच मिळालें. कारण, अमेरिकेंत गेल्यावर उबदार कपडा खरेदी करण्याइतका पैसा आमच्याजवळ राहिलाच नाहीं.

मिस्टर जोशानी माझें बिऱ्हाड कसें तरी एके ठिकाणीं लावून दिलें; आणि त्यानंतर, आपल्या भावाला घेऊन ते जे कोठें पसार झाले तो त्यांचा कित्येक दिवस पत्ताच नाहीं! मला व माझ्या लहान अर्भकांना अमेरिका सर्वथैव परका देश. जोशी अनेक आठवडे परत न आल्यामुळें थोड्याच दिवसांत माझी व मुलांची उपासमार होऊं लागली. हिवाळ्याला तर तेव्हां प्रारंभ होऊन चुकला होता.

उबदार कपड्यांची मला व मुलांना अत्यंत जरूरी होती. तशा स्थितींत दुःखी-कष्टी होऊन मुलांसह त्यांच्या वाटेकडे मी डोळे लावून बसले असतांना, एक दिवस स्वारी पूर्णपणें अमेरिकन वेशभूषेंत, अपटुडेट पोषाखांत, हंसत हंसत येऊन माझ्यापुढें हॅट काढून ऐटीनें उभी राहिली! मी त्यांना करुण-वाणीनें म्हटलें, "इतके दिवस तुम्ही मला व मुलांना टाकून कुठं निघून गेलात? तुम्हाला कांहींच कसं त्याचं वाटलं नाहीं? आम्ही इथं थंडीनं आणि आणि भुकेनं क्षुधेनं मरतों आहोत! आमच्या अन्नाची आणि वस्त्रांची व्यवस्था काय?"

बेपर्वाईनें पतिराज उद्गारले, "तुमच्या अन्नाची आणि वस्त्रांची व्यवस्था! त्यांत काय आहे? अमेरिकेंतल्या बायका तूं बघितल्या नाहींस अजून! त्या, नवऱ्यावर कधींच अवलंबून नसतात! नवरा म्हणजे एक जवळ बाळगलेली मौज! अमेरिकेंतल्या बायका कष्ट करतात, श्रम करतात, आणि खातात, व जिवंत राहतात!"

मी आश्चर्यानें थक्क होऊन त्यांना विचारलें, "म्हणजे? हिंदुस्थानांतून तुम्ही मला आणि माझ्या आवडत्या मुलांना अमेरिकेंत मोलमजुरी करावयास आणलें काय? काबाडकष्ट करून पोट भरण्याकरतां तुम्ही आम्हाला इथं आणलं काय?"

पतिराज निष्ठुरपणें म्हणाले, "अलबत्! इथे कष्ट करावे, आणि खावं! पैसा मिळवावा आणि चैन करावी! वाटेल तितका पैसा मिळवावा, वाटेल तशी आणि वाटेल तितकी चैन करावी! मला अजून नौकरी मिळत नाहीं, त्याला काय करूं? भावाची सोय मी लावली आहे. माझीहि सोय मी थोडीबहुत लावली आहे. आतां फक्त तुझा प्रश्न. ती तुझी सोय, तूं लाव! ही अमेरिका आहे!"

मी अधीर होऊन दुःखी हृदयानें त्यांना विचारलें, "बरोबर आणलेला सर्व पैसा संपला?"

त्यानी हंसत हंसत निर्लज्जपणें उत्तर दिलें, "केव्हांच! तुझा सर्व पैसा केव्हांच खलास झाला! म्हणून तर ही दशा आता आली आहे! आणखी

कांहीं तुझ्याकडे पैसा असेल, जिन्नसपान्नस असेल, तर काढ! एकादा बहुमोल जिन्नस तुझ्याकडे असेल तर दे!"

त्यावेळीं त्यानी आमची थोडीसुद्धा पर्वा केली नाहीं. 'सबसे जीव प्यारा!' असेंच त्यांना तेव्हा वाटत होतें. शेवटीं, 'आपण नौकरी शोधायला जातों,' एवढेंच सांगून ते बेदरकारपणें निघूनहि गेले. जातांना ते एवढें मात्र बोलले, कीं, "येथील एका अमेरिकन अन्नछत्रात तुझी आणि तुझ्या मुलांच्या अन्नपाण्याची मी तरतूद केलेली आहे. तेथें तूं मुलांना घेऊन जात जा, आणि जेवण करून परत येत जा! तेथें चागली सोय मी केली आहे!"

तेव्हा मी निराशेनें म्हटलें, "...आणि थंडीची वाट? थंडीला मी आणि मुलांनीं काय करावयाचें?"

त्यावेळीं ते निर्लज्जपणेंच हंसून म्हणाले, "पोटात क्षुधेच्या अग्निच्या-जठराग्नीच्या ज्वाळा भडकल्या, पेटल्या, म्हणजे थंडी मनुष्याला कांहींच करीत नाहीं! पोटांत अग्नि पेटल्यावर बाहेर थंडी वाजत नसते!" असें उत्तर देऊन ते तात्काळ निघूनहि गेले.

माझ्या डोळ्यांपुढें सर्वत्र अंधःकार पसरला. मन चिंतेंत बुडून गेलें. काय करावें, कोठें जावें? कुणाजवळ याचना करावी? भिक्षा कशी मागावी? याचना हा शब्दहि मला जन्मांत कधीं माहीत नव्हता. पण आज, मला एकटीलाच नव्हे, तर मुलाबाळांसह दुसऱ्याजवळ याचना करण्याचा प्रसंग ठेपला, याहून खडतर नशिब तें कोणतें? दारिद्य, दुःख भोगण्याची, ही स्थिति केवळ माझ्या कर्मामुळेंच आली काय? अशाप्रकारें विचार करीत तो दिवस मी कसातरी काढला!

पतिराजानी आमच्याकरतां एका अन्नछत्राकडे बोट दाखविलें होते! अमेरिकेंत गोरगरीबांच्याकरतां तशी सोय आहे. दुसरे दिवशीं क्षुधेनें व्याकुळ झाल्यावर मुलांना घेऊन, अन्नछत्राचा तपास करीत करीत कशीबशी मी त्या अन्नछत्रांत गेलें, आणि अश्रूंबरोबर अन्नाचे दोन घास खाल्ले! दुर्दैवानें तेव्हां मला चांगलेंच गांठलें होतें. थंडी बाहेर 'मी' म्हणत होती! मी जेव्हा थंडीच्या

यातनांनीं रडूं लागलें, तेव्हां दैव इतकें मजवर उलटलेलें होतें, कीं, अश्रूंचेंहि तात्काळ बर्फ होत होतें! साध्या बुटांनीं अन्नछत्रापर्यंत मुलांना घेऊन चालत जाणेंहि थंडीनें अशक्य करून टाकलें. पोटांत भुकेनें काहूर करून सोडलेलें असावयाचें, मुलांचा जीव अन्नाविना व्याकुळ झालेला असावयाचा, आणि थंडीमुळें बाहेर पाऊल टाकून अन्नछत्रापर्यंत चालत जाणे अशक्यच व्हावयाचें. अश्रूंचेहि बर्फ होणें, याहून दुर्दैवाचा कळस तो कोणता? उबदार वस्त्रें नाहींत, उबदार प्रावरणें नाहींत, घरांत ऊब आणावयास Heatहि नाहीं, अशी माझी भयंकर, प्राणातिक स्थिति झाली. पोटांत तीव्र भूक, बाहेर थंडीनें केलेला मज्जाव, अशा परिस्थितींत मी दुसऱ्यादा जेवावयास जाणेंहि बंद केलें. एकाच ब्लॅंकेटची ओढाताण करीत मी दोन मुलासह कालक्रमणा करीत होते. एकेक दिवस म्हणजे मृत्यूचा नेमलेलाच दिवस! मनाला असें वाटलें, कीं, जोशानी, माझ्या पतिराजानी मला आणि माझ्या मुलांना येथें जिवंत मारण्याकरतांच अमेरिकेंत आणलें; आणि अमेरिकेंत मृत्यु होण्याकरतांच मलाहि पण स्वदेशातून त्याच्याबरोबर इकडे येण्याची बुद्धि झाली! नाहींतर अशी विपन्नावस्था मला कां आली असती!

पुनः एक दिवस साहेबी थाटांत माझे पतिराज अवतरले! आणि काळजात सुरा खुपसावा त्याप्रमाणे त्यानीं प्रश्न केला, "अमेरिकेचें हवापाणी मानवतें आहे कीं नाहीं? अमेरिकेची हवा हिंदुस्थानच्या बायकाना फार मानवते! त्या पाणीदार होतात! तूं अमेरिकेंतल्या प्रत्येक बाईकडे, तरुणीकडे पहा!– ती आपल्या पायांवर उभी असते! हिंदुस्थानांतल्या स्त्रिया आपल्या पायांवर उभ्या राहूं शकत नाहींत, ही केवढी शरमेची गोष्ट आहे!" असा पुष्कळच उपदेश करून पुनः ते अदृश्य झाले. त्यावेळीं मला त्यांचा फारच राग आला, पण करूं काय? मुलांना–चिमण्या पोराना–घेऊन कोठें जाऊं?

अशा रीतीनें मी दुःखांत असतांना, एक दिवस एक अपूर्व घटना परमेश्वराच्या कृपेनें घडली! मी घरीं एकटीच दुःखाकुल, मुलांना घेऊन बसलेली असतांना, मिसेस कार्पेंटर नांवाची एक धनाढ्य अमेरिकन बाई मजकडे आली!

हिंदी स्त्रियांबद्दल अमेरिकन स्त्रियांना फारच औत्सुक्य असतें. अमेरिकन

स्त्रिया हिंदी स्त्रियांच्याकडे फारच कुतूहलानें पाहतात. त्यांत मिसेस कार्पेंटरला माझ्याकडे येण्याचें आणखी एक विशेष कारण होतें. प्रख्यात शाकाहारी डॉक्टर आनंदीबाई जोशी अमेरिकेंत कार्पेंटरच्या घरीं राहात असत. आनंदीबाईच्या मृत्युमुळें मिसेस कार्पेंटर फार दु.खी झालेली होती. आनंदीबाईच्या मालकीच्या अनेक आवडत्या वस्तु एकत्र करून त्यांचें तिनें आपल्या घरीं एक म्युझियमच तयार केलेलें होतें. ' ही आनंदीबाईची खोली;–हीं आनंदीबाईचीं पुस्तकें;–या तिच्या आवडत्या वस्तू; " अशी प्रत्येक गोष्ट मिसेस कार्पेंटर दुसऱ्यांना हौसेनें दाखवीत असे !

कार्पेंटरला माझ्याविषयीं कशी माहिती मिळाली हें मला ठाऊक नाहीं. पण ती त्या दिवशीं आकस्मात मजकडे आली, एवढी गोष्ट खरी.

अमेरिकन स्त्री-पुरुष उदार आणि अत्यंत दयाळु यांत शंकाच नाहीं. मिसेस कार्पेंटर माझ्याकडे अत्यंत आस्थेनें भेटावयास आलेली होती. कांहीं-थोडी विचारपूस प्रेमळपणें केल्यावर आणि आनंदीबाई जोशांची माहितीहि तिनें दिल्यावर ती मला म्हणाली, " तुम्ही माझ्याकडे पाहुण्या म्हणून कांहीं दिवस राहावयास याल कां ? "

अहा ! ते शब्द, तेव्हा मला किती आशादायक, किती अमृततुल्य वाटले, त्याचें वर्णन करावें तेवढें थोडें. जेथें कोणी आपलें मनुष्य नाहीं, तेथें प्रेमाचा, सहानुभूतीचा एकेक शब्द, त्या शब्दांतील एक अक्षरहि गोड वाटत असतें. तीच स्थिति माझीहि झाली. मी तर क्षुधेनें, थंडीनें, आपत्तिनें व्याकुळ झालेली होतें. तशा स्थितींत तिनें ते समाधानाचे उद्गार काढतांच, माझें अंतःकरण तिच्याविषयीं कृतज्ञतेनें उचंबळून आलें ! तिचे उपकार कसे फेडावे, असें मला वाटलें. तरी परंतु, मी अधीरता न दाखवितां तिला म्हटलें, " पाहुणी म्हणून तुमच्यासारख्यांच्या घरीं न यायला काय झालें ? मी तुमच्यांत नोकरीसुद्धां करीन!"

" मी नौकरी करीन, " ही गोष्ट मिसेस कार्पेंटरला प्रथम खरीसुद्धां वाटली नाहीं ! तिनें मला आश्चर्यानें विचारलें, "माझ्याकडे तुम्ही नोकरीहि कराल ?"

मी अधिकच निश्चयानें उत्तर दिलें, " हो ! का नाहीं नौकरी करणार ? अवश्य नौकरी करीन ! "

त्यावेळीं प्रथम मिसेस कार्पेंटरकडे मी मुलांसह, कांहीं दिवसांची पाहुणी म्हणूनच गेलें. आणि पुढें तिचाच आश्रय घेऊन तिच्याकडेच नौकरीही पत्करली. ती नौकरी मी कसकशी केली, कशा रीतीनें मला तेथें वागवण्यांत आलें व मी कशी राहिलें, पतिराजांनी तशा परिस्थितींतसुद्धा कठोरपणा कसा दाखविला, त्यांतच माझी बाळंतपणाची दुसरी खेप कशी आली, पतिराजांच्या कडून त्या बाबतींत अमानुष छळ कसा झाला, तो सर्व भाग मी पुढें सांगेन. हिंदुस्थानांतून अमेरिकेस निघालें, त्याचवेळीं मला जोशांच्याकडून मुलाच्या पाठीवर दुसऱ्या खेपेचे कांहीं महिने गेले होते. आणि त्याच स्थितींत, मी अमेरिकेस गेलें होतें.



## प्रकरण ७ वें



# माझें बाळंतपण.

गर्भवति मी असतां काबाडकष्ट करण्याची पाळी मजवर यावी, यापेक्षां दुर्दैव तें कोणतें ? पतिराजांच्या लीला जितक्या वर्णन कराव्या तितक्या थोड्या. ते केवळ माझ्याकडे वैषयिक हेतूनेंच पाहात होते; आणि त्यासाठींच मधून मधून ते माझ्याकडे येऊन माझी गाठभेट घेत होते व विचारपूस करीत होते ! परंतु पत्निविषयीचा ओलावा त्यांच्या अंतःकरणांत फारच थोडा होता. मुलांच्याविषयीं तर ते पक्के निष्ठुर.

डोळ्यांतील खुपऱ्याकरतां विश्वनाथाला एलिस बेटांत ठेवून दोन महिने झाले होते; पण त्याला भेटावयाचें जोशी नांवच काढीत नव्हते. शेवटीं मीच, आईचें हृदय म्हणून त्यास भेटावयास गेलें. हॉस्पिटलची व्यवस्था फारच सुंदर होती. केवळ डोळ्यांच्या उपचारासाठींच तें हॉस्पिटल होतें; जिकडे तिकडे गारवा, थंड वातावरण, हिरवेगार पडदे, कित्येक ठिकाणीं गडद अंधःकार, अशी तेथें अप्रतिम व्यवस्था होती. मुलाच्या आजारीपणांत मी त्यास तेथें दोन वेळां भेटून आले; पण जोशी मात्र मुळीच गेले नाहींत, किंवा त्यानी त्याचें नांवहि काढलें नाहीं !

पतिराजानी अमेरिकेंत गेल्यापासून माझ्या नांवावर अनेक कारवाया चालविलेल्या होत्या. बायका नवऱ्याच्या नांवानें ओरडत असता, लोकांकडून वर्गणी त्या गोळा करीत असता प्रायः नेहमीं आढळत असतात; पण बायकोच्या नांवाचा सुंदर उपयोग करून लोकांकडे याचना करण्याचें माझ्या पतिराजांचें जगांत एकच उदाहरण होतें. " आम्हाला इकडे मिशननें बोलावून फसविलें, माझी बायकामुलें उपाशी मरत आहेत, त्यांना थंडीमध्यें गरम कपडा नाहीं, शीत निवारणासाठीं पांघरुणें नाहींत, तेव्हा शक्त्नुसार मदत करा ! " असें रसभरित वर्णन, ठिकठिकाणीं व्याख्यानें देऊन, ते करीत असत. आणि दान मिळणारे पैसे स्वतःच चैनींत खर्च करीत असत. मी मिसेस कार्पेंटरकडे नोकरी धरल्यावर

तर, माझ्या आंगच्या स्वावलंबनाची ते फारच तारीफ करूं लागले! कित्येक वेळां ते माझ्या समाधानाकरता म्हणून येत, आणि बाहेरच्या बाहेर मिस्टर आणि मिसेस कार्पेंटरबरोबर चहा पिऊन व यथास्थित गप्पा मारून परस्पर चालते होत! त्यावेळीं मी मिसेस कार्पेंटरच्या घरीं अतिच कष्ट केले, कीं जे कष्ट मला जन्मातहि ठाऊक नव्हते. अमेरिकन स्त्रिया कशा संसार करतात, कशा वागतात, याची उत्तम शिकवण तेव्हा मला मिळाली. पण अमेरिकेंत राहून हिंदुस्थानात परत आलेल्या सुशिक्षितांनी उद्योग आणि संसार पाहिले म्हणजे ते मात्र भयावह आणि केविलवाणे झालेलेच अधिक दिसून येतील! ते सुशिक्षित, अमेरिकेंतील सद्गुण अमेरिकेंतच ठेवून, अमेरिकेंतील दुर्गुण आणि अमेरिकनाची ऐट मात्र हिंदुस्थानांत घेऊन येतात; आणि त्या आपल्या अपूर्व गुणाचें प्रदर्शन जसेंच्या तसें आपल्या अडाणी पत्निपुढें करतात; आणि त्यांचे संसार विषमय झालेले दिसतात. हिंदी स्त्री काबाडकष्ट करण्यांत अमेरिकन स्त्रियांना ऐकणार नाहीं. अमेरिकेची श्रीमंती आणि हिंदुस्थानांतील श्रीमंती यात जमीन अस्मानाचें अंतर आहे. तसेंच श्रीमंतीचा उपभोग घेण्यातहि उभयतांत फार अंतर आहे. माझ्यावर मिसेस कार्पेंटरचें प्रेम अधिक जडण्यास माझे कष्टच अधिक कारण झाले. तेथें तिच्या घरीं मी अगदीं एक जिवंत यंत्रच बनलें. अमेरिकेंत नौकरवर्गाची कधींहि अवहेलना केली जात नाहीं. स्त्री अगर पुरुष कोणताहि नौकर असला तरी त्याला फार मान दिला जातो. याचें उत्कृष्ट उदाहरण अमेरिकेंत मी नित्य पहात असे. ज्या दिवशीं नौकरवर्गाला सुटी असेल, त्या दिवशीं ते अगदीं पूर्ण स्वतंत्र; त्या दिवशीं त्यांची राहणी, वागणूक, पोषाख, प्रत्येक बाब मालकांहून वरचढ! ती व्यक्ति जन्मांत कधीं कुणाची नौकर असेल, अशी कल्पनाहि त्यांस पाहाणारास चुकूनहि येणार नाहीं!

जिवापलीकडे तेव्हां मला काम करावें लागत असे. त्याशिवाय मनाला एक काळजी लागून राहिली होती, कीं पतिराजांना माझी कधीं आठवण तरी होते आहे कां नाहीं? कारण, माझ्या बाळंतपणाचे दिवस जवळ जवळ येत चालले होते. बाळंतपणाची तजवीज काय करावयाची या चिंतेनें मी फार ग्रस्त झालें होतें.

मिसेस कार्पेंटरच्या घरांत सर्व कामें अगदीं रोज आंखलेलीं असतः—

**चुलीपुढील कामें;**
**पावरोट्या भाजण्याचीं कामें;**
**झाडलोट;**
**बिछान्यांची व्यवस्था;**
**दूध तापवणें;**

या गोष्टी जरी दिसावयाला हिंदी स्त्रियांना महत्वाच्या वाटल्या नाहींत, आणि 'यांत काय?' म्हणून त्यानीं प्रश्न केला, तरी मी येथें एवढेंच सांगतें, तीं कार्यें स्वतः केल्याशिवाय समजणारीं नाहींत. अत्यंतिक स्वच्छता, दक्षता, सेवावृत्ति, चवदारपणा, कौशल्य या गुणांची तेथें नित्य पावलोपावलीं अमेरिकनांना आवश्यकता असते. चालणें, बोलणें, हसणें सर्व कांहीं व्यवस्थित लागे. निव्वळ एक स्वयंपाकाचा प्रश्न घेतला, तरी त्यांत अनेक प्रकारांचा, आणि अनेक तऱ्हांचा समावेश असे. भाकऱ्यांचीं रेटें बडवून, पोळ्यांचे ढीग घालून, किंवा भाताचे हंडे उतरून, तिकडे मुळींच चालणारें नसतें. तर त्या स्वयंपाकांत रोज, भाजून, तळून, शिजवून करावयाचे, निरनिराळे विविध स्वयंपाक असत. वाटाण्याची उसळ करणें, ही सुद्धा तिकडच्या स्वयंपाकांतील एक अपूर्व गोष्ट होती. पाव रोटी नित्य भाजून ताजीं तयार करणें हा तर फारच मोठा व्याप असे. ज्या दिवशीं घराची झाडलोट करावयाची त्या दिवशीं मला निराळें सोंग घ्यावें लागत असे; त्यावेळीं विजार घालून आणि डोक्यास टोपी घालून, तें झाडलोटीचें काम मला करावें लागे! घर झाडतांनासुद्धा फार कौशल्यानें तें झाडावें लागे. तिकडे घराच्या जमिनी लाकडी पुठ्याच्या असल्यामुळें त्या जमिनीवर साबणाची भुकी टाकून व ब्रशानें त्या स्वच्छ कराव्या लागत. घराच्या झाडलोटीचीं कामें मी प्रत्येक शनिवारीं करीत असे. केवळ त्याच कामाकरतां तो दिवस; त्या दिवशीं घराचा सर्व कोनाकोपरा झाडला जाई!

**सोमवार 'वॉशिंग डे!'** कपडे धुण्याचा दिवस! त्या दिवशीं मी मूर्तिमंत धोबीणच होत असे, किंवा धोबिणीचा अवतार घ्यावा लागत असे. कपडे

धुण्याकरतां कढत पाणी, गार पाणी यांची उत्कृष्ट व्यवस्था असे. कपड्यांचा मोठ्या टेकडीएवढा जरी ढीग पडला, तरी ते सर्व कपडे चटकन वाळत टाकण्याची यांत्रिक युक्ति निःसंशय प्रशंसनीय. धुण्याच्या ठिकाणींच ती सर्व व्यवस्था असे; व एकेक खटक्याबरोबर तो कपडा आपल्या जागेपासून, स्वतःच्या जागेपर्यंत आपोआप झरकन जात असे. सोमवारीं कपड्यांचें रणकंदन संपल्यावर दुसरा उगवणारा दिवस म्हणजे—

**मंगळवार 'इस्त्री डे!'** त्या दिवशीं आदले दिवशीं धुतलेल्या सर्व कपड्यांना मी इस्त्री करावयाची. त्या कामाकरतांच तो दिवस.

**बुधवार 'रिपेअरिंग डे!'** फाटलेले कपडे शिवणें, मोजे दुरुस्त करणें; फाटलेले बूट सांधणें; हीं कामें त्या दिवशीं मी करीत असे!

**गुरुवार 'पाहुण्यांच्या भेटीचा दिवस.'**

असे निरनिराळे दिवस अगदी पूर्णपणें निश्चित करून संसार केला जातो. हिंदुस्थानांत ज्यांचा संसारच अनिश्चित आहे, आज काम करावें तर उद्या खावें अशी स्थिति आहे, त्यांचा हा प्रश्नच नाहीं; पण गर्भश्रीमंत, सधन, नौकरदार यांच्याहि संसारांत शिस्तीचा अभावच आहे. असो. रोजचा स्वयंपाक सांभाळून शिवाय प्रत्येक दिवसाचीं नियोजित कामें मला करावीं लागतच.

तशा रीतीनें मी हालअपेष्टात सेवावृत्ति स्वीकारून दिवस काढीत असतां माझे बाळंतपणाचे दिवस भरत आले. मध्यंतरी एकदा पतिराज आले असतां मी त्यांना म्हटलें, "माझ्या बाळंतपणाची तुम्ही व्यवस्था करा. हॉस्पिटलमध्यें मला नांव घातलें पाहिजे." तेव्हा ते थोडीहि फिकीर न करतां उद्गारले, "पाहिजे तर, तूं आपली व्यवस्था करून घे! मला वेळ कुठें आहे?" ते त्यांचे कठोर शब्द ऐकून तेव्हा माझ्या हृदयास अनंत यातना झाल्या. शेवटीं एक दिवस मी मिसेस कार्पेंटरकडून रजा घेऊन स्वतःच फिलाडेल्फियाच्या मॅटर्निटी होममध्यें जाऊन आपलें नांव नोंदवून आले; आणि वेळ येतांच तेथें जाऊन मी माझ्या पहिल्या मुलीस जन्म दिला. माझ्या पतिराजाना जेव्हां ती वार्ता समजली, तेव्हा एक दिवस ते रिकाम्या हातांनीं हॉस्पिटलमध्यें मला

भेटावयास आले. बाळंतिणीचीं नातलग माणसें तिला भेटावयास येत तीं कधींहि रिक्त हस्तांनीं येत नसत; नानाविध पदार्थ, सुंदर फळें, लोक आपल्या त्या बाळंतिणीकरतां आणत असत. पण माझे पतिराज भेटीस आले, तर त्यानी तेव्हा एक 'फ्रूट'—फळहि आपल्याबरोबर मला देण्याकरता आणलें नाहीं. त्यानंतर ते जे पुनः एकदोनदा आले, ते केवळ मला 'आलों होतों! जातो!' असे सांगण्याकरताच आले. क्षणाचीहि त्याना फुरसद नव्हती. दारांतून त्यानी आपलें चोरटें मुख दाखविलें आणि 'जातों!' म्हणून सांगून निघून गेले! ते मला भेटावयास येत, ते केवळ लोकलज्जेकरतां.

अकरावे दिवशीं मिसेस कार्पेंटरहि मला भेटून गेली. त्यानंतर पुनः मी मिसेस कार्पेंटरच्या घरीं नौकरीस रुजू झालें. परंतु मुलगी इतकी अशक्त झालेली होती, कीं, एक दिवस रात्रीं मी तिच्या जीविताची आशाच सोडली; व मोठ्यानें रडूं लागलें! त्याचक्षणीं मिस्टर कार्पेंटर नाइट-ड्रेसमध्यें माझ्याकडे आले; त्यानी माझी पुष्कळच समजूत घातली; पण मला माझें रडूं आवरेना.

मिस्टर कार्पेंटर हे सूज्ञ आणि परलोकविद्येचे अभ्यासु होते. आत्म्याला अस्तित्व आहे, आत्म्यांना बोलावलें असतां ते येऊन मनुष्याला सहाय्य करतात, मदत देतात, असा त्यांचा दृढ विश्वास होता. त्यानी माझ्या ३ महिन्यांच्या मुलीला फुलासारखें आपल्या हातांत घेतलें आणि आपल्या अभ्यासाच्या खोलींत नेऊन, त्यानीं आपल्या मृत आजोबाना, मुलीचे प्राण वांचविण्याकरतां सहाय्यास येण्यासाठीं बोलावलें! कार्पेंटरच्या म्हणण्याप्रमाणे तात्काळ ते आजोबा आले! आणि त्यांनीं योग्य संदेश देऊन माझ्या मुलीला बरी केली, एवढी गोष्ट खरी. हीच बुद्धिमान मुलगी पुढें मोठी होऊन, विश्वविद्यालयाचें उत्कृष्ट उच्च शिक्षण घेऊन विदुषि होईल, व एका भाग्यवंत सालस धनिक पुत्राची भाग्यशाली सहधर्मचारिणी म्हणून नांदेल, ही गोष्ट तेव्हां माझ्या स्वप्नांतहि नव्हती.

तशा स्थितींत मी कार्पेंटरच्या घरीं २॥ वर्षें मोलकरीण म्हणून काम केलें. त्यानंतर मला कांहीं काल एका मोठ्या शेतावर दुग्धालयामध्यें एक तऱ्हेचं मजुरीचें काम मिळालें. शेंकडो गाईचें यंत्रानें दूध काढून तें थाळ्यांत ओतून

गोठवावयाचें, व तशा झालेल्या दुधावरील मलई काढून घेऊन, ते मलईचे आणि दुधाचे रतीब घरोघरीं पोचते करावयाचे, हें कामहि मी केलें. दूध तापवून त्याची मलई काढण्याची पद्धत अमेरिकेंत नाहीं. त्या गौळणीच्या कामाशिवाय मला कोचमनचेंहि काम नित्य करावें लागे. जी एक वेळ मी श्रीमंताची बायको म्हणून थाटामाटात, बगींतून पुण्यास देवदर्शनास जात असे, त्याच स्त्रीला डोक्यावर तिरकी रुबाबदार हॅट घालून, व कोचमनचा वेश घेऊन परदेशांत बगी हाकण्याची वेळ यावी, याहून तिच्या दैवाची दुर्घटना ती कोणती! त्यावेळीं प्रामुख्यानें, मालकाकडे येणाऱ्या पाहुण्यांना चार घोड्यांच्या गाडींतून स्टेशनवरून आणणे, पुनः त्याना स्टेशनावर पोचविणें, हीं कामें मी करीत असे. चार घोड्याना चालविणें ही सोपी गोष्ट नाहीं; त्यांच्या चाली, त्यांना वळविणें, जलद किंवा मंद गतीनें चालविणें या गोष्टी फार महत्त्वाच्या होत्या; त्या मी तेथें शिकले. तो ऐटबाज कोचमनचा पोषाख, पाहुण्यांशी वागावयाची आदबीची रीत, कामाची तत्परता, चलाखी, या गोष्टींचें अजूनही मला हंसू येतें. पोटासाठीं मनुष्याला कोणकोणते वेष घ्यावे लागतील यांस सीमाच नाहीं! जगातल्या सर्व माणसांनीं, उदर निमित्यानें, बहुविध वेष घेतलेले आहेत,—सोंगें घेतलेलीं आहेत, ही श्रीशंकराचार्यांची तात्त्विक गोष्ट मी तेव्हां नित्य मनांत वागवीत असे. पण इतके हाल सोसून, काबाडकष्ट स्वीकारून दैव मला अनुकूल होतें काय !

त्या शेतीच्या नौकरीवर असतांनाहि मिस्टर जोशी माझ्याकडे वारंवार येऊन जात; आणि आपली कामवासना पूर्ण करून घेऊन जात. तशा स्थितींत अन–अपेक्षित गोष्ट पुनः माझ्या बाबतींत घडली; ती म्हणजे मी पुनः गर्भवति झालें!

तेव्हा मी जिवाला वैतागलें. जोशांना एक दिवस संधी साधून मी खूपच बोललें. तेव्हां त्यांनीं मला एक २५ रुपयांची लहानशी जागा एका बिल्डिंगमध्यें ५ व्या मजल्यावर घेऊन दिली, आणि तेथें मला नेऊन ठेवलें. पण मला जरूर असणाऱ्या अन्नपाण्याची तरतूद त्यानी तेव्हा कोणत्याही प्रकारें केली नाहीं. सभांतून आपल्या दारिद्र्याचें शाब्दिक प्रदर्शन करणें, लोकांच्याकडून दान

म्हणून डॉलर्स मिळवणें, आणि स्वतःच्याच चैनींकडे त्यांचा चुराडा करणें, मोठेपणा मिळविण्यासाठीं परदेशांत नातलगांना मोठमोठीं बक्षिसें पाठविणें, हाच त्यांचा पूर्वीचा कार्यक्रम पुढेंहि चालू होता! त्यावेळीं मी त्यांना खूपच रागानें बोलले. मी त्यांना चिडून म्हटलें, " आतां जर या खेपेस तुम्ही नीट व्यवस्था करणार नाहीं तर तुमची अब्रु अमेरिकेंत मी चव्हाट्यावर आणल्यावांचून राहणार नाहीं; मग मात्र सांभाळा, ही अमेरिका आहे! येथें किती केलें तरी स्त्रियांचा अधिक मान आहे. तुम्ही नोकरी करा, आणि आम्हांला खायला घाला!"

तेव्हा ते उद्दामपणें बोलले, " या खेपेस, एका हॉस्पिटलमध्यें एका डॉक्टरला मी सांगून ठेवलेलें आहे. तुला टेलिफोन करता येतोच. तुला मी त्या हॉस्पिटलचा नंबर देतों; वेळ आली म्हणजे फोन कर, आणि तुझी तूं सर्व व्यवस्था करून घे! मला वेळ नाहीं!" असें सांगून ते घाईनें निघूनहि गेले. मला असें वाटत होतें, कीं अगदीं शेवटच्या वेळीं तरी पतिराज माझ्या सहाय्याला धांवत येऊन व्यवस्था करतील. पण ते तसे कोठून यायला? माझी त्याना पर्वाच नव्हती. त्यांना अमेरिकन सौंदर्यानें आकर्षण करून घेतलें होतें!

शेवटीं, प्रसूतिचा समय येतांच रात्रीं १२॥ वाजतां मी मोठ्या कष्टानें उठले, आणि डॉक्टरला फोन केला. थोड्याच वेळांत डॉक्टर आले. ते म्हणाले, " तुमच्याकरतां मी एक नर्स ताबडतोब पाठवून देतों. तिला दहा दिवसांकरतां रोज ५ डॉलर म्हणजे पंधरा रुपये द्यावे लागतील; कमीत कमी एवढी फी दिलीच पाहिजे!"

मी दुःखानें म्हटलें, " ही इतकी फी मी कशी देणार!"

माझी ती दीन स्थिति पाहून, पैशाबद्दल चिंता न करण्यास मला सांगून तो दयाळु डॉक्टर निघून गेला. थोड्याच वेळांत माझ्या व्यवस्थेकरतां नर्सहि माझ्याकडे आली. या वेळींहि मला मुलगीच झाली. तिचीहि दैवघटना अघटित! परंतु त्याहिपेक्षां पुढें १५ व्या दिवशीं माझ्यावर तशा स्थितींत अग्निनारायणाचा जो प्रकोप झाला, जी मी अग्नींत सांपडलें, ती हकिकत वर्णन करून सांगणें अवश्य

आहे. त्यावेळीं मी त्या मुलीसह जिवाची पर्वा न करता खालीं उडी कशी घेतली, माझ्या दुसऱ्या लहान मुलाची तेव्हा स्थिति काय झाली, अमेरिकन लोकांनी मला तेव्हा अपूर्व सहाय्य कसें केलें, व दुसरे दिवशीं "...Brave Lady of India !" म्हणून माझ्या धाडसाचें वर्णन अमेरिकन पत्रातून कसे आलें; तसेंच विपत्तिकालात आणि पतीच्या गैरहजेरींत मिसेस ॲंड्र्यूज म्हणून एका कोट्याधीश सुशील अमेरिकन स्त्रीने आकस्मात, ईश्वरी प्रेरणेनें सहाय्य करून मला जन्माचे कसें ऋणी केले, तो अपूर्व कथाभाग, मी पुढील प्रकरणात सागेन !



## प्रकरण ८ वें



## " अग्नींत सांपडलें ! "

दोन आठवडेपर्यंत नर्स माझ्या शुश्रूषेस होती. पंधरावे दिवशीं ती बाजारांत गेली असताना, मी ज्या इमारतींत राहात होते, तेथील गॅस 'लीक' होऊन त्यानें आकस्मात पेट घेतल्याने इमारतीस भयकर आग लागली ! मी तेव्हां ५ व्या मजल्यावर राहात होते. अमेरिकेत इमारतींचे दहा मजले म्हणजे कांहींच नाहींत ! ४० ते ५० मजल्यांच्या इमारती तेथें आहेत. आग लागली तेव्हां मी कॉटवरच होतें. मुले एकदम "Fire ! Fire !" आग आग, म्हणून ओरडूं लागलीं. मुलाच्या ओरडण्याबरोबर दचकून प्रथम तान्ह्या मुलीसह कॉटवरून मीं खालीं उडी घेतली. अमेरिकेंत सर्व इमारतींत लाकडी भाग फारच असतो; त्यामुळें इमारतीस पेट घेण्यास उशीर लागत नाहीं. त्या वेळीं मी अती घाबरून गेले. इमारतींतील लोक तर मोठमोठ्यानें ओरडूं लागले, "Mary ? save us !" मेरी ? तू आमचे रक्षण कर ! जीजस ? तूं ये, आणि आमचें रक्षण कर ! माझीं मुलेंहि मोठमोठ्यानें आक्रोश करून रडूं लागलीं; तीं मला करुणस्वरानें म्हणूं लागलीं,–"मदर ? वुइ आर डायिंग !"–आई ? आपण मरत आहों ! आगीनें आपण मरत आहों !"

मी तेव्हां अत्यंत निराश झालें. मुलाना म्हटलें, "बाबांनो, तुम्ही आतां त्या परमेश्वराला, कृपाळु दयाघनाला हाका मारा ! ज्याने एवढी प्रचंड लंका पेटविली असतां सीतेला तेवढी त्यानें सुरक्षित ठेविली, त्या आपल्या हनुमानालाच हाका मारा ! तोच आपल्याला खात्रीनें वांचवील." ७ वर्षाच्या मोठ्या मुलाला मी म्हटलें, "तूं एका मुलीला घे." तो मला म्हणाला, "आईग ? मी हिला कसें घेऊं !" तरीपण सर्व शक्ति एकवटून त्या शाहण्या मुलानें आपल्या बहिणीला घट्ट उचलून घेतली !

ज्यावेळीं इमारतीस आग लागते त्यावेळीं अगदीं तळांत जमिनीवर जाऊन पोचण्याकरतां प्रत्येक मजल्यावर एक शिडी आणि चौकोनी लहान द्वार

"Fire escape" असते. त्या द्वारातून, तान्ह्या मुलीसह खालीं उतरण्यास मी सज्ज झाले! मी पुढे निघाले हें पाहतांच धाकटा मुलगा तर अधिकच ओरडूं लागला. तो म्हणूं लागला, "आई? तूं जात आहेस, मी कुठं जाऊं?" ('मदर? यू आर गोइंग!–आय ॲम डायिंग!') असे म्हणून त्यानें आकाशपाताळ एक करून सोडले!

त्यावेळीं समजूत घालण्यास किंवा बोलण्यास क्षणाचाहि अवधि नव्हता. सर्वांनीं जीव वाचविणें ही पहिली गोष्ट होती. मुलांना, मी कसें तरी मन घट्ट करून त्या द्वारातून शिडीवरून खालीं सोडले! लोकांनीं त्यांना ताबडतोब घेतलेंहि. राहिले मागे मी! इमारतीने तर चोहोकडून भयंकर पेट घेतलेला. मला काहींच सुचेनासे झाले; आणि त्या पेटत्या ज्वाळामध्येच मागचा पुढचा काहींच विचार न करता, त्या तान्ह्या मुलीसह मी तळाशीं एकदम वरून उडी घेतली! आग लागताच ती विजविण्याकरतां सर्व साधनसामग्रीसह जे लोक आलेले होते, त्यांनी मला आधार देऊन खालीं घेतलें. शेंकडो लोक तो आगीचा देखावा पाहण्यास जमले होते. मी मुलीसह खालीं उडी घेतांच जमलेल्या दयाळु लोकसमुदायाने माझ्यावर कपड्याचा, हॅट्सचा पाऊसच पाडला! थोड्याच क्षणात त्यानंतर मी जी बेशुद्ध झाले, ती तीन दिवस शुद्धिवर आलें नाहीं. लोकानीं मला एका सुरक्षित ठिकाणीं नेऊन माझ्या शुश्रूषेची उत्तम व्यवस्था केली; आणि त्या संकटातून मी पार पडलें! त्यावेळीं मी दाखविलेलें धैर्य, साहस, धाडस, यांनीं अमेरिकन लोकांवर फारच परिणाम केला. त्यांतून माझ्याजवळ अवघी १५ दिवसांची लहान मुलगी; त्यामुळें अमेरिकन लोकांना फारच अचंबा वाटला! दुसरे दिवशीं सकाळींच सर्व अमेरिकन पत्रातून ती आगीची बातमी, माझें वर्णन, उडी ठोकण्याचा प्रसंग, आणि स्तुति यांनीं अनेक स्तंभ भरले होते. मोठमोठ्या ठळक शब्दांनीं छापलेलें होतें, "अमेरिकेत अग्नींतून ५ व्या मजल्यावरून Fire escape मधून उतरून, खालीं, १५ दिवसांच्या मुलीसह उडी ठोकून आत्मसंरक्षण करून घेणारी, पहिलीच शूर हिंदी स्त्री ("Brave lady of India. She is the first one......")! मला तीन दिवसपर्यंत, त्या

वर्तमानपत्रांची दादहि नव्हती. चौथे दिवशीं शुद्धिवर आल्यावर, मीं तीं वर्तमानपत्रें पाहिलीं!

वर्तमानपत्रांतील माझ्या त्या बातमीनें तीन चार दिवसानंतर पतिराज माझ्याकडे चौकशीसाठीं आले! माझ्या संकटाबद्दल त्यांना कांहींच वाटलें नाहीं; उलट त्यांना वाटलें, "एवढ्या संकटांतून ही वांचली, ही गोष्ट काहीं चांगली झाली नाहीं! जळून भस्म कां झाली नाहीं?"

त्यावेळीं मी त्याची पुष्कळच हजेरी घेतली. मी त्याना म्हटले, "नर्सचे पैसे त्या बिचाऱ्या दयाळु डॉक्टरने दिले. पण दुधाचे पैसे, घरभाड्याचे पैसे, कोण देणार? ते तरी तुम्ही द्या!" पण माझे शब्द ऐकायला ते घरात दोन मिनिटें तरी, ठरतील तर? पूर्ववत् मला दूषण देत ते त्या दिवशींहि निघून गेले!

ते निर्दयपणे निघून गेल्यावर मी स्फुंदस्फुंदून रडूं लागले; व देवाला दोष देऊं लागले. मला रडताना पाहून लहान मुलेंहि रडूं लागलीं. माझ्याच पोटाला अन्न नाहीं, तर तें मुलांना मी कोठून आणणार? मी वैतागून मुलाना म्हटले, "या घरातच कोंडून बसून आपण उपाशी स्थितींत आपला अंत करून घेऊं या. परमेश्वराला दया आली, तर तोच आता आपणास सहाय्य करील."

तशा उपासमारीच्या स्थितींत आणि डोळयातून अश्रु गाळत मुलांसह मी ३ दिवस काढले. पण चौथे दिवशीं एक फारच मोठा चमत्कार घडला. तशा संकटकालातहि देवावरची माझी श्रद्धा कमी झाली नव्हती; किंबहुना ती बळावली. मला वाटलें, 'मी निरपराधी असतां मला परमेश्वर सहाय्य का करीत नाहीं?' पण त्यानंतर दुसऱ्याच दिवशीं पुढील चमत्कार घडला खरा.

अमेरिकेंत धनाढ्य लोक मोटार ठेवतील, पण चार घोड्याची गाडी बाळगणें हें अधिक मानाचें, धनाढ्यतेचें आणि भूषणाचें समजतात. त्या संध्याकाळीं ५॥ चे सुमारास लहान मुलांना घेऊन मी चिंतेंत असतां माझ्या खोलींतील घंटा वाजली. मी अशा आपत्तींत असतां माझ्याकडे कोणी पाहुणे म्हणून येणें म्हणजे दुष्काळांत तेरावा महिनाच होता; क्षणोक्षणीं घेणेकरीच

माझ्याकडे येत आहेत, असें मला वाटत होते. म्हणून मुलांना मी म्हटलें 'दार उघडूंच नका!' पण धाकट्या मुलानें माझें न ऐकता अखेरीस दार उघडलेंच, आणि परत तो धावतच माझ्याकडे आला; आणि तोंडानें धापा टाकीत घाईघाईनें म्हणाला "एक मोठी श्रीमंत बाई तुझ्याकडे आली आहे. खालीं, चार घोड्याची बगी उभी आहे; त्यांतून ती आली आहे!"

मला प्रथम वाटले, कुणी तरी पाहुणीच माझ्याकडे आली! आणि त्या कल्पनेनें माझें जीवित मला नकोसे झाले. घरांत मुबलकता इतकी होती, कीं, पाहुण्याबाईस कपभर चहा देण्याइतकेंहि सामर्थ्य तेव्हां माझ्यामध्ये नव्हतें! घरात मूर्तिमंत दारिद्र्य नांदत होते.

आलेली बाई उच्च घराण्यातील, गंभीर वृत्तीची आणि तितकीच कोमल हृदयाची दिसली. ती स्त्री मिसेस ॲंड्र्यूज म्हणून अमेरिकेंतील एका सुप्रसिद्ध कोट्याधिशाची पत्नि होती. तिची मुलगीहि खूपच श्रीमंत असून ती पॅरिसला रहात होती. मी तिला पाहताच उद्वेगानेच म्हटलें, "तुम्ही पाहुण्या म्हणून आला असाल, तर तुमचा सत्कार करण्यास माझ्याजवळ कांहीं नाहीं." तसे उद्गार मुखावाटे निघाले खरे, पण दारिद्र्यामुळे मला तेव्हा रडूं कोसळलें.

तिने तेव्हा अत्यंत शांतपणे आणि ममतेच्या स्वरानें मला एकदम विचारलें, "तूं का रडत आहेस?" तिने मुलानाहि तोच प्रश्न केला; ती त्यांना म्हणाली, "बाळानो? तुमची आई का रडत आहे? ईश्वराच्या हुकुमामुळें मी तुमच्याकडे, तुम्हाला सहाय्य करण्याकरताच आले आहें. मला तुम्ही आपलें दुःख सांगा!" तरीहि मी काहींच बोललें नाहीं. मुलानींच आळीपाळीनें तिला स्पष्टपणें सांगितलें, कीं, "आमच्या आईला घरभाड्याचे पैसे द्यावयास पैसे नाहीत; दुधाचें बिल तिला भागविता न आल्यामुळें दूधहि बंद झालें आहे."

त्या थोर धनाढ्य स्त्रीनें मुलाना पुनः विचारलें, "तुमचे वडील (Father) कुठे आहेत?"

धाकट्या मुलानें उत्तर दिलें, "ते अमेरिकेंतच असतात; पण ते घरीं येतच नाहींत!"

मुलांच्या शब्दांनीं मिसेस ॲड्र्यूजच्या कोमल हृदयास सुरुंग लावण्याचें फारच जोरदार कार्य केले. ती अधिकच द्रवली. ती मला म्हणाली, "तूं मुळीसुद्धा भिऊं नकोस. काल मला स्वप्नांत दृष्टांत होऊन तुला सहाय्य करण्याविषयीं परमेश्वराची आज्ञा झालेली आहे;" अशी प्रस्तावना करून तिने त्याचवेळीं मुलाना विचारलें, "तुम्हाला आता ब्रेड आहे कीं नाहीं?"

मुलानीं उत्तर दिले, "ब्रेड कुठली आली आहे?" त्या उत्तरानें मिसेस ॲड्र्यूजच्या डोळयातून खळकन पाणीच आलें. ती तेव्हा निरभिमानपणें माझ्याजवळ येऊन बसली. त्या प्रसंगानें तर माझें हृदय शतधा विदीर्ण होऊन गेलें. शेवटीं मला राहवले नाहीं; मी तिला माझी सारी कुळकथा सागितली!

तेव्हां ती दानशूर बाई मला गंभीरपणें म्हणाली, "मी 'सायंटिस्ट' पंथाची बाई आहे. परमेश्वरावर माझी अत्यंत श्रद्धा असून, मला त्याचा साक्षात्कारहि होतो. मला परमेश्वरी आदेश मिळाला, म्हणून मी तुझ्याकडे आले."

असें म्हणून तिनें तावडतोब आधीं मुलाच्या खाण्यापिण्याची व्यवस्था केली. घरभाड्याचें बिल, दुधाचें बिल किती आहे, याचीहि तिनें चौकशी करून, ते बिल मी सांगताच, तावडतोब तिनें ती सर्व रक्कम देऊन टाकली. इतकेंच नव्हे तर तिनें मुलांची नीट चौकशी करून मोठ्या मुलाला आपल्या एका ऑफिसात बॉय म्हणूनहि ठेवून घेतें म्हणून सागितले. आठवड्याला दोन रुपयांना बॉय मिळत असता दर आठवड्यास माझ्या मोठ्या मुलास ५ डॉलर देण्याचे तिनें वचन दिलें. माझ्याबद्दल ती म्हणाली, "आजपासून ३ वर्षेपर्यंत मी तुला दरमहा सहाय्य म्हणून ६० डॉलर्स (१८० रुपये) नियमित देत जाईन. मुलानें चांगलें काम करून दाखविलें तर त्यालाहि आणखी पगारवाढ मी करीन. तूं आता मुळींच चिंता करूं नकोस. त्याप्रमाणें, माझ्याकडून गेल्यावर तिनें अव्याहतपणें तो क्रम चालविला व अन्य प्रकारेहि पुष्कळच सहाय केलें

पतिराजांना ही बातमी समजतांच आणि ते तावडतोब आले असतां जेवणाची उत्तम सिद्धता दिसतांच, त्यानी माझ्यावर स्तुतीचा भडिमार केला!

ते म्हणाले, "वाहवा ! याला म्हणतात नशिब ! मला आतां आनंद झाला ! अगदी छान झालें ! मात्र, ते ६० डॉलर्स तू मजकडे देत जा ! ते मी सुरक्षित ठेवीन. अमेरिकेंत हिंदी स्त्रियानी अशीच कर्तबगारी दाखविली पाहिजे !"

हालवायाच्या घरावर ब्रह्मार्पण करून आणि मिसेस ॲंड्र्यूजला मनमुराद धन्यवाद देऊन, तसेच त्या दिवशीं भोजनावर यथास्थित तावहि मारून ते जे घरातून निघून गेले, ते कित्येक दिवस पुढे, परत सुद्धा आले नाहींत !

तीन वर्षानंतर मी माझ्या थोरल्या मुलीच्या अभ्यासाकरता इंग्लंडला गेले. तेथें मी सुमारे दीड वर्ष काढले. तेथें मी कॉटेजमध्यें रहात असे. त्या स्थळीं नर्स कशा तयार केल्या जातात तो सर्व देखावा पाहिला. पक्क्या नर्स, कच्च्या नर्स, असे त्याच्यांत पुष्कळ प्रकार आहेत. परत येताना जिब्राल्टरचा विजेचा कसाईखाना मी अवलोकन केला. त्या दृश्यानें माझ्या काळजाचें पाणीच झाले ! विजेच्या तारांच्या कॉम्पाऊंडमध्यें बैलाना ठेवण्यात येत; व जरूरीप्रमाणें त्याचा फन्ना उडविण्यात येतो. त्या मानानें हिंदुस्थानांतले कसाईखाने फारच मागासलेले आहेत. तिकडे गाईची पैदास अधिक प्रमाणात असल्यामुळें बैलाचाच खाद्यमांसाकडे प्रामुख्यानें उपयोग करण्यात येतो.

इंग्लंडहून मी परत आल्यावर एक दिवस मिसेस ॲंड्र्यूजनें मला प्रेमाने विचारले, "भगिनी–सिस्टर ! हा देश तुला कसा काय आवडतो ?"

मी उत्तर दिलें, "खरं सांगूं मिसेस ॲंड्र्यूज ? हा देश मला पुष्कळच आवडत असला, तरी माझ्या जन्मभूमितल्याप्रमाणे आनंद मला या देशात वाटत नाहीं. तो आनंद माझ्या अंतःकरणांत येथें नाहीं. माझ्या मनाला येथें खरें सुख नाहीं. मला जर तूं प्रेमानें मदत करशील, तर हिंदुस्थानांत परत जाण्यास मी तयार आहे. मुलांसह मी जाईन !"

त्यावेळीं मिसेस ॲंड्र्यूजला माझ्यावरील प्रेमाने गहिंवरून आले. ती म्हणाली, "भगिनी ! तुझी स्वदेशात जाण्याचीच इच्छा असेल, तर ती तुझी इच्छा मी पूर्ण करीन."

असें तिने सांगितल्यावर, तिने अल्पावधींतच माझी निघण्याची सर्व तयारी केली. फर्स्टक्लासचा पॅसेज तिने माझ्याकरता रिझर्व केला. मी हिंदुस्थानात जाणार म्हणून तिनें माझ्यावर अनेक प्रेमळ भेटींचा वर्षाव केला. स्वतःच्च प्रेमाच्या देणग्या मला देऊन ती स्वस्थ बसली नाहीं, तर, आपल्या आवडत्या मैत्रिणींच्याकडूनहि मला आग्रहाने निमंत्रणे देऊन तिने माझा आवडत्या बहिणीप्रमाणें गौरव केला! मिसेस अँड्यूजचा शब्द कोणीच खालीं पडू देणारे नव्हतें. तिच्या मैत्रिणींनीं मला इतक्या वस्तु भेटीदाखल दिल्या, कीं, त्या वस्तूंचे मोठाले सहा पेटारे भरले. मुलींना बहुमोल फ्रॉक, हरतऱ्हेच्चीं चमत्कृतिजन्य बाहुल्यांची खेळणीं, विविध प्रकारची मिठाई, यांची लयलूट झाली होती. अशा रीतीने गौरवाने मी हिंदुस्थानकडे निघाले.

मला मिसेस अँड्र्यूजने, पाच हजार डॉलर्सची प्रेमाने मदत केली आहे, आणि स्वतःच्या सामर्थ्याने हिंदुस्थानात परत जाण्याचा मी निश्चय केलेला आहे, तसेंच मी अमुक दिवशीं निघणार, ही बातमी पतिराजाना समजताच्च अगदीं अचूक त्या दिवशीं ते मला बोटीवर पोचविण्यास आले! त्यावेळीं पतिराज तोंडांत खडीसाखरेचे मोठमोठे खड धरूनच माझ्याशीं बोलत आहेत असें तेव्हा मला वाटलें! इतके ते त्यादिवशीं गोड, साखरेसारखे, बोलत होते! माझा समुद्रप्रवास मुलांच्यासह सुखाचा होवो, आणि सुखाने हिंदुस्थानात मी जाऊन पोहोचो, म्हणून लांबलचक मला आशीर्वाद देण्यासहि त्यानी कमी केलें नाहीं! त्यावेळीं मोठ्या दोन मुलाना मी अमेरिकेंतच ठेवले; व एक मुलगा आणि अमेरिकेत जन्मलेल्या दोन मुली याना बरोबर घेऊन हिंदुस्थानाकडे परत फिरले. ही कादंबरी लिहीत असता अमेरिकेत ठेवलेल्या, दोन मुलांच्यापैकीं थोरल्या मुलाचा मृत्युहि झाला!

---

## प्रकरण ९ वें



# बाबांचें आजारीपण.

अमेरिकेतून निघताना मला पुष्कळच आशा वाटत होती, कीं, हिंदुस्थानांत परत जाऊन तरी मी सुखी होईन. परदेशांतला मी पुष्कळच अनुभव घेतला होता. हिंदुस्थानांत जाऊन स्वावलंबनाने जगण्याचें सामर्थ्य आता आपल्यात आहे, असा आत्मविश्वास माझ्यामध्ये उत्पन्न झाला होता. परंतु ती माझी आशा पुढील आयुष्याच्या अनुभवानें पूर्णपणे खोटी, नव्हे मृगजलवत् ठरली. हिंदुस्थानांतील मनुष्य परदेशांत जाऊन निरलस होऊं शकते; आपली कर्तबगारी दाखवूं शकते; हिंदी शरीर, हिंदी बुद्धिमत्ता, हिंदी कार्यक्षमता हीं परदेशीयाच्या बरोबर टिकाव धरूं शकतात; किंबहुना श्रमांमध्ये आणि सहनशीलतेमध्यें कांकणभर अधिकच सरस ठरूं शकतात, असे अनुभवाने सिद्ध झालेले आहे. पण तेच हिंदी मनुष्य, परदेशांतील आपले तेज स्वदेशात दाखवूं शकत नाहीं. तें मनुष्य बोथट, निरुत्साही, अडेल होतें; मूढ होतें; आणि हिंदी व्यवहाराच्या कसोटीस हिणकस ठरतें ! तीच स्थिति माझीहि झाली. शिवाय माझ्यामध्यें तर धर्मांतराचा प्रश्न म्हणजे एक मोठी धोंडच होती. त्यामुळें मी सर्वांपेक्षा अधिक दुःखी, अधिक दुर्बळ, अधिक अक्षम ठरले होते. अमेरिकेंतून निघतांना, हिंदुस्थानात जाऊन आपण अमुक करावयाचे, अमुक रीतीनें वागावयाचे, असे कितीतरी मनोराज्य मी ठरविलेले होतें ! हिंदुस्थानात तेव्हा दोन रमाबाई सर्वांच्या जिव्हाग्रीं होत्या. मला वाटत होतें, मीहि त्यांच्या सारखेच महत्कार्य करून दाखवून तिसरी रमाबाई का होणार नाहीं ? अशा महत्वाकांक्षेनें प्रेरित होऊन मी परत हिंदुस्थानास निघाले.

समुद्रप्रवासास निघतांना प्रवाशांना तीन गोष्टींकडे फारच लक्ष ठेवावें लागते. ' समुद्र ' सध्यां कसा आहे ? ' रफ् सी ' आहे, कीं स्टॉर्मी आहे, का ' गेल ' होत आहे यांजकडे अति लक्ष द्यावें लागतें. त्या गोष्टींकडे लक्ष ठेवून मागील प्रकरणीं सांगितल्याप्रमाणें अमेरिकन भगिनींचा आणि पतिराजांचा निरोप घेऊन मी माझ्या तीन मुलांसह उत्साहानें बोटीवर पाऊल टाकलें.

चेंडूप्रमाणें बोट डोलूं लागताच मला फार भीति वाटूं लागली. तशा भयभीत स्थितींत दोन दिवस गेले. आणि तिसऱ्याच दिवशीं समुद्रांत भयंकर धुकें दिसूं लागलें; त्या अडचणीमुळें आमची बोट जिब्राल्टरला कोळसा घेण्याकरतां थांबली. बोटीला दुसरी बोट दिसणार नाहीं इतकें तें भयंकर दाट धुकें पसरलेलें होतें. तशा स्थितींत, धुकें नष्ट होईपर्यंत एका बंदरांतील हॉटेलमध्यें मुलांच्यासह मला आठ दिवस काढावे लागले. अशा संकटाच्या वेळीं हॉटेल्सना फार तेजी असते. खाद्य पदार्थांचे, राहाण्याचे भाव अतिशयच वाढतात, व हॉटेलवाल्या मालकांचे उखळ पांढरें होतें. तेवढ्या अवधींत माझे ३५ डॉलर्स खर्च झाले, व ते मी तार करून अमेरिकेहून मागवून घेतले. त्यानतर आमची बोट पुनः पुढील प्रवासास निघाली.

या वेळीं बोटीवर एक फारच महत्त्वाची गोष्ट घडली. ती गोष्ट मी विसरून जाणें शक्य नाहीं! मी बोटीवर फर्स्टक्लासचा पॅसेज रिझर्व केला होता. त्यामुळे माझी व मुलाची उत्तम सोय झालेली होती. पण एक दिवस एक विघ्न उपस्थित झाले. एक सुंदर फ्रेंच तरुणी एके दिवशीं बोटीवर चढली! तिची वागणूक, तिचा पोषाख, तिची वेषभूषा, तिचे रत्नजडित अलंकार या सर्वच गोष्टी तिच्या अतुल वैभवाची साक्ष देत होत्या. शरीर बहुतेक सर्व उघडें आणि अंगावर जिकडे तिकडे हिरेच हिरे चमकत होते! वस्त्र अत्यंतच तलम, असून नसल्यासारखें! तिने नेसलेल्या तलम झग्याचीं दोन्ही टोकें दोन्ही बाजूस आपल्या गोडस हातात धरून तिच्यामागें मंदगतीनें चालणाऱ्या दोन दासीहि तिच्या होत्या. परदेशांत झगे धरावयास दासी असणें ही गोष्ट, हें चिन्ह, फार श्रीमंतीचें आणि ऐश्वर्याचें समजतात. इयरिंग, आंगठी, सर्व कांहीं हिऱ्यांचें. हिऱ्याच्या कोंदणांतच तिचें शरीर बसविलेलें आहे कीं काय असा भास होत होता! आपल्या इकडची हिंदुस्थानांतील बोलपटातील ती 'स्टार' नटी नव्हती, तर खरोखरीची तारकाच भूतलावर, त्या बोटीवर, अवतरलेली होती. बोटीवरच्या सर्व प्रवाशांचे तिनें आपल्याकडे पूर्ण आकर्षण करून घेतलेलें होते.

कप्तानाच्या हाताखालीं 'स्टुअर्ड' म्हणून एक, बोटीची व्यवस्था पाहणारा अधिकारी असतो. तो तेव्हां तिला घेऊन माझ्या रूमकडे आला. व मला

त्या स्त्रीच्या देखत म्हणाला "This lady wants your room!" अमेरिकन भाषा तेव्हा मला चांगल्यारीतीनें अवगत झालेली होती. त्यानें प्रश्न विचारल्यावर मी त्याला कांहीं उत्तर देणार, त्या आधींच तो मला पुनः म्हणाला, " ही तुमची खोली, या श्रीमंत बाईसाहेबांना फारच आवडली आहे. तेव्हा ती तुम्ही खाली करून द्या; मी तुम्हाला दुसरी खोली देईन." तो आपल्या रुबाबात होता !

मी निर्भयपणें उत्तर दिले, " ही गोष्ट होणे शक्य नाहीं ! माझ्या मुलाची व माझी फारच गैरसोय होईल. त्यासाठीं असा बदल मी करूं इच्छित नाहीं."

माझ्या उत्तराचा त्या सुंदर लेडीला तर राग आलाच, पण स्टुअर्डला तो फारच आला ! त्याला तेव्हा आपला अपमान झाल्यासारखें वाटले. त्यानें कप्तानकडे चलण्यास हुकूम केला. मी धीटपणे कप्तानकडे गेले.

कप्तान दिसण्यांत भयंकर माणूस दिसत होता; जणुं कांहीं तो राक्षसच दिसत होता म्हटले तरी चालेल. त्याच्या विशाल आणि पुष्ट वक्षःस्थलावर खूप बिल्ले चमकत होते. भयंकर संकटातून बोट वाचविली असता, असे बिल्ले कप्तानाना सन्मानार्थ देण्यात येतात; त्या कप्तानास फारच मान दिला जातो. दरारा दाखविणाऱ्या स्वराने मला तो म्हणाला " या बाईसाहेब तुझी रूम मागत आहेत, तेव्हा त्यांना ती तूं दे !"

मी पूर्वीप्रमाणेच निर्भयपणे उत्तर दिलें, " मला माझी रूम देता येत नाहीं. आज ४ महिन्यांपूर्वीच मी माझी जागा रिझर्व केलेली आहे. तेव्हां ती काय म्हणून सोडूं ? असें मला सांगण्याचा तुम्हांलाहि काय अधिकार आहे ?"

कप्तान मला संतापाने म्हणाला, " माझी आज्ञा आहे ! माझी आज्ञा तूं ऐकलीसच पाहिजे."

मी दृढनिश्चयानें म्हटलें, " समुद्रांत तुमची आज्ञा ऐकणें मला भागच आहे. कारण या बोटीवर तुम्ही सत्ताधीश—'बादशहा' आहांत. पण अशी अन्याय आज्ञा मी मान्य करूं शकत नाहीं. मग त्यासाठीं मला जें कांहीं शासन करावयाचें असेल तें करा ! मी ही आपली आज्ञा मान्य करणार नाहीं. जागा

खालीं करण्यासंबधीं तुम्ही मला लेखी हुकूम द्या; म्हणजे तो मी अवश्य मानीन. मुंबईला पोचल्यावर त्यामुळे मला या अन्याय्याविरुद्ध कंपनीस जाब विचारता येईल. एरव्ही मी जागा खालीं करून देऊं शकत नाहीं ! ”

कप्तानाचा राग अनावर झाला होता. पण तो पुष्कळच संयमी आणि विचारी दिसला. कारण, थोड्याच वेळाने तो स्टुअर्डकडे वळून म्हणाला, “ ही म्हणते तें बरोबर आहे. मला कायद्याने हिची जागा ( रूम ) या बाई-साहेबांना खालीं करून देता येणार नाहीं ! ”

अशा रीतीने सर्वांचा नाइलाज झाल्यावर माझ्यावरील ते आकस्मिक संकट टळलें.

अमेरिकेंत जिकडे तिकडे गौरवर्णीय लोकच नजरेला अधिक दिसतात. हिंदुस्थानांत ती स्थिति कोठून आली आहे ! बोट मुंबईला येऊन लागतांच, माझीं मुलें हिंदी लोकाच्याकडे टकमका बघून मला आश्चर्यानें विचारूं लागलीं, “ Mother ! How is this ? Here these all people are black ! ”--आई ? केवढा हा चमत्कार ! हे इथले सारे लोक काळेकुट्ट दिसत आहेत ! ” पण, त्या अर्भकाना हे ठाऊक नव्हते, कीं, आपण सुद्धा काळ्या लोकापैकींच कोणी लोक आहोंत ! अज्ञानाने त्यानी तो प्रश्न केला होता. त्यानतर मी बोटीवरून खालीं उतरले. माझ्या स्वागताकरता माझे एक दीर मुद्दाम बोटीवर आले होते !

अमेरिकेंत गेल्यापासून कांद्याचीं भजीं मी कधीं खाल्लीं नव्हतीं. तीं बंदरावर दिसतांच अधाशीपणाने तीं मी कौतुकाने विकत घेतलीं, आणि फडशा पाडून नारळाचें पाणी वर प्यालें ! अमेरिकेंत मिरची सुद्धां दृष्टीस पडावयाची पचाईत ! अमेरिकेंत एकदा मुलाची दृष्ट काढण्याकरतां, महत्प्रयासाने एका चिनी हॉटेलांतून मी एक लवंगी मिरची मिळविली होती ! तिचीहि किंमत जबर ! तिखटाच्या ऐवजीं परदेशात मिऱ्यांची पूड अधिक वापरतात.

मुंबईस आल्यावर सर्व सामानासह मी दिराकडेच उतरले. अमेरिकेंतून निघतांना, मी हिंदुस्थानकडे येत असल्याबद्दल माझ्या वडिलांना कळविलें होतें.

ते माझी वाटच पहात होते. त्यावेळीं ते पुण्यास, माझ्या धाकट्या बहिणीकडे फार आजारी होते. त्यानी मला तेव्हां मुंबईस तावडतोब तार केली, आणि पुण्यास येऊन भेटून जाण्यास कळविलें.

मी दिराला म्हटलें, "हें माझें आठ पेट्या मौल्यवान सामान मी अमेरिकेहून आणलेलें आहे, ते येथेंच असूदे. मी परत आल्यावर त्याची नीट व्यवस्था लावीन."

दीर उद्गारला, "आम्हाला तुझें सामान काय करावयाचें आहे?"

मी पुनः म्हटलें, "वडिलाचा आजार ज्या प्रमाणांत असेल, त्या प्रमाणांत मी मुंबईस पुनः उशिरा अगर लौकर परत येईन. माझ्या मुलांना तुम्ही साभाळाल का?"

दिरानें उत्तर दिलें, "आनंदाने सांभाळूं!"

मलाहि मुलांना पुण्यास वडिलांचेकडे घेऊन जाणें धर्मांतरामुळें अशक्य होतें. माझ्या मुलांना मी तिकडे कशी नेणार? माझ्याबद्दलच आधीं माझ्या वडिलाना अगर माझ्या बहिणींना काय वाटत असेल, याबद्दलच मी मनात साशंक होते. मग मुलाची अडचण तर अधिकच! तशा चिंतामग्न स्थितींतच मी पुण्यास गेलें!

पुण्यास अशी मी जाऊन पोचतें न पोचते तोच दोन दिवसांतच माझी एक थोरली बहीण वडिलाच्या समाचाराकरता तेथें आली. मला पाहतांच तिच्या पोटात धस्स झालें! ती धाकट्या बहिणीस एकीकडे नेऊन, तिच्याशीं कुजबुजत म्हणाली, "सुंदरला घरात कशाला येऊ दिलेंस? ती बाटलेली आहेना? आपली जरी ती सख्खी बहीण आहे, तरी तिला आपण घरीं ठेवून घेणं बरे नाहीं! शक्य तितक्या लौकर तिची येथून रवानगी होऊंदे, तिचा पाय आजच येथून बाहेर निघूदे; अजून आपल्या मुलीबाळींचीं लग्नें कार्ये व्हावयाचीं आहेत!"

माझ्या त्या दोन सख्ख्या बहिणींचा, माझ्या विरुद्ध चाललेला संवाद माझ्या कानांवर पडतांच, माझ्या अंतःकरणांत शत शत शूल खुपसल्यासारख्या वेदना झाल्या! मी माझ्या बाबांना भेटण्याकरतां आलें होतें. दुसऱ्या एका थोरल्या

बहिणीचा कटु अनुभव तत्पूर्वी, म्हणजे मुंबईस येताच मी घेतलेला होता. मुंबईसच तेव्हा माझी एक थोरली बहीण होती. मी तिला भेटण्याकरता तिच्याकडे गेलें. तिचीं मुलें बाहेरच खेळत होतीं! "मावशी आली! मावशी आली!" म्हणून मोठ्यानें ओरडतच, मला बघताच, तीं आंत आपल्या आईकडे गेलीं! माझी ती बहीण मुलांच्या निरोपानें बाहेर तर आलीच नाहीं, पण आतूनच तिनें एका खणखणीत आवाजाच्या मुलामार्फत मला बाहेर निरोप पाठविला, कीं, "तिला म्हणावं, तूं ज्या दिवशीं शारदासदनामध्ये गेलीस, त्याच दिवशीं तूं आम्हाला मेली आहेस. तूं आमची कुणाची बहीण नव्हेस, किंवा आम्हीहि तुझ्या कोणी बहिणी नव्हे. अर्थात् पुनः तिला भेटण्याचा, किंवा तिचें तोंड पाहण्याचा प्रश्नच मुळीं येत नाहीं! आम्हाला असल्या बहिणीचें तोंडसुद्धा पहावयाचें नाहीं. आलीस तशी, किंवा थोडा विसावा घेऊन पुनः इंग्लंडला जा! अमेरिकेला जा! नाहींतर आणखी कुठं जा! पाहिजे तर दाही दिशाच्या बाहेर जा!!" अशा रीतीचा भगिनी-प्रीतीचा जहरी अनुभव मी नुकताच घेऊन चुकलें होते. म्हणून या वेळीं पुण्याच्या बहिणींचे उद्गार कानांवर पडतांच, मी रागावलें नाहीं. मी त्यांना तेव्हां समंजसपणे म्हटलें, "मी तुम्हांला नको आहे तर तुम्ही मला शिवूं नका, भेटूं नका; अगर माझ्याशीं बोलूं नका! बाबाच्यासाठीं मी आलें आहे! त्याना भेटायला मी आलें आहे. त्यांच्यासाठीं माझा जीव तळमळतो आहे, म्हणून मी आलें आहें. ते मला जा म्हणाले, कीं मी जाते. क्षणभरहि त्या नंतर मी येथे थांबणार नाहीं!" असें म्हटल्यावर आपसात काहीं तरी निश्चित करून, त्या माझ्या दोघी बहिणी गप्प बसल्या. मनांतून मात्र त्यांच्या तळपायाची आग मस्तकास जाऊन पोचली होती.

बाबांच्यावर माझें अत्यंतिक प्रेम होतें. बाबा फार मारुतिउपासक होते. मीहि मारुतीचीच भक्ति मनोभावें करीत आल्यें होतें. म्हणून बाबाना आजारी सोडून आपण निघून जाणें मला इष्ट वाटले नाहीं. बाबाच्याकरता, त्यांच्या सेवा-शुश्रूषेकरतां माझा जीव एकसारखा ओढत होता. अंतिम कालात बाबांची शुश्रूषा आपल्या हातून घडावी अशी माझी उत्कट इच्छा होती.

तेव्हा मी बाबाना विनवणीच्या स्वरानें म्हटलें, " बाबा, तुमच्या प्रकृतीला खात्रीनें लौकर आराम वाटेल; पण ही पुण्याची हवा तुम्हांला चागली नाहीं. तुम्ही लोणावळ्याला हवा बदलाल, तर फार लौकर बरें वाटेल. मी तुमची माझ्या खर्चानें चांगली शुश्रूषा करीन. तुम्ही चिंता करू नका."

माझ्याहि मनांतून तेव्हा लोणावळयास रहावयाचें फार होतें! व तेथें राहून बाबांची शुश्रूषा करणें मला अगदी सहज शक्य होतें. बाबाना माझा विचार पसंत पडला; आणि ते मला म्हणाले, " तू जागा ठरव, आणि मला लोणावळ्याला घेऊन जा. सुंदर, तुझ्याशिवाय माझी शुश्रूषा चांगली कोणी करणार नाहीं! तुझें जागेचें निश्चित झालें, कीं, मी यावयास तयार आहे!"

बाबांच्या त्या संमतिनें मला फार आनद झाला. बाबाच्या ऋणातून, त्यांच्या सेवाशुश्रूषेनें अंशतः मी ऋणी होईन, ऋणमुक्त होईन, असें मला तेव्हां वाटलें; आणि त्या उत्साहभरात बहिर्णींच्याकडे दुर्लक्ष करून, मी तावडतोब मुंबईस परत आलें. परत येतांना मी दृढनिश्चय केला, कीं, भविष्यकाळीं आपण कायमचे लोणावळ्यासच राहावयाचें.

पण मुंबईस परत येऊन मी काय पाहिलें? माझ्या सामानाच्या सर्व पेट्या रिकाम्या आणि उघड्या पडलेल्या होत्या! मुलें दीनवाणीनें माझ्या वाटेकडे डोळे लावून बसलीं होतीं. मी तो कल्पनातीत देखावा पाहून आश्चर्यमूढच झालें! माझ्या सामानाचा, माझ्या बहुमोल पुस्तकाचा, माझ्या महत्त्वाच्या कागदपत्रांचा दिराला मोह उत्पन्न झाला असेल, ही कल्पनाहि प्रथम मला करवली नाहीं. पण पुढे जें त्याचें वर्तन माझ्याशीं, माझ्या पतीशीं, माझ्या मुलींच्याशीं घडून आलें, त्यावरून असें दिसून आलें, कीं, भावाची बायको असहाय असली, गरीब असली, अडाणी असली, म्हणजे तिचा थोरला दीर तिच्याकडे स्वार्थी दृष्टिनेंच पाहतो. त्यांतून तिचा नवरा दूरदेशीं असेल, व ती भावजय वडील दिराच्या तडक्यांत आश्रयानें सापडलेली असेल, तर त्या दिराचा दुष्टावा कळसासच पोचतो. शेवटीं त्या भावजयीचा, गरीब अबलेचा, त्या भाऊबंदकीनें नाश होतो; तिचा संसार,

तिची चीजवस्त, तिची संपत्ति, तिचे सर्व कांहीं त्या दिरांकडून लुबाडलें जातें; आणि तो तिला रस्त्यावरची भिकारीण करून सोडतो !

माझा विश्वासघात झाला होता ! माझ्ने अनेक महत्त्वाचे कागदपत्र नष्ट झालेले होते. मी तेव्हा थोड्याशा रागानेच दिराला म्हटले, "या माझ्या पेट्या अशा रिकाम्या कशा ?"

दिरानें आपल्या कानांवर हात ठेवून उत्तर दिलें, "आम्हाला काय ठाऊक ? अमेरिकेला त्या सीलबद्द केल्या होत्या काय ?"

मी सरळपणें विचारलें, "या तुमच्या विचारण्याचा मला काहींच अर्थबोध होत नाहीं. मी पुण्यास जाताना पेट्याना कुलुपें होतीं; आणि आता त्या उघड्या आहेत ! शिवाय, माझ्या वस्तूहि त्यात नाहींत !"

दिरानें रागाच्या मुद्रेनें मला उत्तर दिलें, "आम्हांला मग तू चोर ठरवते आहेस कीं काय ?"...

त्यावेळीं माझें अत्यंतच नुकसान झालें. माझ्या प्रथम पतीची बहुमोल आंगठी, जी मी जिवापलीकडे जपून ठेवली होती, तीहि त्यातून नष्ट झाली. डायऱ्या,—ज्यांतून लोकाकडे येणें असलेल्या शेकडो रुपयाची कायदेशीर नोंद होती, त्या डायऱ्याही गेल्या. जिन्नस तर एकहि हातास लागला नाहीं. शेतानेंच कुंपण खाल्यावर दाद कोणास मागावयाची ?

माझ्या मनावर त्या गोष्टीचा भयंकर परिणाम झाला. पण मी काय करणार होतें ? त्या बाबतींत काय करूं शकणार होतें ? मनाचा तोल सांभाळून विचार केला, कीं, या घरांतून आपण आपलें पाऊल शक्य तितक्या लवकर बाहेर काढावें, हेंच चागलें; मुलांना घेऊन आपण लोणावळ्यास, बाबाच्या शुश्रुषेकरतां जाऊन राहावें ! पण तोहि माझा मनोरथ संपूर्णरीत्या सिद्धीस गेला नाहीं !

## प्रकरण १० वें



# मजवरील कामांधाची नजर !

बाबांच्या प्रकृतीला लौकरच आराम पडावा म्हणून मी लोणावळ्यास एक जागा तांबडतोब भाड्यानें घेतली. बाबांच्याबरोबर आईहि पुण्याहून आली होती. त्यावेळीं आई स्वतः अन्नपाणी त्यांना घालीत असे. व मी त्यांची सेवाशुश्रूषा करणें, औषध देणें या गोष्टी करीत होते. परंतु तीहि माझी सेवा माझ्या इतर बहिणींना पाहवली नाहीं. धाकट्या बहिणीच्या मनांतून बाबानी आपल्या घरातून पुण्याहून जाऊं नये, असें होतें. त्यामुळें तिनें पुढें एक दिवस आईला व बाबाना धाक घातला, कीं, "हें तुम्ही काय चालवलें आहे ? ती सुंदर आहे ख्रिश्चन, आपण आहोत हिंदु. थोडातरी तुम्ही स्पर्शास्पर्शाचा विचार ठेवावयाचा होता !" त्यावेळीं माझ्या मोठ्या बहिणीने बाबांच्यापुढें फारच तर्कशुद्ध माडणी केली ! ती म्हणाली "बाबाचा मृत्यु होऊं नये, असं मला सुद्धा वाटतं ! तिच्यापेक्षांहि मला माझे बाबा अधिक पाहिजे आहेत. पण दुर्दैवानं आपण वाईट धरून चालू, कीं, या आजारीपणांत बाबांचं जर कांहीं बरंवाईट झालं, तर त्यांच्या अंतिम क्रियेला पुढें होणार कोण ?" तिला अगदीं स्पष्टच म्हणावयाचें होतें, कीं, "बाबाच्या प्रेताला कोणी उचलील कां ?" मग अशा स्थितींत "सुंदरचा मोह सोडणें, आणि मुलगीच आधीं मेली आहे असें समजणें इष्ट नाहीं काय ? ती अमेरिकेहून आली, शाहणी झाली, आपणां सर्वांना दुरून भेटली, पुष्कळ झालें ! याहून अधिक संबंध तिच्याशीं ठेवणें आपल्याला मुळींच इष्ट नाहीं !"

इतकें सांगूनच ती स्वस्थ राहिली नाहीं, तर तिनें दादरला आपल्या जांवयाकडे बाबांची राहण्याची गुप्त व्यवस्थाहि केली; आणि एक दिवस पहाटेच्या सुमारास तिनें बाबाना स्टेशनवर पळवलें. ती गोष्ट मला फार उशिरा समजली. बाबांना बिछान्यावरून उचलून नेण्याचा कार्यक्रम, मला गाढ झोप लागल्यावर, रात्रीं अगदीं गुप्तपणें करण्यांत आला. परंतु बाबानी

शेवटीं स्टेशनवर हट्ट धरलाच, कीं, "सुंदरला स्टेशनवर बोलावून घ्या! मी तिला एकदां शेवटची पाहीन. तिला एकदा पाहिल्याशिवाय निघून जाण्यानें माझे प्राण कुडींतून सुखानें जाणार नाहींत."

शेवटीं बाबांच्या इच्छेकरतां, नव्हे हट्टाकरतां बहिणीनें व आईनें पहाटे मला स्टेशनवर येण्याविषयीं निरोप पाठविला. मी घाईघाईनें स्टेशनवर गेले. त्यावेळीं मला पाहतांच बाबांना जें रडूं कोसळलें तें अपरिमित. शेवटीं बाबांची व माझी जी त्या दिवशीं ताटातूट झाली, ती अखेरचीच. धर्मांतर – केवळ माझें धर्मांतरच पित्याच्या प्रेमाच्या आड आलें, आणि बाबांना माझा अखेरीस त्याग करावा लागला!

त्यानंतर बाबा दादरला गेले. पण तेथें प्रकृति सुधारण्याच्या ऐवजीं ती अधिकच बिघडली. बाबाना आपल्या मृत्यूची त्या दिवसाची पूर्ण कल्पना होती. ज्या दिवशीं त्याचा मृत्यु झाला, त्याचे आदले रात्रीं त्यानी सर्व आप्तेष्ट मंडळींना, मुलींना जवळ बोलावलें; आणि त्यांना सागितले कीं, "आज पहाटे मी इहलोकांतून जाणार! मारुतिरायाचें मला निमंत्रण आलेलें आहे. आता अधिक काल या लोकात राहता येणें शक्य नाहीं. मला आज मारुतिला नैवेद्य दाखवावयाचा आहे. तेव्हा थोडा तामलीभर ताजा भात, वरण, तूप, निरांजन सर्व कांहीं आणा; तो नैवेद्य मारुतिरायास दाखवून मी मरेन." असें म्हणून माझ्या बाबानीं, मुलींना आपल्या जवळ अधिकच बोलावलें, आणि अत्यंत सद्गदीत अंतःकरणानें त्यांनी त्यांना सांगितलें, कीं,—

"मुलींनो! तुम्हांला या अंतिमकालीं द्यायला, मजजवळ कांहीं नाहीं! पण एकच बहुमोल उपदेशाचा ठेवा, मी तुम्हांला आज देऊन जातों; आणि तो म्हणजे, 'नीति' हा शब्द. नीति हा मनुष्याचा अपूर्व ठेवा आहे. सर्वांत शील बळकट पाहिजे. तुम्ही कुठेहि असलां, तरी हाच ठेवा, तुम्हांला उपयोगी पडेल. मी ज्या पवित्र ठिकाणीं जात आहे, तेथें तुम्हांलाहि यावयाचें असेल, तर हा माझा दोन अक्षरी मंत्र तुम्ही जपा. 'नीति' हा पृथ्वीमोलाचा

शब्द आहे. तो महाशब्द तुम्ही आपल्या कंठांत, मंगळसूत्रांत, कुंकवांत, धारण करा. हृदयाच्या कपाटांत तो बंदिस्त करून ठेवा. तुमच्या ओठावर आणि हृदयात, चालण्यांत आणि बोलण्यांत सर्वदा तो कंठीं धरा; तुमच्या कनवटीला बहुमोल जिन्नसाप्रमाणें तो लावून ठेवा. त्या शब्दाच्या संरक्षणासाठीं तुम्हाला मुलींनो, आयुष्यांत फारच कष्ट सोसावे लागतील. पण त्याची किंमत करावयास जगात ताजवा नाहीं! त्याची किंमत जाणून त्याबद्दलचे कष्ट तुम्ही सोसा.” असें बोलून ते गाढ झोपी गेले!

सर्वांना वाटलें, ज्या अर्थी आज बाबाना इतका उत्साह आहे, त्यांना गाढ झोप लागली आहे, त्या अर्थी आज त्याना आराम वाटेल, उतार पडेल. पण ती सर्वांची कल्पना फोल ठरली!

सकाळीं ७ वाजले, तरी बाबा उठेनात, किंवा त्यांची कांहीं हालचाल दिसेना, तेव्हां त्यांच्या अंगावरचें पांघरूण हलकेंच काढण्यांत आलें,—दूर करण्यांत आलें; पण तेथें काय होतें? बाबांचें केवळ लांकूड झालें होतें. देहाला सोडून प्राण केव्हांच निघून गेला होता! नीतीची आणि बाबांच्या मृत्यूची ती हकीकत, पुढें माझ्या एका बहिणीच्या तोंडून मला कळली.

त्यावेळीं माझ्या आईवर जो प्रसंग आला, तो वर्णन करणें शब्दाच्या पलीकडे. एकवेळ, माझ्यापुढेंहि, पहिल्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें, वपनाचा प्रश्न होता. बाबा माझ्यावर त्या दुष्ट रूढीचा प्रयोग करण्यास सिद्ध झाले होते; पण दुर्दैवानें, आईच्या कमनशिबानें आईवरहि तोच भयंकर प्रसंग येऊन ठेपल्यावर तिनें आकाशपाताळ एक करून सोडलें! त्यावेळीं आईचे जे हाल करण्यांत आले, ते काय सांगावें! ती धाय धाय रडत असतां चार विधवा-बायकांच्या सहाय्यानें माझ्या बहिणींनीं तिला बांधून टाकलें, तिचे गालगुच्चे घेतले; आणि शेवटीं बळजबरीनें तिचें मंगळसूत्र आणि केस प्रेताबरोबर दहनार्थ देण्यात आले. आई वपनाच्या अगदीं विरुद्ध होती. अशा रीतीनें लोणावळ्यास राहण्याचें माझें मनोराज्य समूळ उलथून पडलें, आणि बाबांनाहि मी मुकलें!

लोणावळ्यास तेव्हां दोन मुली व एक मुलगा यांना घेऊन त्यानंतर मी दोन महिने काढले. पतिराजांनी मला अमेरिकेंत वचन दिलेलें होतें, कीं, "या मुलांना तूं सांभाळ, तुला मी नियमित कांहीं रक्कम पाठवत जाईन." त्या वचनाप्रमाणे ते पैसे पाठवतील व मी मुलांना घेऊन लोणावळ्यास राहीन, अशी आशा मनात धरली होती. पण त्याहि बाबतींत मला निराशच व्हावे लागलें. प्रथम पतिराजानी मजकडे पैसे पाठविण्याचा उपक्रम सुरू केला; पण मुंबईच्या दिरानें त्याना पत्रावर पत्रें लिहून ते पैसे आपणाकडे घेतले. पतिराजांना मी पत्रावर पत्रें पाठविलीं तरी एकाचेहि उत्तर येईना. दिराचें म्हणणें असें होतें कीं, मी त्याच्याजवळ राहावें. परंतु तशा प्रकारें राहण्यास मी मुळींच तयार नव्हतें. त्यामुळें माझ्यावर अगदीं उपासमारीची पाळी येऊ लागली. काय करावें, मुलांचें पोषण कसें करावें, हा प्रश्न मला रात्रंदिवस भेडसावूं लागला. अमेरिकेंत कांहीं काम मिळण्याची तरी आशा होती; पण हिंदुस्थानांत काय? स्त्रियांना आपली नीति सांभाळून स्वतंत्रपणें जगता येईल, पुरुषांचा संबंधच येणार नाहीं, अशी एक इंचभर तरी सुरक्षित जागा हिंदुस्थानांत आहे काय? मी सगळीकडे आश्रयार्थ उत्सुक नेत्रानीं पहात होते; पण सगळीकडे मला आश्रय देण्यांत माझ्या सौंदर्याकडे दृष्टि होती; स्वार्थ, दुष्ट वासना, आपमतलबीपणा या गोष्टी पूर्णपणें भरलेल्या होत्या. सर्व सहानुभूति स्वार्थी, मायावी, खोटी, दांभिकपणाची होती.

नातेवाईकांचीहि तेव्हां चांगलीच परीक्षा झाली. मनुष्याच्या संकटकालांतच, दारिद्र्यावस्थेंतच खऱ्या नातलगांची पक्की परीक्षा होते. त्यावेळीं अलिबागला मी माझ्या भावाकडे जाण्याचें ठरवून मुलांसह प्रथम तिकडे गेले. मला ठेवून घेण्याची भावाची इच्छा होती; पण तशी इच्छा भावजयीची नव्हती. त्यातून भावाचा संसारहि गरीबीचाच होता. शेवटीं तेथेंहि भावजयीस माझें ओझें वाटूं लागून, एके दिवस तिनें मला निघून जाण्याचा हुकूम केला. धर्मांतर केल्या-बरोबर मनुष्याच्या जीविताचें कांहींच मोल नाहीं; तें जगाला, मूल्यहीन, व भयंकर स्वरूपाचें होतें; याचें माझ्यापेक्षां भयाण चित्र हिंदुस्थानांत दुसरें, [illegible] सांपडणार नाहीं

त्यावेळीं मला माझ्या एका जुन्या मैत्रिणीची फार आठवण झाली. ती तेव्हां मुंबईस मेडिकल कॉलेजांत शिकत होती. ती मूळची शारदासदनांतील, पुण्याची माझी मैत्रिण. ती बालविधवा होती. भावाचे व भावजयीचे त्यांनीं दिलेल्या थोड्या दिवसांच्या आश्रयाबद्दल आभार मानून मी मुलांना घेऊन त्या मैत्रिणीकडे–जिवलग मैत्रिणीकडे मुंबईस गेलें. त्या माझ्या मैत्रिणीचें नाव चंद्राबाई. होतीहि चंद्राप्रमाणेच सुंदर! पंडिता, हुशार, म्हणून तिची प्रसिद्धी होती. घरचीहि ती श्रीमंत होती. एका कोंकणस्थ डॉक्टरवर तिचें प्रेम जडून ती सुखांत होती. मी तिला भेटून माझी सर्व हकीकत सांगितली. "पतिराजांचे-कडून आतां पैसे येत नाहींत, दुसरें कांहीं कामहि मिळत नाहीं, तेव्हां मला कोठें काम मिळेपर्यंत तू आश्रय दे आणि सहाय्य कर," अशी मी विनंति केली.

पण ती आतां पूर्वीची मैत्रिण राहिली नव्हती. ती मला म्हणाली, "मी रोज कॉलेजात जाणार; घरीं कोणी नाहीं; तुझीं मुलें तुझ्याबरोबर; यापेक्षां तू आपल्या दिराकडेच जाऊन राहशील तर तें फार चांगलें होईल." तेव्हां मी म्हटलें, "दुष्ट, स्वार्थी दिराच्या सत्तेखालीं जाऊन रहावयाचें त्यापेक्षां उपासमार झालेली पत्करली, पण आपल्याच माणसाचा जुलूम सहन करणें नको!" तेव्हां मी तिला थोडे दिवस आश्रय देण्याविषयीं पुनः विनंति केली; व तिनें ती मान्यहि केली. माझा उद्देश असा होता, कीं, चंद्राचा आश्रय घेऊन लौकरच कोठें नौकरी उद्योगधंदा पहावा, आणि आपली सोय करून घ्यावी. पण तोही माझा प्रयत्न यशस्वी झाला नाहीं. शेवटीं, नौकरी लागण्याचें तर दूरच, पण नौकरी शोधण्यासाठीं जावयास लागणाऱ्या ट्रॅमच्या भाड्याचेहि पैसे मजकडे राहिले नाहींत. त्यामुळें मी फारच निराश झालें. तशाहि स्थितींत मी फूटपाथनें मैलचे मैल चालत जाऊन नौकरीसाठीं प्रयत्न केला. पण कोठेंच उपयोग झाला नाहीं.

अखेरीस त्या त्रासानें मी अगदीं कंटाळलें. माझा जीव मला नकोसा झाला. असें वाटलें कीं, एकदा या जगांतून मी नष्ट होईन, तर बरें! आतां मुळीं हें जगणेंच नको! म्हणून मी नित्य जीवितनाशाचा मार्ग शोधूं लागलें. नाकरी शोधावयाला जात असतां रोज थोडथोडी अफू, निरनिराळ्या दुकानांतून

विकत घेऊन ती मी सांठवून ठेवूं लागलें. व शेवटीं ती भरपूर सांठल्यावर, प्राणत्याग करण्याचें ठरविलें. आणि एक दिवस ती अफू मी चहाबरोबर सेवन करून अंथरूण धरलें !

चंद्राबाईला या माझ्या अघोर कृत्याची कल्पनाहि नव्हती. पण त्या दिवशीं जेव्हां माझी स्थिति चमत्कारिक झालेली तिनें स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिली, तेव्हां सर्व प्रकार तिनें तेव्हाच ताडला ! तीहि फार घाबरली ! ती एकसारखी त्यावेळीं माझ्याजवळ बसून राहिली. मी तिला निराशेच्या स्वरानें म्हटलें, "चंद्रा ! मी आतां जातें ! जगण्याची माझी इच्छा नाहीं. हीं माझीं तीन मुलें तुझ्या ओट्यांत घालत्यें, त्यांना तूं सांभाळ ! मुलांना तुझ्या स्वाधीन करून मी आतां सुखानें मरेन !"

पण चंद्राबाई कमी वस्ताद नव्हती. तिनें मनांत पूर्ण जाणलें, कीं, एकंदरींत हा सर्व प्रकार आपल्या अंगलट येणारा आहे. तिनें प्रथम माझ्याशीं गोड बोलून खरी गोष्ट जाणून घेतली, आणि तात्काळ गाडी बोलवून, तात्काळ मला दवाखान्यांत नेण्याची व्यवस्था केली. ती तेव्हा मला रागानें म्हणाली, "तुझ्या या आत्महत्त्येच्या कृत्यानें मी मात्र चांगलीच संकटांत सांपडत आहें." असें म्हणून तिनें मला दवाखान्यांत नेलेंच.

दवाखान्यांत गेल्यावर मला ओकण्याचें औषध देण्यात आलें, आणि पोटांत गेलेली अफू पाडण्यांत आली. दवाखान्यातल्या प्रत्येक डॉक्टरनें येऊन माझ्या पापण्या वारंवार उघडून डोळे पाहिले; आणि शेवटीं मी निर्विष झालेली आहे अशी त्यांची खात्री झाल्यावर, ते सर्व निघून गेले.

पण तेव्हढ्यावरच निभावलें काय ? नाहीं ! संकट-परंपरा माझ्यामागें हात धुवून लागली होती. मी चांगली शुद्धिवर येतांच, मला, 'मी आत्महत्त्येचा प्रयत्न केला !' म्हणून ताबडतोब पोलीसांच्या स्वाधीन करण्यांत आलें !

पोलीसांनीं मला आपल्या अधिकाऱ्यापुढें नेऊन उभें केलें. अधिकारी जो होता, तो युरोपियन आणि समंजस, थोर मनाचा होता. मी प्रथम खरें तेंच बोलावयाचें ठरविलें होतें. त्याप्रमाणें प्रथम मी त्याला माझी हिंदुस्थानांतील व

अमेरिकेंतील हकीकत थोडक्यांत सांगितली. माझें अमेरिकन अस्खलित इंग्रजी बोलणें ऐकून तो अधिकारी आश्चर्यानें चकित झाला. त्याला वाटलें, ' बाई चांगली सुशिक्षित आहे. अफू घेण्यास या बाईस, आत्महत्त्येशिवाय दुसरें कांहींतरी कारण असलें पाहिजे, असें त्याला वाटलें.

पुढें मी त्यास खोटेंच सांगितलें, कीं, "माझें पोट आज कित्येक वर्षें फार भयंकर रीतीनें दुखत आहे. मला तें दुखणें सोसवेना. मी ज्याला त्याला औषध विचारीत होते. एका अडाणी बाईनें अफू घेण्यास सांगितलें. ती एक भिकारीण बाई होती! तिने घेण्याचें प्रमाण कांहींच सांगितलें नव्हतें. शेवटीं मरणहि पत्करलें, पण ही जन्माची पोटदुखीची व्यथा नको, असा निश्चय करून, केवळ औषध म्हणूनच, ही अफू मी घेतली होती. मुलें असताना मी आत्महत्त्या कशी करीन? अफू जास्त झाली एवढेच. प्राण देण्याच्या हेतूनें ती मी खाल्लेली नव्हती, आणि नाहींहि!"

तेव्हा त्या अधिकाऱ्याला वाटलें, कीं, "या बाईनें जी अफू खाल्ली, ती मरणाच्या हेतूनें खाल्लेली नाहीं, तर, व्याधीकरतां खाल्लेली आहे! केवळ औषधच म्हणून तिने हें विष घेतलेलें!" असा निर्णय करून तो मला जरा अधिकाराच्या रुबाबांत आणि उपदेश करण्याच्या हेतूनें म्हणाला ' तूं शिकलेली, इंग्लंड-अमेरिकेला जाऊन आलेली, तूं हें मूर्खपणाचें कृत्य केलेंस ही गोष्ट चांगली केली नाहींस. मुंबईत दवाखाने आणि पोटदुखीवर औषध देणारे व इलाज करणारे हुशार डॉक्टर्स काय थोडे आहेत? आज तुला खरोखरी मृत्यूच यावयाचा, पण नशिबाची दोरी अजून शिल्लक आहे, म्हणून तूं वांचलीस! आतां यापुढें अशी भयंकर चूक ' Mistake ' पुनः करूं नको; दक्ष रहा. हा गुन्हा फार भयंकर आहे; या वेळीं मी तुला एकदां क्षमा करून व ताकीद देऊन सोडून देतों!"

पुढें शिक्षा होण्याच्या भयानें तेव्हां माझी अगदी बोबडी वळून गेली होती. जगावें तरी पंचाईत, मरावें तरी पंचाईत! त्या वेळीं एकदाची निर्दोषी ठरून माझी मुक्तता होतांच, समाधानाचा सुस्कारा टाकून, आणि यमरायाचे आभार मानून, मृत्यूच्या अर्ध्या वाटेवरून, मी परत पुनः चंद्राकडे आले; व तिच्या

एकंदर उपकाराबद्दल मी तिचे फार फार आभार मानले. आणि मुलांना घेऊन त्याचक्षणीं मी घराबाहेर पडलें.

त्यावेळीं मुंबईसच असलेल्या माझ्या एका पूर्वीच्या ओळखीच्या युरोपियन स्त्रीची मला आठवण होऊन, मी तिच्याकडे गेले. मिस एजनें तेव्हां मला फारच सहाय्य केलें. ती तेव्हा एका हायस्कूलची मुख्याध्यापिका होती. मी तिच्या सहाय्यानें शिक्षणहि घ्यावें, आणि मेट्रनचेहि काम करावें, अशी तिने योजना करून मला आश्रय दिला.

याचवेळीं माझ्या शीलावर आलेल्या एका दुःखद प्रसंगाची आठवण येथें दिल्यावांचून हें प्रकरण मला पुरें करतां येत नाहीं! मिस एजकडे माझी व्यवस्था होऊन मी थोडीशी मार्ग काढते आहे, तोंच एके दिवशीं एक चमत्कारिक, आकस्मिक, घटना घडून आली, व त्या भयकर संकटांतून मी सुटलें.

मी एक दिवस ट्रॅममधून उतरत असतां, एका तरुण मनुष्यानें मला एकाएकी माझें नांव घेऊन हाक मारली! मी मागें वळून पाहताच ती व्यक्ती पूर्वपरिचित दिसली, म्हणून मी थांबलें. तो मनुष्य माझ्या आईचा एक लांबचा भाऊ होता. चांगला सुशिक्षित, एम्. एल्एल्. बी. होता! तो तेव्हां थाटांत अगदीं माझ्याजवळ आला, आणि मोठ्या सहानुभूतीचा आव आणून मला म्हणाला "सुंदर? तूं अमेरिकेला, इंग्लंडला जाऊन आलीस म्हणून इतका काहीं अभिमान वाटायला नको! मीहि कधींतरी इंग्लंडला जाईन! मलाहि एका ज्योतिषानें समुद्रप्रवास सांगितलेला आहे! किती केलें तरी मी तुझ्या आईचा लांबचा का होईना भाऊच आहे; अर्थात् मी तुझा मामाच नाहीं काय?—मामाच तुझा मी!"

मी त्याला हंसत हंसत म्हटलें, "मामा जवळचा असो कीं दूरचा असो, तो वाईटच! 'दुर्मंत्री राज्यनाशाय, ग्रामनाशाय कुंजरः। श्यालको गृहनाशाय, 'सर्वनाशाय मातुलः॥" राजाचा वाईट मंत्री असेल, तर तो त्याच्या राज्याचा व त्याचा नाश करतो; हत्ती गांवाचा फडशा उडवितो; मेव्हणा—

बायकोचा भाऊ—बहिणीच्या घराचा नाश करतो; पण मामा जो आहे, तो मात्र सर्वस्वाचा नाश करून टाकतो ! " मी आपलें हें तुम्हाला उगीच थट्टेनें म्हणतें आहे ! "

मामा अत्यंत आग्रहानें म्हणाला " तूं आहेस पंडिता ! माझ्या घरीं येत्या रविवारीं जेवायला येना ! मी आतां मोठा वकील झालों आहे ! प्रॅक्टीसहि चांगली आहे. हा घे माझा पत्ता ! जेवायला आल्यावांचून तूं राहूं नको हं ! " असे म्हणून त्यानें आपल्या पत्त्याचे कार्ड माझ्या हातीं दिलें. मीहि आनंदानें त्याच्या निमंत्रणाचा स्वीकार केला. पण मला बोलावण्यांत त्या गृहस्थाचा कांहीं विपरीत उद्देश असेल, याची मला तेव्हा कल्पनाहि आली नाहीं !

रविवारीं मी निर्भयपणें मुलाना घेऊन त्याच्या घरीं जेवावयास गेलें. घरीं त्या वकीलमामाची बायकोहि होतीच. ती बिचारी सुशील गृहिणी होती.

माझें जेवण होऊन मी एका हॉलमध्यें खिडकींतून बाहेर बघत होतें. इतक्यांत तो कामाध नरपशु माझ्याजवळ निर्लज्जपणें येऊन म्हणाला " सुंदर ! तूं किती सुंदर आहेस ! माझं तुझ्यावर फार दिवसांचं प्रेम आहे. तुला तुझ्या नवऱ्यापासून सुख नाहीं. मुंबईला तू उगीच इकडं तिकडं भटकते आहेस. मी तुझें दुःख दूर करीन, आणि तुला भरपूर सुख देईन ! तसाच तुला जरूर असणारा पैसाहि मी पुरवीन; पण माझ्यावर प्रेम करून माझी इच्छा पूर्ण कर !—मी तुझ्यावर आसक्त झालों आहे ! "

विजेच्या धक्क्यापेक्षाहि ते शब्द मला भयंकर वाटले. तो कामांध नरपशु तेव्हा माझी अडवणूकच करूं पहात होता. मी तेव्हा त्या पशूला कांहींच उत्तर दिलें नाहीं. माझी क्रोधपूर्ण मुद्रा पाहिल्यावर त्याच्याकडून, पुढें पाऊल टाकणेंहि झालें नाहीं.

मी तत्क्षणीं वायुगतीनें स्वयंपाकघरांत गेलें. मुलांचीं जेवणें झालीं होतीं. त्यांना चटदिशी ओढून घेऊन मी त्या घरांतून बाहेर पडलें. वकिलीणबाईचा निरोप घ्यावयासहि मी थांबले नाहीं ! माझ्या विचित्र वर्तनानें त्या, माझ्याकडे आ वासूनच पाहात राहिल्या. मी मुलांना घेऊन तडक माझ्या खोलीकडे आले.

तेव्हां मला असें वाटलें, कीं, कीचक कांहीं पूर्वींच होते, असें नाहीं; तर आजहि सर्वत्र कीचक आहेतच. कोणी वकिलांच्या स्वरूपांत आहे तर कोणी अन्य स्वरूपांत आहे, एवढाच फरक! तेव्हा सैरंध्रीच्या हातात मद्यपात्र असेल, आज सुशील स्त्रीच्या हातांत कपबशी आहे एवढेंच, पण कीचक महालांत असतो, ही गोष्ट निश्चित! आजच्या कीचकाची वेषभूषा, त्याची भाषा, त्याचे डावपेच, हीं आधुनिक आहेत एवढेंच. परंतु पूर्वी कीचकाचें जें अंतःकरण होतें, तें तसेंच आजहि आहे, त्यांत मात्र फरक झालेला नाहीं, व होणारहि नाहीं!

एवढ्यावरच ती गोष्ट संपली नाहीं. पुढें तीनच दिवसांनीं तो आधुनिक वकील कीचक गृहस्थ, माझा तपास काढीत, आकस्मात एक दिवस माझ्या खोलीकडे आला. खोलींत पाऊल टाकतांच मी त्याला संतापानें, खोलीच्या दारांतच असलेल्या माझ्या पादत्राणाकडे बोट दाखवून त्यास बजावलें, " एक पाऊल पुढं टाकशील, तर त्या पादत्राणाची आणि तुझ्या गुलाबी गालांची एकदमच भेट होईल! मुकाट्यानें, आलास तसा चालता हो!"

त्यानंतर तो पुनः माझ्या आयुष्यांत कधींहि मला दिसला नाहीं. असे प्रसंग माझ्या गरीब भगिनींच्यावर थोडे का येत असतील? त्याच्यासाठीं ही गोष्ट मी येथें मुद्दाम नमूद करून ठेवीत आहें.

त्यानंतर थोड्याच महिन्यात अमेरिकेहून माझे पतिराज हिंदुस्थानांत माझ्याकडे आले. त्यांच्याबरोबर पुनः कांहीं काल मी संसारहि केला; पण तें माझ्या जीवनाचें मर्मभेदक चित्र, मी पुढील प्रकरणांत वाचकांच्यापुढे ठेवीन!

## प्रकरण ११ वें



# पतीचें गुप्त पापाचरण.

मिस एजच्या सहाय्यानें मुंबईचे मेट्रनचें काम सांभाळून आणि ट्रेनिंगचें शिक्षण घेत, मी १॥ वर्षे काढलें. त्यानंतर माझी प्रकृति फार बिघडल्यामुळें मी बुलढाण्यास गेलें. तेथें मला समजलें कीं, माझे पतिराज हे हिंदुस्थानांत लौकरच येत आहेत. यावेळीं त्यानी विश्वविद्यालयाचें पुष्कळच उच्च शिक्षण मिळविलेलें होतें; व एका मोठ्या संस्थानच्या महाराजांच्याकडे अमेरिकेंतच वशिला लावून हिंदुस्थानांत त्याच्या संस्थानमधील कॉलेजमध्येंच बडी नौकरी मिळविली होती. त्यासाठीं ते हिंदुस्थानांत येणार होते.

बुलढाण्यास जेव्हा माझ्याकडे स्वारी आली, तेव्हां आम्हा उभयतांचें फारसें बोलणें झालेंच नाहीं. फक्त त्यानी अमेरिकेंतून हिंदुस्थानांत माझ्याकरता आपल्या भावाकडे जे पैसे पाठवले होते, त्याबद्दलच विशेष बोलणें झालें. मी म्हटलें, " तुम्ही माझे फारच हाल चालविले आहेत; आता तरी माझी नीट व्यवस्था करणार कीं नाहीं ? माझ्या पैशानें तुमची आणि तुमच्या नातलगाची अमेरिका झाली; तुम्हाला मोठेपणा मिळून सुखाचे दिवस आले, आणि मी मात्र दुःखांत बुडून गेलें आहे, तेव्हा माझा उद्धार केव्हां करणार ? माझा पैसा सर्वस्वी मी तुमच्याकरतां खर्च केला, आणि मी मात्र आज कंगाल झालें आहे, याची कांहीं खंत, पर्वा तुम्हाला आहे किंवा कसें ? " त्यावेळीं स्वारीनें सर्व बोलणें केवळ हंसण्यावारी नेलें, आणि भावीं सुखस्वप्नांचीं रम्य चित्रें त्यानीं माझ्या डोळ्यांपुढें उभीं केलीं ! शेवटीं ते गोड गोड शब्दांनीं म्हणाले, " आतां आपल्याला काय कमी आहे ? मी तुला आतां लौकरच एका बड्या संस्थानमध्यें रहावयास घेऊन जातों. आतां माझे स्टार्स ( ग्रह ) कसे आहेत ते पहा तरी ! संस्थानमधल्या कॉलेजांत मी आता फार मोठा प्रोफेसर झालों आहें. आतां तुला कसली चिंता ? "

मी सर्व दुःख विसरून जाऊन म्हटलें, "मग माझें नशिबच उदय पावलें म्हणावयाचें !"

त्यानंतर ते आपल्या नौकरीवर हजर झाले.

थोड्याच दिवसात तेथें मला त्यानीं बोलावणें केलें, आणि पुनः माझा, मोडलेला संसार सुरू झाला ! परतु पतिराज आतां पहिले कुठे राहिले होते ? आतां त्यांचा सर्व 'अमेरिकन अवतार' झालेला होता. सुखविलास, मद्यपान यांचा त्याच्यावर भयंकर पगडा बसलेला होता. खुद्द संस्थानाधिपतींच्या वशिल्यानें ते नोकरीस लागल्यामुळें बड्या लोकाच्या आणि त्याच्या ओळखी होण्यास फारसा विलंब लागला नाहीं ! तेथें त्यांना कीर्ति, मान, संपत्ति या त्रयीची प्राप्ति झाली. त्यांतून त्यांचा इंग्लिश विषय फार चागला होता. काव्य समजावून देऊं लागले म्हणजे तरुण विद्यार्थी आणि विद्यार्थिनीवर्गाला ते आदिरसांत बुडवून टाकीत ! संस्थानमध्यें त्यांच्या नौकरीचें आसन स्थिर झाल्याबरोबर मेजवान्या, पार्ट्या, मद्यपानसमारंभ, नाचरंग, यांना ऊत आला. दारू पिण्यांत ते आणि त्यांचे थोर मित्र किती रंगत असत याचा एकच अनुभव पुराव्यादाखल बस्स आहे. सर्व मंडळी दारू पिऊं लागली, म्हणजे माझे पतिराज ग्लाससह, ऐन रंगात आल्यावर, टेबलावरच ताडकन उभें राहून व ग्लास वर जितका उंच धरता येईल तितका धरून, ते आपल्या थोर मित्रांना व सरदार मंडळींना सवाल टाकीत, कीं, "माझ्यापेक्षां येथें श्रेष्ठ–उंच–कोण आहे ? सर्वांत श्रेष्ठ, ज्ञानानें, विद्वत्तेनें, अनुभवानें मी आहे !" त्यावेळीं दुसरा एकादा रंगांत आलेला त्यांचा मित्र उठे, तोहि टेबलावर तसाच उभा राही; टाचा जितक्या उंच करता येतील तितक्या उंच तोहि करी, आणि ग्लास हातानें उंच धरता येईल तितक्या उंच तोहि धरी. ग्लास हातानें उंच धरून, पहिल्या वक्त्यास तो उत्तर देई, कीं, "मी मिस्टर...पेक्षां अधिक उंच, मोठा आहे, विद्वान आहे ! "Who is taller than I ?" अशी त्यांच्यामध्यें प्रत्येक मित्राची चढाओढ चाले ! माझ्या पतीना त्या विलासांत अधिक मान असे; कारण ते अमेरिकेंतून सर्व गोष्टींचा अनुभव घेऊन आलेले, अर्थात् तज्ज्ञ होते ! त्या संस्थानमधील त्या

अनेक सरदार–जहागिरदाराच्या लीला, आणि त्यांचीं तीं खाजगी घाणेरडीं आयुष्यें पाहिलीं म्हणजे माझें मन चिडून जाई. डोळे असून पहावयाचें नाहीं, कान असून ऐकावयाचें नाहीं, असा माझ्या आयुष्याचा नवा क्रम सुरू झालेला होता ! मी एकाद्या पिंजऱ्यातल्या मैनेप्रमाणें, सर्व प्रकार अवलोकन करीत गप्प रहावें, अशी पतिची इच्छा होती. पण तसें तरी त्यानीं मला कुठें ठेविलें ? ते मला आपली एक दासी, मोलकरीण समजले. मद्यपान आणि बाहेरख्यालीपणा यांना काहींच सीमा राहिली नाहीं. कोणीतरी हिंदी स्त्री असे नवऱ्याविरुद्ध लिहून जगाला सांगेल काय ? पण मी मात्र जें सत्य तेच लिहावयाचें, डोळ्यानीं पाहिलें तेच सांगावयाचे, असा निश्चय, ही कादंबरी लिहिण्यास प्रारंभ केला तेव्हां प्रथमच सांगितलेला आहे; त्यास अनुसरून लिहितें आहें. स्त्रियांच्यातील तिळाएवढे असलेले दोष पुरुषांच्या डोळ्याना बेलफळाएवढे दिसतात; मग पुरुषाच्यात असलेले बेलफळाएवढे दोष तिळाएवढे तरी आहेत, असें बायकानीं कां म्हणूं नये ? त्याचे आविष्करण त्यांनीं का करू नये ? पुरुषाच्यातील दोष स्त्रीने मनोधैर्य ठेवून आणि नीतिधैर्य ठेवून समाजाला सांगितलेच पाहिजेत. स्त्रियांचा अधःपात झाला असता कुल बिघडतें, कुलाचा नाश होतो, आणि पुरुषांचा अधःपात झाला, त्यांनीं दुराचरण केले म्हणजे कुल बिघडत नाहीं, त्याचा नाश होत नाहीं, हा स्वार्थी नियम कुठला ? सिद्धान्त म्हणजे तो सर्वत्र लागू पाहिजे. स्त्रियांच्यापेक्षां पुरुषच घरांत दोष अधिक आणतात. व्यसनी आणि अधःपतित नवऱ्याची जात, स्त्रीने त्याच्या पायां पडून, त्याची पूजाअर्चा करून, त्याचे जुलुम सहन केल्यानें कधींहि सुधारणार नाही ! दारू पिऊन आपल्या निरपराधी अर्भकांना बुटाच्या लाथा घालणारे सुशिक्षित नरपशु जगांत काय थोडे आहेत ! स्त्रीजातीची विटंबना करणें हें मुळी त्याचें ब्रीदच असतें.

आम्हा पतिपत्निमध्यें जरी इतका विरोध एकसारखा तेव्हां नांदत होता, तरी नैसर्गिक एकमेकांकडील आकर्षण थोडेंहि कमी झालेलें नव्हतें. ज्यावेळीं मी त्यांना उपभोगाकरता, आनंदाकरता, घटकाभर करमणुकीकरतां पाहिजे असे, त्यावेळीं ते शुद्धिवर असले, तर एक माझे खुषमस्करे तरी बनत, नाहींतर कोटी

जन्मांचा जसा कांहीं सूड उगवण्याकरतांच माझ्याकडे धावून येत, अशी स्थिति राही! आणि त्याप्रकारें ते माझा उपभोग घेत!

अशा स्थितींत निसर्गानें घडणाऱ्या गोष्टी मला टाळतां येणाऱ्या नव्हत्या. व त्या टाळण्याची माझ्या मनांत कधीं इच्छाहि नव्हती. दुर्दैवानें अथवा सुदैवानें आमच्या संसाराला पुनः आरंभ होताच मी गर्भवति झालें. त्या गोष्टीची माझ्या पतिराजाना भयंकर चीड आली. अमेरिकेंत त्यानी पाहिलेलें होतें कीं, अमेरिकन स्त्रीपुरुष आपणास एक किंवा दोन यापेक्षा अधिक संतति शक्यतो होऊंच देत नाहींत. वाईट फ्रेंच तरुणी तर ऐन कुमारिकावस्थेंतच चोरून गर्भाची पिशवी, काढून घेतात; त्यामुळें, मी गर्भवती होताच पतिराजाना मी अगदीं नकोशी झालें! आणि 'आधींच उल्हास, त्यातच फाल्गुनमास यावा त्याप्रमाणें ते अधिक छादिष्ट, विषयी बनले. मला स्वतःला गर्भवति होण्याचें मुळीच दुःख वाटत नव्हतें; कारण, मला अमेरिकन किंवा फ्रेंच तरुणी बनून त्याच्याबरोबर रहावयाचें नव्हतें, तर सुखानें खराखुरा संसारच करावयाचा होता. शिवाय तत्पूर्वी त्यांच्यापासून मला तीन मुलें, उभयतांच्या इच्छेनेंच झालेलीं होतीं! सुप्रसूति हें एक प्रकारचें स्त्रियांना सुखच आहे; आनंदच आहे. पण पतिराजाना ती माझी स्थिती मुळींच नको होती. म्हणून त्यानीं एक माझ्या बाबतींत नवीनच प्लॉट तयार केला! गर्भवति स्त्रीची, त्या अवस्थेंत प्रकृतीची थोडीना थोडी तक्रार ही नेहमीच असते. पण त्या माझ्या तक्रारीचा पतिराजानी भलताच फायदा घेतला; व मला जन्माचें जायबंदी करून टाकलें!

गर्भधारणा स्त्रीला अत्यंत आवश्यक गोष्ट आहे. स्त्री-इंद्रियें आपलें कार्य करणार नाहींत, तीं जर निष्क्रीय राहतील, तर स्त्री-देहाचा लौकरच नाश होईल. संतानरहित राहून वासनातृप्ति तेवढी करून घेणें, स्त्रियांना शक्य नाहीं! स्त्रीशीं समागम होतांच पुरुषाचा लैंगिक व्यवहार पूर्ण होतो; त्याची तात्काळ तृप्ति होते; पण स्त्रीची गोष्ट तशी नाहीं. समागमानें तिची तृप्ति झाल्यावर, त्या क्षणापासून तिचीं इंद्रियें अपत्याची आशा करीत असतात; सुप्रसूति होण्यानेंच त्यांच्या त्या संबंधाची पूर्ण तृप्तता होते. प्रत्येक महिन्यांत स्त्रीला

ऋतुस्राव होणे, याचा अर्थच तिची गर्भधारणेची प्रत्येक महिन्यांत तयारी, असाच आहे. अपत्योत्पादना करता पुरुषाला तें प्रति महिन्याला स्त्रीचें नैसर्गिक आवाहनच असतें.

त्यानी मला खोट्या प्रेमानें एकसारखा आग्रह चालविला, कीं, "तुझें एकदा पोट डॉक्टरला दाखीव; म्हणजे आणखी किती मुलें होणार आहेत, तें समजेल! एक कुशल आणि सिद्धहस्त डॉक्टर आहेत. तेव्हा त्याच्याकडून आपण तुझी चांगली परीक्षा करून घेऊं. गर्भवति असतांना मधेच असा प्रकृतीला त्रास होणें चांगलें नाहीं ! माझें ऐक."

मला त्यांचा दूर दृष्टिचा कावा मुळीच ध्यानांत आला नाहीं. माझी आपली भोळीची अशी समजूत झाली, कीं, आपल्या हिताकरतां आपले पतिराज आपली खरोखरीच अति काळजी घेत आहेत ! त्या विचारांनीं मी त्यांच्या म्हणण्यास, आग्रहास संमति दिली.

त्यावेळीं त्यानी मला एका दूरच्या ठिकाणीं त्या डॉक्टरकडे नेलें ! डॉक्टरनें प्रकृति तपासली आणि त्यांच्या देखत मला सांगितलें कीं,..." फार भयंकर स्थिति आहे ! तुमच्या पोटाचें ऑपरेशन करायला पाहिजे. फार भयंकर आजार !-फार भयंकर स्थिति ! "

मी आश्चर्यानें डॉक्टरला म्हटलें, " मला स्वतःला तर कांहींच होत नाहीं, कांहींच तसें वाटत नाहीं, आणि तुम्हांला दिसणारा हा आजार कसला ? माझी प्रकृतिहि चांगली सुदृढ, निरोगी आहे. तर मग तुम्ही असें कसें सांगतां ? "

तेव्हा पतिराज माझ्यावर रागावून मध्येंच म्हणाले, " तुला जास्त समजतं, का डॉक्टरनां ? तूं अगदीं गप्प रहा! रोग फार भयंकर आहे, त्यांना ऑपरेशन करूं दे ! "

अधिकच आश्चर्यचकित, नव्हे आश्चर्यानें मूढ होऊनच मी त्यांना विचारलें " ऑपरेशन ? आणि माझें ? मला झालें आहे तरी काय ? आधीं मला सांगा, आणि मग तरी ऑपरेशन करा ! "

तेव्हा पतिराज म्हणाले, " तुला आतां कांहीं समजावयाचें नाहीं ! ऑपरेशन

झालें म्हणजे तूच म्हणशील कीं, बरें झालें म्हणून !–उत्तम झालें म्हणून ! तुला दीर्घकाळ माझ्याबरोबर रहावयाचें आहे कीं नाहीं ? ”

मी उत्तर दिलें, “ होय ! ”

“ तर मग, ” पतिराज म्हणाले, “ मुकाट्यानें ऑपरेशन करून घे ! ”

शेवटीं नाइलाज होऊन, मला कांहींहि होत नसतां, ऑपरेशनला मी संमति दिली. कसलें ऑपरेशन ही गोष्ट मला अज्ञात ठेवली. ऑपरेशन–टेबलावर त्यावेळीं जो क्लोरोफॉर्म मी घेतला, ते पुढें काय झालें, तें मला समजलें नाहीं.”

हाय ! त्या ऑपरेशनमध्यें माझ्या संमतिवांचून, माझ्या न कळत, माझ्या ‘ ओवरीज ’ काढून टाकण्यांत आल्या; आणि आजीव वंध्यत्वाची भयंकर शिक्षा मला देण्यांत आली. ‘ ओवरी ’ म्हणजे गर्भ राहण्याची अगर गर्भ पोसण्याची, मुलें जन्म घेण्याची, स्त्री–शरीरातील एक विशिष्ट पिशवी. ती नष्ट करतांच माझा मासिक ऋतुस्राव कायमचा बंद होणार होता. आणि पतिराजांना मला संतति होण्याचें वाटणारें भय कायमचें दूर होणार होते. ती गोष्ट त्यानी पूर्ण साधली. माझ्या मते आणि पुढें नार्सिंगचें काम करून मी जे अनुभव घेतले त्यावरून मी स्पष्टपणें असें विधान करूं शकतें, कीं, स्त्रियाचा गर्भाशय, गर्भ राहण्याची पिशवी काढून टाकणें ही गोष्ट फार वाईट; इतकेंच नव्हे तर, स्त्रीच्या असलेल्याहि आरोग्याचा आणि सुखाचा सर्वस्वी नाश करणारी ती क्रिया आहे. कारण तो भाग उत्तम असल्याशिवाय स्त्रीला ऋतुस्राव नियमित आणि व्यवस्थित होणारच नाहीं, आणि त्याच्या अभावीं स्त्रियांचें सर्व शरीर स्वच्छ धुवून निघणारच नाहीं, धुतलें जाणार नाहीं.घरांतील मोरी जशी स्वच्छ धुतली गेली पाहिजे तीच गोष्ट स्त्री–देहाचीहि आहे. मोरी धुतली न गेल्यानें घाणीच्या संचयाचा आणि त्यामुळें आरोग्य बिघडण्याचाच अधिक संभव असतो; अगदीं तोच प्रकार स्त्रीचें बाबतींत आहे. स्त्रीला नियमित मासिक ऋतुस्राव झाल्यानें, स्त्री–शरीर आपोआप धुवून स्वच्छ होत असतें. त्यामुळेंच, आणि ती क्रिया घडल्यानंतर स्त्रीला नवीन उत्साह, नवें तारुण्य, नवीन प्राण, अधिक आयुष्य, यांचा स्वाभाविक लाभ होत असतो. निसर्गाची ती एक हांक आहे. ऑपरेशन करणें म्हणजे निसर्गाची आडवणूक करणें आहे; अर्थात् तशा गोष्टीनें निसर्ग त्या स्त्रीला

अनारोग्याची तावडतोब शिक्षा देतोच. अमेरिकेंत तर गर्भसंभव दिसूं लागतांच, कित्येक वेळां ऑपरेशन न करतां गॅस–हवा, स्त्रीला देऊन व तिच्या गर्भाचा कोंडमारा करून तावडतोब नाश करण्यांत येतो. गॅस घेण्याचीहि गोष्ट स्त्रीला फार त्रासदायक आहे. स्त्रियांचें शरीर नियमितपणें धुतलें गेलेंच पाहिजे; तरच त्या संसारांत आणि घरांत आनंद दिसेल.

क्लोरोफॉर्मचा अंमल संपून मी जेव्हां शुद्धिवर आलें तेव्हां मला काय झालें आहे, आणि कसलें ऑपरेशन केलें आहे, तें चटकर कांहींच ध्यानांत आलें नाहीं. थोडेसें प्रकृतीला बरें वाटतांच मी ऑपरेशनची चौकशी केली; पण मला कोणीच दाद लागूं दिली नाहीं. पण तितक्यांत माझ्या कॉटवर असलेल्या आजाऱ्याच्या बोर्डाकडे माझें आकस्मात् लक्ष गेलें. मी त्या बोर्डावर वाचलें, कीं, माझें पोट अमुक तारखेस फाडून माझ्या ' ओव्हरीज ' काढून टाकण्यांत आल्या आहेत! तेव्हां मला अपरंपार दुःख झालें. मला तेव्हां खात्रीनें वाटलें, कीं, ' पतिराजानी माझा विश्वासघात केला; मला जन्माची दुखापत करून टाकली. ' म्हणून मी त्यांच्यावर फारच चिडलें, आणि संतापाच्या भरांत त्यांना विचारलें, " तुम्ही माझें पोट कां फाडले ? माझें पोट फाडण्याचें काय कारण ? "

तेव्हा ते निर्लज्जपणें हंसत उद्गारले, " आतां पोरें थांबलीं ! आपल्याला आतां जास्त पोरें पाहिजे आहेत कशाला ? अमेरिकेंत काय करतात ? अमेरिकेंत दोनतीन मुलांच्यावर अपत्य असतें का ? नवराबायको तें होऊं देतात का ? मुलें होणें, आतां मला नको ! "

त्या क्षणीं मी त्यांना अधिकच चिडून म्हटलें, " तुम्हाला मुलें नकोत हें ठीक आहे, पण बायकोचें आरोग्यहि नको काय ? तुमच्या सुखोपभोगाकरतां तरी माझें शरीर निर्दोष, सुदृढ आणि सुंदर नको काय ? आज तर या राक्षसी कृत्यानें तुम्ही माझ्या जीवनाचा, उत्साहाचा, कायमचा नाश केलात;–कायमचा कोंडमारा केलेला आहे. असा माझा विश्वासघात तुम्ही काय म्हणून केलात ? तुम्ही जन्माचे सुखी झालां, पण मी जन्माची दुःखी झालें, त्याची काय वाट ? त्याबद्दल तुम्हाला कोणती शिक्षा द्यावी ?"

त्यावेळीं ते निर्लज्जपणें हंसले व त्यानी मला कांहींच उत्तर दिलें नाहीं; मी मात्र तेव्हां खूप चडफडलें; पण माझ्या त्या तडफडण्याचा काय उपयोग होता?

बाहेर समाजांत पुरुष प्रतिष्ठितपणें वावरत असतांना दिसला, तरी तो पशुत्वाचें आचरण करणारा आहे किंवा नाहीं, याची परीक्षा फक्त स्त्रियाच करूं शकतात. पतिराजानी एक प्रकारें ती माझी हत्त्याच केली. परंतु तेवढ्याने मी त्यांच्यावर कायमची रागावले नाहीं. माझी दुःखाची गोष्ट, केवळ त्यांच्या भावी सुखाकडे बघून सोसण्यास मी तयार झालें. पण त्या माझ्या सहनशीलपणाचा सुपरिणाम कांहीं घडून येऊन माझा संसार सुखाचा झाला काय? नाहीं, मुळींच नाहीं! उलट, गर्भसंभवाचे भय दूर होतांच, 'आपण एका मोठ्या जबाबदारींतून नित्याचे वांचलों!' या विचारानें त्यांना अधिक आनंदच झाला; इतकेंच नव्हे तर ते माझी पर्वा करीनासे झाले, आणि वेळोवेळीं अधिकाधिक अत्याचार मात्र करू लागले. माझ्या वध्यत्त्वानंतर त्यांची कामपिपासा इतकी तीव्रतर झाली, कीं, त्याचीं दोनतीन उदाहरणें देणेंच या प्रकरणांत पुरेसें आहे.

माझी प्रकृति तेव्हांपासून नादुरुस्त राहूं लागल्यानें त्यांना मी नकोशी होत चाललें. बाहेरख्यालीपणा करण्यास बायकोची ब्याद म्हणजे 'असून अडचण आणि नसून खोळंबा' अशी स्थिति झाली. त्यामुळें प्रतिदिवशीं परिस्थिति अशी होत चालली, कीं, ते माझ्याकडे एकाद्या वैरिणीच्या दृष्टिनें, गळ्यांतील धोंड म्हणून, नित्य पाहूं लागले.

अभिनय करण्यांत माझे पतिराज एकाद्या कसलेल्या नामांकित नटालाहि मागें टाकतील, असे कुशल होते. प्रथम प्रथम, त्याना गुप्तपणें आचरावयाच्या पापाचरणाच्या गोष्टी माझ्यासमोर करतां येणें शक्य नव्हत्या. त्यावेळपर्यंत तरी त्यांना जनलज्जा बाजूस राहिली, तरी मनलज्जा म्हणून कांहीं थोडी वाटत होती.

ऑपरेशन होऊन मी निरुपयोगी ठरल्यावर मला दूर करण्याच्या, दूर ठेवण्याच्या नानाविध युक्त्या ते योजूं लागले. त्यांनीं मला एकसारखा आग्रह चालविला, कीं, "आपलीं मुलें जगांत फार मोठीं, उच्च शिक्षणानें संपन्न,

सुसंस्कृत अशीं झालीं पाहिजेत. त्यासाठीं मी तिन्ही मुलांना घेऊन मुंबईसारख्या सुधारलेल्या विद्यानगरींत राहावें ! मुलांना तेथें शिक्षण द्यावें, आणि मी नर्सचा कोर्स पुरा करावा !–याकरतां मी मुलांना घेऊन मुंबईस राहावें !"

त्यांच्या अंतर्यामीचा कावा माझ्या ध्यानीं प्रथम न आल्यामुळें मी त्यांना आश्चर्यानें विचारलें, "ज्या मुलाचा बाप सुप्रसिद्ध प्रोफेसर, बृहस्पति; ज्याला राजाश्रयाची आणि संपत्तिची पूर्ण अनुकूलता, त्याचीं मुले अशिक्षित राहतील कशीं ? त्यांतून हें एवढें मोठें शहर निष्कारण सोडून देऊन केवळ शिक्षणाकरतां मी मुंबईला काय म्हणून रहावयाचें ? दोनतीनशें मैलांच्या टापूंतलीं लोकाचीं मुलें, या शहरांत शिक्षणाच्या सर्व सुखसोयी उपलब्ध आणि अनुकूल म्हणून,–अथवा आपले प्रजाजनाचें केवळ भाग्यच म्हणून महाराजांनीं पवित्र विद्यादानाची सोय करून ठेवली म्हणून समजून,–आपले मुलगे आणि मुली तुमच्या कॉलेजांत पाठवतात; तेथें मी एका मान्यवंत प्रोफेसराची बायको त्याच्या मुलांना घेऊन मुंबईस शिक्षणाकरतां जाऊं लागलें, तर लोक तुम्हाला आणि मला दोघाना काय म्हणतील !!"

पतिराज तेव्हा खोटा गंभीरपणा दाखवून मला म्हणाले, "तुला समजत नाहीं !"

मी हंसून मान्यता दर्शवून म्हटलें, "होय, मला समजत नाहीं !"

तेव्हां पतिराज फार आग्रहपूर्वक म्हणाले, "मुंबईस जसं शिक्षण आहे, तसं शिक्षण सर्व हिंदुस्थानांत नाहीं! मुंबई हें सरस्वतीचें माहेरघर आहे; आणि बाकीचीं ठिकाणें म्हणजे सासरघरें आहेत ! शिवाय, शिक्षण संपतांच मुलांना घेऊन आपणांस थेट जें अमेरिकेस जावयाचें, तें, मुंबई बंदरांतूनच. यासाठीं तूं मुलांना घेऊन मुंबईस जा ! मी महिन्याचे महिन्यास पैसे व्यवस्थितपणें पाठवून देत जाईन; त्याची थोडीसुद्धां काळजी तुला नको !"

मी मध्येंच त्यांना प्रश्न केला, "मी मुंबईला जाऊन इथं आपल्या जेवण्याखाण्याची सोय ! आपले हाल होणार नाहींत काय ?"

तेव्हां पतिराज तात्काल सुस्कारा टाकून उद्गारले, "करायचं काय, भावी सुखाकडं दृष्टि ठेवून कांहीं दिवस खानावळींत काढावयाचे !"

मी म्हटलें, " खानावळींतलं अन्न आपल्याला आवडतं कां? घरच्या अन्नापेक्षां तें रुचकर लागतं ? "

तेव्हां ते हंसून म्हणाले, " संवय झाली म्हणजे खाणावळीतलंच अन्न अधिक रुचकर लागतं! अग, सारं मुलांच्या भावी कल्याणाकडं पाहून सोसायचं, सहन करायचं ! "

मला त्यांचें तें बोलणें मुळीच पटलें नाहीं. परंतु, ' सुसरबाई ? तुझीच पाठ मऊ, ' म्हणून मला रहावयाचें होतें. त्यावेळीं त्यांच्या नवीन योजनेस मी दादच दिली नाहीं. ' आणखी थोड्या दिवसांनीं विचार करूं ' म्हणून, मी ती वेळ टाळली ! पण तेव्हढ्यानें पतिराज थोडेच मूळ स्वभाव सोडणार होते !

तोंपर्यंत उन्हाळ्याची सुटी आली. आणि ते उद्या सुटी सुरू होणार तोपर्यंत आदले दिवशींच आपल्या भावाकडे परगांवीं निघून गेले. तेथून मला त्यानी पत्र लिहिलें, कीं, " मुलांना घेऊन तूं इकडे ताबडतोब ये ! "

मला तेव्हां त्या पत्रानें फार आनंद झाला. पण प्रत्यक्ष अनुभव मात्र विपरीत आला. माझे पतिराज, दीर, जावा, आणि त्यांचीं मुलें मजेंत आनंदांत असतांना मी मुलांना घेऊन तेथें गेलें. पण काम्पाऊंडमध्यें मी पाऊल टाकते न टाकतें तोंच, पूर्वी माझें मौल्यवान धन हिरावून घेणारा तो दीर एकदम बाहेर येऊन उद्गारला, " तुम्ही आणि कशाला आलांत? इथं जागा कुठं आहे? आमच्या बंगल्यांत जागा नाहीं ! "

दिराच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून त्या दिवशीं मीच निर्लज्जपणें तेथें राहिलें. माझ्या मुलांच्याकडे तर कोणी ढुंकूनहि बघितलें नाहीं. माझा एक आवडता कुत्रा माझ्याबरोबर होता, त्या कुत्र्याला बाहेरच बांधून घालून त्याचे हाल करण्यांत आले.

त्या दिवशीं पतिराजांना मी एका बाजूस बोलावून विचारलें, " माझा अपमान व्हावा म्हणून का तुम्ही मला इथं बोलावलीत? माझा हा अपमान तुम्हाला पाहवतो तरी का? "

जसें कांहीं कांहींच झालें नाहीं अशा आविर्भावानें ते तेव्हा मला म्हणाले, "यांत अपमान कसला ? इथं जागा नाहीं, म्हणून तो तुला 'जा' म्हणून सांगतो आहे एवढेंच. तर, आतां तूं हे भाड्याचे पैसे घे, आणि परत जा !"

मी दुःखानें म्हटलें, "ही माणसांना वागविण्याची, स्त्रीला वागविण्याची, त्यांतल्या त्यांत एका प्रतिष्ठित स्त्रीला अशी 'Treatment' देण्याची, ही रीत झाली का ? सभ्यपणाला, आणि सुशिक्षितपणाला हें सारें शोभतें का ?"

पतिराज म्हणाले, "यात काय आहे ? किती केलें तरी आम्हा दोघां भावांचें रक्त एकच आहे. बायकांची काय पर्वा करायची आहे ? आणि तूं असं कर,—तूं परत जा !"

मी उत्तर दिलें, "मी परत जातें; पण घरांत धान्यसामग्री नाहीं; सुटी संपेपर्यंत दोन महिने घरीं परत जावें लागणार नाहीं, म्हणून तुमच्याच सांगण्यावरून, सगळे डबे पालथे घालून मी आले आहें, त्याची काय वाट ?"

ते उद्गारले, "हात्तेच्या ! त्यात काय ? तूं अशी जाऊन बंगल्यांत पोचते आहेस, बशींतून किटलीभर चहा पिते आहेस, तोपर्यंत पोस्टमन माझी मनिऑर्डर घेऊन हजर ! चांगले मोजून रुपये घे; बाजार करून घे; मुलांना चमचमीत खायला घाल; तूं खा !–मी सुटी संपायच्या दिवशीं तिथं हजर आहें; काळजीचें मुळींच कारण नाहीं !"

मी म्हटलें, "बरें तर; मी परत जातें. पण एवढेंच मी तुम्हाला बजावून ठेवतें, कीं, झाली ही गोष्ट काहीं बरी झाली नाहीं. माझा अपमान करून आणि भावाच्या पाठीशीं पडून तुम्हाला सुख लागणार नाहीं ! देवाच्या घरीं मी कोणत्याहि प्रकारें अन्याय केलेला नाहीं. किंवा, तुमच्या बाबतींत मी विश्वासघातहि केलेला नाहीं; सर्व कांहीं देव पहात आहे. माझ्या मुलीला तुमच्या भावानें, आज विचारलें, कीं, "तुला भूक लागली आहे काय ?" तिनें 'होय' म्हणतांच, त्यानें कुत्सितपणें तिला म्हटलें, कीं, "तुला सोडा देऊं ?" ही मुलांना विचारण्याची रीत झाली का ? कांहींच कसा विचार तुम्ही करीत नाहीं ?"

मला अधिक बोलूं न देतांच ते म्हणाले, " मी तिथं आलों, म्हणजे सर्व कांहीं तूं मला सांग! या गोष्टीची चर्चा आपण तेथें करूं. आज तूं ताबडतोब परत जा!"

माझा नाइलाज होऊन, तीन मुलांना व कुत्र्याला घेऊन मी स्टेशनचा मार्ग सुधारला. पतिराजानी तेव्हां फक्त तिकीटाची आणि मार्गांत जरूर तर कांहीं लागलेंच तर म्हणून केवळ एक रुपाया मला दान देण्याची तजवीज केली होती. जितक्या उत्साहानें मी घरांतून निघालें होते, तितक्याच, किंबहुना अधिकच निराशेनें, मी घराकडे परत फिरलें.

परत येऊन मोठ्या दुःखीकष्टी अंतःकरणानें बंगल्यात प्रवेश केला. मी इतक्या लौकर परत कां आलें, याचें कारण लोकांना तरी काय सांगणार? तो सर्व राग मी मनांतल्या मनांत गिळला. दुर्दैवाचा कडेलोट यावेळीं इतका झाला कीं, घरांत धान्य नाहीं, आणि विकत घ्यावयास दुसरे दिवशीं पैसा नाहीं! त्यांची मनिऑर्डर पोस्टांत झालीच नाहीं, त्यामुळें पोस्टमननें ती, ते स्वतः येईपर्यंत आणून दिली नाहीं!

माझा मुलगा हुशार होता. त्याला मी दुसरे दिवशीं कळवळून म्हटलें, "बाळा? आपल्याला आज उपवास काढावा लागणार आहे. तेव्हा माडीवर जाऊन त्यांच्या कोटाच्या खिशात, कुठें एक दोन रुपये आहेत का पहा!"

बाळ धांवतच गेला! त्यानें कसून सर्व कपडे उलथे पालथे केले; पण त्यांतून एक पै खालीं पडेल तर शपथ! पैसा आणि खिसा यांची कधींच गांठ पडत नसते, अशा अर्थाची एक इंग्रेजी म्हण त्यावेळीं माझ्या पूर्ण अनुभवास आली. जगांत जेथें खिसा आहे, तेथें तो रिकामाच असून त्याची व पैशाची चुकूनहि गांठ पडत नाहीं; आणि जेथें पैसा आहे तेथें खिसाच नसतो!

मुलगा चाणाक्ष होता. त्यानें सर्व कपडे तपासून एक रुपयाचीं पोस्टाचीं तिकीटें सांपडलेलीं मला आणून दाखविलीं! मी तेव्हां त्याची पाठ थोपटीत म्हटलें, " खरंच तूं हुशार आणि भाग्यवान. आज आपली उपासमार हे

पोस्टाचे स्टॅम्पच वांचविणार. तुमच्या चुलतीनें तुम्हा लहान मुलांना प्रवासांत दोन दशम्याहि दिल्या नाहींत, तेथें आज परमेश्वरकृपेनें रुपयाचीं तिकीटें प्राप्त झालीं, हें कांहीं थोडें भाग्य नाहीं! आजचा दिवस आपण या तिकीटांचे पैसे करून त्यावरच काढावयाचा !"

त्या दिवशीं माझें डोकें अगदीं सैरभैर होऊन गेलें. काय करावें हें सुचेना. शेवटीं एका स्वयंपाकी ब्राह्मण बाईनें फारच सहाय्य केलें. तिच्यामुळें वाण्याकडून मला जरूर असणारे जिन्नस सुटीअखेर उधार खात्यावर मिळण्याची सोय झाल्यामुळें, तो सुट्टीचा काल मला काढता आला. पण पतिराजाना माझी इतकी काळजी, कीं, त्यानी सदर मुदतींत मला पैसे तर पाठविले नाहींतच, पण पत्रसुद्धा नुसतें पाठविलें नाहीं; इतकी त्याना माझी व मुलांची काळजी !

कॉलेज उघडण्याच्या दिवशीं, अगदीं घंटा वाजण्याच्या सुमारास, मोठ्या थाटांत स्वारी आली! येतांच मी मुलांसह जिवंत, खुशाल आहे, हें पाहून त्यांना आश्चर्यच वाटलें! बंगल्यांतील नौकराकडून हळूच त्यांनीं माझी गुप्त बातमी काढून घेतली. तेव्हां त्याना समजलें, कीं, बायकोनें गेल्या दोन महिन्यात जेवणखाण उधारीवर चालविले आहे! तत्क्षणीं ते त्या उधार माल देणाऱ्या वाण्याकडे गेले, आणि त्याला प्रतिष्ठितपणें दटावून म्हणाले, "खबरदार! पुनः आमच्या कुटुंबाला कांहीं उधार माल देशील तर! तुझे पैसे कोण देणार? किती झाली आहे तुझी उधारी?"

दुकानदारानें उत्तर दिलें, "फक्त साठ रुपये!"

पतिराज बेमुर्वतखोरपणें त्याला म्हणाले, "ठीक आहे; ये दुपारीं कॉलेजमध्यें, सुटीच्या वेळीं! मी अमक्या ठिकाणीं बसलेला असतों, तेथें ये, आणि पैसे घेऊन जा!" असे म्हणून त्यांनीं आपल्या नांवाची छापील कार्ड त्यास दिली. कॉलेजमध्यें त्याला बरोबर २ वाजतां येण्याची मात्र कडकडीत ताकीद देण्यास ते विसरले नाहींत! त्या दिवशीं दुकानदाराच्या बाबतींत, स्वारी घरीं कांहींच बोलली नाहीं! पण पुढें ३।४ दिवसांनीं, मी दुसऱ्या एका प्रोफेसरांच्या पत्नीच्या घरीं बसावयास गेलें असतां, तेथें माझ्या यजमानांचा

विषय निघून खूपच हंशा पिकला! त्या दुसऱ्या प्रोफेसरसाहेबानीं माझ्या पतिराजांची हकीकत पुढीलप्रमाणें मला सांगितली. अर्थात् जशी घडली होती, तशीच त्यांनीं ती वर्णन केली.—

" दोन तीन दिवसांपूर्वी कॉलेजमध्यें, प्रोफेसर लोकांच्या विश्रांतीच्या हॉलमध्यें, आपले मिस्टर...साहेब एकीकडेच उदासपणें बसले होते! वेळ दुपारची २॥ ची होती. इतक्यांत एक वाणी, साहेबमजकुरांचा तपास करीत तेथें आला! एका प्रोफेसरानें त्याला, ते पहा 'प्रोफेसर साहेब!' म्हणून सांगितलें! तेव्हां तो वाणी त्यांच्यापुढें जाऊन निमुटपणें उभा राहिला. जोशानी त्याच्याकडे पाहिल्यासारखें केलें मात्र, आणि आपल्या कपाळास शंभर एक आठ्या घातल्या! तेवढें करूनच ते गप्प बसले नाहींत, तर त्यांनीं आपला उजवा हात दुःखानें तडातडा आपल्या कपाळाच्या उजव्या भागावर दहापांच वेळां मारून घेतला; आणि मोठ्यानें दीर्घ निःश्वास टाकून सर्व प्रोफेसर मंडळींच्या देखत ते म्हणाले, " वाणी! एक यःकश्चित दुकानदार कॉलेजमध्येंहि येऊं लागला म्हणायचा! आतां आम्ही शिकवायचं कुणाला? या वाण्याला, कीं तरुण पोरापोरींना? दुर्दैव माझें दुसरें काय!"

एका प्रोफेसरानें तेव्हां मिस्टर जोशांना प्रश्न केला, कीं, " कांहो? तुम्ही दुर्दैवी का? तुमचं दुर्दैव कसलं?"

प्रोफेसर जोशी अत्यंत उदासपणा दाखवून म्हणाले, " हा सारा बायकोचा प्रताप, उधळेपणा भोवतो आहे. रोज दोन रुपयांप्रमाणें तीस दिवसांत तिनें साठ रुपये वाण्याकडे उधारी करून ठेवली आहे. माझ्यापर्यंत कोणतीहि कटकट येऊं नये म्हणून मी रात्रंदिवस जपतों, तर, तुमच्या त्या मराठींतल्या भयंकर म्हणीप्रमाणें, 'भित्यापाठीमागें ब्रह्मराक्षस!' या न्यायानें, हा वाणी माझ्यापुढें हजर! करायचं काय? अशी माझी स्थिति माझ्या बायकोनं केल्यावर मी कपाळावर हात मारूं नको तर करूं काय! माझ्या नशिबानं माझी बायको पहिल्या नंबरची उधळी मिळाली आहे. पैशाची तिला कांहीं किंमतच नाहीं! एरवीं नाहींतर मी, माझ्या दैवाला कशाला दोष देऊं?"

खरा प्रकार त्या प्रोफेसरांना माहीत नव्हता. मीहि, निमुटपणें त्यांचें बोलणें ऐकून घेतलें व घरीं निघून आलें! पतिराज पक्के नाटकी होते, हें मी मागें सांगितलेंच. प्रत्येक प्रश्नाला उत्तर नेहमीं त्यांच्या जिभेवर तयार असे; आणि तेंहि विनोदी तऱ्हेनें. पण ती त्यांची विनोदाची भूमिका बंगल्याच्या बाहेर गेल्यावर; ते घरांत आले, कीं, नेहमीचा त्यांचा 'राक्षस' पार्टच ठरलेला असे!

माझ्या पतिराजानीं सर्व आपल्या मित्रांची अशी समजूत करून दिलेली होती, कीं, बायकोव्यतिरिक्त मी सर्व प्रकारें सुखी आहे. बायकोचा छळ आपणाला अत्यंत होतो. नाहींतर माझ्यासारखा सुखी जगांत दुसरा कोणी नाहीं! "जगीं सर्व सूखी असा मीच आहें!"—असें ते म्हणत. मित्रांना त्यांचें बोलणें खरें वाटून, तेहि त्यांचीच री ओढीत; व त्यांच्या दुर्दैवी स्थितिबद्दल फार दया दाखवत. ते सर्व मित्र त्यांची कींव करून म्हणत, "खरंच! प्रोफेसर जोशी दुर्दैवी प्राणी!! नाहींतर एवढा मोठा पगार मिळत असतां ते किती सुखी असावयास पाहिजेत!"

पण ज्या महिन्यात प्रोफेसर साहेबाना ५।५० रुपये तरी कर्ज झालें नाहीं, असा कोणता महिना गेला होता, हें त्या मित्रांना काय ठाऊक!

मी त्यांना नित्य विचारीत असे, "तुम्हाला जर इतका गडगंच पगार मिळतो, तर तो सारा जातो कुठें? कुठें खर्च होतो?"

तत्क्षणीं ते मला जोरानें उत्तर देत, "तुला काय ठाऊक आहे? मी अमेरिका-रिटर्न आहे. माझ्या रुबाबाला ६०० रुपये म्हणजे काय होत? किती गरीबीची नौकरी मी ही करतों आहे! केवळ तुझ्याकरतां! सहाशे रुपये पगार माझ्या केवळ अमेरिकन बुटांच्या पॉलिशला आणि टायलेटलाच पुरत नाहींत. नुसतं बूटपॉलिश मला दरमहा दोनशे रुपयांचं लागतं; इतर खर्च निराळा! म्हणून सारं कर्ज होतं! रुबाब तर राखला पाहिजे ना? आहे का कोणी माझ्यासारखा दुसरा रुबाबदार प्रोफेसर, कॉलेजमध्यें?"

पण खरा प्रकार अगदी वेगळा होता. त्यांचा बाहेरख्यालीपणा आणि मद्यपान यांचा छंद बेसुमार वाढला होता. सहाशे नव्हे, हजार रुपये त्यांना

पगार असता, तरी तोहि चक्काचूर झाला असता! मी त्यांच्या त्या सुखाच्या आड येई, म्हणून मी त्यांना नकोशी झालें होतें! ' मला कसें दूर ठेवता येईल? काय युक्ति काढावी?' या विचारांत ते सदैव गढलेले असत. जेव्हा त्यांना अन्य कांहींच सबब सांपडत नसे, तेव्हा ते मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न पुनः पुनः उकरून काढून, मला म्हणत, कीं, "तूं शक्य तितक्या लौकर मुंबईला जा! त्यांचें वय वाढतें आहे. आयुष्य फुकट जातें आहे. तूं नर्सची परीक्षा पास हो. मुंबईला तूं गेल्याशिवाय आतां कांहीं भागावयाचें नाहीं; आज किती दिवस ही गोष्ट मी तुला सांगतो आहें!" शेवटीं शेवटीं तर ते अगदी चिडी-वर येऊं लागले. त्यामुळें त्यांचें म्हणणें मान्य करणें मला भागच पडलें. शेवटीं एक दिवस, भर पावसाळ्यांत, तीन मुलांना घेऊन मी मुंबईचा रस्ता सुधारला.

प्रोफेसराची पत्नि या नात्यानें मला वागावयाचें होतें. त्यांच्या भूमिकेस मी कसा कमीपणा आणूं? मानसिक शारीरिक सर्व प्रकारें हालअपेष्टा भोगाव्या लागत असतांहि मी त्यांना कमीपणा येईल असा चकार शब्दहि दुसऱ्याजवळ कधीं काढला नाहीं. आणि त्यामुळेंच माझें जीवन दुःखी झालें. ते जसे माझ्याबद्दल प्रत्येकाजवळ मोठमोठ्यानें नगारा वाजवीत होते, तशी मी त्यांच्या बाबतींत देवापुढची घंटा जरी वाजविली असती, माझें दुखणें मी वेशीवर टांगलें असतें, तरी औषधावांचून खोकला गेला असता! पण स्त्रियांच्यांत जर कांहीं फार मोठा दुर्गुण असेल, तर तो फाजील सहनशीलपणा! बायकांच्यावर पुरुषांना विजय मिळायला तोच मोठा दुर्गुण कारण आहे! आधुनिक कालीं तर सहनशीलपणानें स्त्रियांच्या बाबतींत त्यांची उन्नति होणें कधींच शक्य नाहीं; तीच स्थिति माझीहि झाली!

पतिराजांना एकटेंच सोडून मी जेव्हा मुंबईस आलें, तेव्हां तिकडे त्यांच्या सुखाचा शुद्धपक्ष सुरू झाला, आणि माझ्या दुःखाचा वद्यपक्ष सुरू झाला! माझ्या पश्चात् त्यांना पूर्ण स्वातंत्र्य मिळालें. त्यांनी असेंहि वृत्त उठवण्यास कमी केलें नाहीं, कीं, "पहा कशी विचित्र बायको आहे ती! बायकोच मुलांना घेऊन, आणि त्यांचें शाळेचें नुकसान करून मुंबईस चालती झाली! इथलं शिक्षण

तिला मुळींच आवडत नाहीं! आतां ती मुंबईस जाईल, एकाद्या मोठ्या... लॉजमध्यें उतरेल, आणि आपल्या मुलाचें शिक्षण करील! म्हणजे माझी काय अवस्था? तर मी बायकोपायीं पैसे फेडताफेडतांच मरावयाचा!...एरवी नाहींतर मी फार सुखी होतों! माझी बायकोच मुळीं वाईट! शीलानें ती चांगली असली तरी तोंडाचा पट्टा थांबत नाहीं; आणि खर्चाचे बाबतींत कुबेराची सख्खी बहीण! या साऱ्या गोष्टीमुळें असा इथं एकांतवास काढणं मला सुखाचं वाटतं!"

त्यांचे मित्र त्यांना कधीं कधीं जेवावयास बोलवीत. त्यावेळीं ते मित्र सहानुभूतीनें म्हणत, "बिचाऱ्याला बायको जर चागली लाभली असती, तर खाणावळीचें कदान्न त्याला कां बरें खावें लागलें असतें? आणि मग मिस्टर जोशी तरी आमच्या घरीं कशाला येते? दुर्दैव बिचाऱ्याचें! इतकी विद्वत्ता पाणी भरत असून सुख नाहीं." त्यावेळीं माझे पतिराज मात्र निःसंकोचपणें मित्रांच्या घरीं पंचपक्वान्नावर यथास्थित ताव मारीत असत! अशा प्रकारें त्यांच्या सुखाचा, ऐषआरामाचा जीवनक्रम माझ्या गैरहजेरींत आचरण्यास त्यानीं सुरुवात केलेली होती. पण केवळ त्यांच्या जेवणाखाण्याचा प्रश्न असता तर ते करीत असलेल्या माझ्या निंदेला मी जुमानलें नसतें. पण त्यानी माझा अपमान केला, तो दुसऱ्या प्रकारानें. ते नुसतेच बाहेरख्यालीपणा करून राहिले नाहींत, तर घरांत चटकचांदण्या, वेश्या, नीच स्त्रिया राजरोस आणून त्यानीं माझा नीचपणें छळ माडला; आणि तो तसला छळ सहन करणें मला अशक्य झालें.

ज्या हॉस्पिटलमध्यें मी नर्सिंगचें शिक्षण घेत होतें, तेथें पत्रांवर पत्रें पाठवून व केव्हा केव्हा स्वतः येऊन ते मुख्य चालिकेला अगदीं गयावया करून सांगत कीं, "बायकोचें जरा डोकें फिरलेलें आहे, तेव्हां तिला नीट सांभाळून घेऊन शिक्षण द्या! माझे हाल तिकडे-दुसरीकडे झाले तरी चालतील, पण तिचें नर्सचें शिक्षण पुरें झालेंच पाहिजे! त्याशिवाय मी तिला मुंबईतून नेणारच नाहीं!" असें शंभर शंभर वेळां, नाटकी करुण रसानें सांगून ते निघून जात; पण दुसरे दिवशींच मला पत्र येई, कीं, "खबरदार! माझ्याकडे आलीस तर! तुझा खूनच करीन; तुला रिव्हॉल्व्हरनें ठारच करीन!" एक दिवस तसा

फार्स करून ते निघून गेल्यावर तिसऱ्याच दिवशीं आलेलें वरील आशयाचें पत्र मी त्या चालिकेस सहीशिक्यानिशीं दाखविलें. त्यावेळीं मला रडूं कोसळलें. चालिका फारच कोमल हृदयाची होती. तीहि रडूं लागली. तिनें त्या दिवशीं तर मला आपल्या उराशीं कवटाळून प्रेमानें म्हटलें, "पुरुष इतके नीच असतील, असें मला कधीं वाटलें नव्हतें. पण या पत्रानें मात्र पुरेपूर खात्री झाली. मला बायकोबद्दल काळजी घ्यावयास शंभर शंभर वेळां बजावून जाणारा हाच तो पुरुष काय? आतां तुला मारण्याच्या धमक्या देतो? तूं मुळीसुद्धां भिऊं नकोस. तूं आपला कोर्स पुरा कर. मी तुला आपली मुलगीच मानत्यें." अशी त्यांची अंतर्बाह्य वागणूक होती. त्यांचा स्वभाव दुहेरी होता.

मुंबईला मला त्यांनीं मुलासह पाठविलें खरें, पण पैशाचा नियमितपणा त्यांना राखतां आला नाहीं. मुंबईस मी मुलांच्या शिक्षणाची कशीबशी सोय केली, पण ८० रुपये घरभाडें देतांना माझी अगदीं त्रेधा तिरपीट होऊं लागली. म्हणून मी त्यांना वारंवार सक्त ताकीद देऊं लागलें, कीं, "नियमितपणें मला तुम्ही ऐंशी रुपये घरभाड्याचे पाठवा, नाहींतर मुलांना घेऊन मी तुमच्याकडे येणार!"

माझा आणि माझ्या पत्राचा त्यांना फार धाक वाटत असे. मला ते भीत असत. त्याचें एकच कारण होतें, कीं, कोणत्याही प्रकारें मी दुराचरणाकडे वळलें नव्हतें. याची त्यानाहि खात्री होती; आणि तेंच कायतें एक माझें सामर्थ्य, तीक्ष्ण बलवान शस्त्र होतें. तशी गोष्ट नसती तर माझ्याशीं 'डायव्होर्स' मिळवणें त्यांना कांहींच कठिण नव्हतें. परंतु जन्मभर त्यांनीं अनेक लपंडाव माझ्या बाबतींत करूनहि ती गोष्ट त्यांना साध्य झाली नाहीं. आणि पुढें 'डायव्होर्स' मागता मागतां आपल्या वयाच्या ६७ वे वर्षी, परदेशांतील कोर्टात अर्ज करून ते मरूनहि गेले. मरणापूर्वीहि त्यांनीं मला दूषण देण्यास किंवा माझी अपकीर्ति होईल असा डंका वाजविण्याचा प्रयत्न करण्यास मुळींच कमी केलें नाहीं!

मुंबईला येऊन मी राहिल्यावर तिसऱ्याच महिन्यांत पैसे चुकले. म्हणून त्यांच्या खुलाशाच्या पत्राची वाट न बघतां मी एक दिवस मुलांना शेजारीं

ठेवून रात्रीच्या गाडीनें त्यांना भेटण्यास गेलें, ती अगदीं उजाडतां, मी बंगल्याच्या फाटकाशीं हजर झालें! जो प्रकार पाहिला, तो मात्र स्तंभित करणारा होता!

आंत जाऊन दार ठोठावतांच बऱ्याच वेळानें माडीवरून खालीं येऊन एका परकीय बाईनें दरवाजा उघडला! बाईचा पोषाख दृष्टीस पडतांच मी मूढच झालें! बाई होती, सुंदर पायजमा घातलेली आणि अंगावर अर्धी ओढणी घेतलेली एक यवनी! ती नुकतीच झोपेंतून उठून 'कौन है? कौन है?' करीत दार उघडण्यास आली होती. तिच्या हातापायास सुरेख ताजी मेंदी लागलेली दिसत होती!

तत्पूर्वी ते लोकांस आणि मित्रांना थट्टेनें सांगत असत म्हणे, कीं, "बायकोनें पोटाचें ऑपरेशन केल्या दिवसापासून बायकोचा मला कांहींच उपयोग नाहीं! तिच्यांत स्त्रीत्वच राहिले नाहीं! Neutral झाली आहे ती Neutral! —'Taking no part with either side!!'

त्यावेळीं अज्ञानपणें त्या यावनी स्त्रीनें मला विचारलें, "तुम्ही कोण? आणि कुणाला भेटावयाचें आहे? काय काम आहे तुमचे इथें?"

मी विचार केला, कीं, मी जर यावेळीं खरें बोललयें, तर या स्त्रीच्या रहस्याचा कांहींच सुगावा लागणार नाहीं. म्हणून मी तिला मृदुस्वरानें म्हटलें, "साहेबांच्या बायकोची मी मैत्रिण आहे. साहेबांना मला भेटावयाचें आहे! तुम्ही कोण?"

ती वेश्या स्त्री म्हणाली, "मी त्यांची प्रिया! साहेबांनी मला सांगितलें आहे, कीं, 'त्यांची बायको पोटदुखीनें एका दूरच्या इस्पितळांत बऱ्याच वर्षांपूर्वी वारली आहे. बायकोच्या अभावीं त्यांना थोडें चैन पडत नाहीं, म्हणून त्यांच्या सुखाकरतां मी आलें आहें!"

तिच्या त्या शेवटच्या वाक्यानें माझ्या सर्वांगाचा दाह उडाला! पण ती माझी मनःस्थिती बाह्यात्कारी कोणत्याहि प्रकारें न दाखवितां पूर्वीच्या हलक्या आवाजानेंच मी तिला म्हटलें, "साहेबांना जाऊन सांग, त्यांच्या

मेमसाहेबांची आणि तुमची एक आवडती, जिवलग मैत्रीण परगांवाहून आलेली असून, तिला भेटावयाचें आहे!"

ती स्त्री भोळी होती. माझ्या यजमानाना ती सरळपणें माझा निरोप सांगण्याकरतां माडीवर गेली. मीहि तिच्या पाठोपाठ पाय वाजूं न देतां, जिना चढून त्याच्या माडीवरील खोलीच्या बाहेर दोघांचा संवाद ऐकत गप्प उभी राहिलें!

पायजमावाल्या स्त्रीनें आंत जाऊन निरोप सांगतांच ते तिला म्हणाले,... "परत जाऊन त्या बाईला तिचें 'नाव काय' म्हणून विचार! आणि तिला निश्चितपणें सांग, कीं, साहेब फारच बीमार आहेत म्हणून! आज त्याना कुणाला भेटण्यास डॉक्टरची परवानगी नाहीं! दुसऱ्या एकाद्या वेळीं अवश्य या! असा निरोप जाऊन सांग!"

मी गुप्तपणें केव्हांच वर येऊन आडबाजूस उभी होतें, तें त्या बाईच्या ध्यानांत आलें नाहीं. ती प्रोफेसर साहेबांचा निरोप मला सांगण्याकरता खालीं गेली; आणि मी त्याचवेळीं, त्याच उघड्या दारांतून आंत प्रवेश करून पतिराजांच्या समोर साक्षात् उभी राहिलें! त्या वेळीं त्या खोलीचा देखावा बघण्याजोगाच होता. त्यांचा सुशोभित बिछाना, थाटमाट, सर्व कांहीं अपूर्व होतें! विशेष प्रकार असा दृष्टीला पडला, कीं, पतिराजानी हातांपायांला सर्वत्र मेंदी लाविलेली होती; व आरामपणें ते मृदुशय्येवर झोपले होते! शेजारींच यवनीकरतां गिर्दी उशी!!

मी त्यांच्यापुढें आकस्मात येईन, हें त्यांच्या ध्यानीमनींहि नव्हतें. मला एकदम पुढें हजर पाहतांच ते चमकले!

ते दचकून माझ्याकडे दृष्टि रोखून मला म्हणाले, "तूं केव्हां आलीस?"

ते घाबरले होते, पण मी मुळीच घाबरलें नव्हतें. मी त्यांच्या प्रश्नाला उत्तरच दिलें नाहीं. पण मी होऊनच आगंतुकपणें त्यांना प्रश्न केला, "हातांपायांला हें तुम्ही तांबडें तांबडें, लाल काय लावलें आहे? लाल डाग कसले?"

त्यानी भीतच उत्तर दिलें, " मेंदी लावली आहे; मेंदीचे ते डाग आहेत."

पुनः मी म्हटलें, " तुम्हाला चाळे बरेच सुचताहेत कीं!"

तेव्हा ते सारवासारव करण्याच्या हेतूनें म्हणाले, " हातापायाची आग फार होते आहे रात्रीं, म्हणून हें मेंदीचें औषध लावलें आहे. मेंदीच लावली आहे!"

मी थोड्या संतापानें विचारलें, " ती पायजमावाली बाई कोण!"

पतिराजानी बेडरपणे उत्तर दिलें, " ती माझी नवी स्वयंपाकीण!"

तेव्हा मी रागानें म्हटले, " तुमचा स्वयंपाक रात्रीं चालतो कीं दिवसा? म्हणजे तुम्ही रात्रभर दाराला कड्या लावून, मेंदी लावण्याकरता स्वयंपाकीण बाई घेऊन बसतां काय? ती तुमच्या हातांपायांना औषध लावते, मेंदी लावते, आणि तुमचे पाय चुरू चुरू चेपते, असेंच कीं नाहीं? आणि तुमच्या शेजारीं ही गिर्दी कुणाची? त्या स्वयंपाकीण बाईचीच ना? ती कोण आहे, तें आधीं मला खरं खरं सांगा! आणि ती किती दिवस इथं आहे? तें कांहीं नाहीं, आताच्या आता, माझ्यादेखत तुम्ही तिला इथून आधीं हाकलून काढली पाहिजे! अशा रीतीनें गुप्त व्यभिचाराचें आचरण करून लग्नाच्या बायकोचा आणि तिला दिलेल्या धार्मिक शपथांचा विश्वासघात करतां काय? स्वतःच्या बायकोशी तुमचें विश्वासघाताचें वर्तन? तुमचा धर्म अशा गुप्त अगर उघड व्यभिचाराला परवानगी देतो काय? आताच्या आतां तिचे पैसे, तिचें सामान, सर्व कांहीं तिचें तिला देऊन टाका; आणि तिला आधीं बंगल्याबाहेर घालवून द्या! मग मी तुमच्या पहिल्या प्रश्नाचें उत्तर देईन. पहिल्यांदा आधीं तिची हाकालपट्टी करा! करता कीं नाहीं बोला? आज मी तुम्हाला अगदीं मुद्देमालासकट पुराव्यानिशी पकडलं आहे."

त्यावेळीं पतिराजांचा निरुपायच झाला! त्यांना आपली झालेली चूक कबूल करणें भागच पडलें. तत्क्षणीं त्यांनीं त्या यवनी स्त्रीची तिच्या बाडबिछान्यासह बंगल्याच्याबाहेर हाकालपट्टी केली.

आमचा तो प्रकार चालू असतां ती निर्लज्ज यवनी स्त्री मोठमोठे डोळे करून वटारून पाहात होती. पण तिचाहि इलाज नव्हता. अपमान झाला

म्हणून तीहि रागाच्या आवेशांत, बाडबिछाना घेऊन स्टेशनवर जाण्यास निघाली! ती परगांवहून आणलेली बाई होती. जातांना मात्र मोठमोठ्यानें पुटपुटत ती बाई बाहेर पडली. साहेबांना व मला उद्देशून तिचे ते शब्द पुढीलप्रमाणें होतेः—

"...साहेबांनी मला, आपल्या स्त्रीप्रमाणें ( बायडीके माफक ) तुला ठेवतो, –माझ्या मृत बायकोप्रमाणें येथें तूं रहा, असें सांगितलें म्हणून मी आल्यें! नाहींतर मी कशाला आलें असतें? आतां साहेब मला जा म्हणून सांगतात, आणि ताबडतोब हाकलून देतात! पुनः कधीं तरी मी येईन काय? ही...बाई साहेबांची कोण?"

तिला मी तात्काळ योग्य उत्तर देणार होतें; पण ती त्यानंतर माझें बोलणें ऐकावयास क्षणभरहि बंगल्यांत राहिली नाहीं! पतिराज मात्र त्या आकस्मिक घटनेनें थिजून गेले होते!

बाईची रवानगी होतांच, पश्चात्ताप झाल्यासारखें दाखवून, गयावया करीत ते म्हणाले, "पुनः मी आतां असें करणार नाहीं!...मला क्षमा कर!"

पण तो तसला प्रसंग त्यांच्या व माझ्या आयुष्यांत, एकदांच आला काय?

---

## प्रकरण १२ वें



# पतीचा गुप्त आजार.

पतीचें पाऊल क्षणोक्षणीं वाकडे पडूं लागलें, कीं, धर्मपत्निमध्यें व पतिमध्यें कलह निश्चितपणें उत्पन्न होतो. समाजाला असें दिसतें, कीं, त्याची पत्नीच चांगली नाहीं, म्हणून नवरा परस्त्रीच्या भजनीं लागतो! पण हें म्हणणें बरोबर नाहीं. अशा वेळीं स्वतःचा दोष छपविण्याकरतां पतिकडून किती कारवाई केली जाते, पत्नीचा त्या कामीं किती गुप्त छळ केला जातो, तो अनुभव दुःखी, श्रीमंत-गरीब अनेक गृहिणींना नेहमींच येत असतो. गरीब सुशील पत्नी नवऱ्यापुढे नाइलाज होऊन पतिचा तो सर्व अन्याय मुकाट्यानें सहन करते; आणि श्रीमंत स्त्री, पतिचा तो अन्याय कोर्टाचा आश्रय घेऊन, पैशाच्या जोरावर, व चव्हाट्यावर आणूं शकते, एवढाच त्यांच्यात फरक. एकंदरींत नवऱ्याच्या भ्रूकटाक्षातच बायकोनें वागलें पाहिजे असेंच सर्वसाधारण धोरण आपल्या देशांतील नवऱ्यांचें असतें. तशाहि नवऱ्याचे गोडवे गाऊन राहणें ही आमची नीति समजली जाते. बाहेरख्याली नवऱ्याची सदोदित खरी अपेक्षा अशी असते, कीं, त्याच्या सुशील बायकोनें नवऱ्याच्या त्या भयंकर दोषावर पांघरूण घातलें, तरच ती सुशील–सुगृहिणी! पण जेथें माझ्यासारखी मुर्दाड बायको नवऱ्याला भेटते, त्या वेळीं नवऱ्याला त्या बायकोकरतां एक तर व्यभिचार अजिबात बंद करून सदाचरण करावें लागतें, आणि ती गोष्ट त्यास जमत नसेल तर त्या बेबनावानें पत्नीचा त्याग करावा लागतो, किंवा तिच्या माथीं कांहींतरी घाणेरडा आरोप करून तिला सरळ सोडचिठ्ठी द्यावी लागते; त्याशिवाय त्या व्यभिचारी नवऱ्याच्या वाटेंतील बायकोची आडकाठी दूर होऊं शकत नाहीं,–निघूं शकत नाहीं!

हिंदुधर्मांत पतिचा व्यभिचार उघडपणें अगर गुप्तपणें चालत असतां पत्नि मुकाट्यानें आपल्या अब्रुकरतां, जीवनसंरक्षणाकरता त्या सर्व गोष्टी राजरोसपणें सोसते.

परंतु खिश्चनधर्मात बायको व्यभिचारिणी आहे, बदचालीची आहे, अनीतिमान आहे, किंवा तिचा कोणाशीं गुप्त प्रेमसंबंध आहे, ही गोष्ट कोर्टापुढें सिद्ध केल्याशिवाय त्यास तिला सोडचिठ्ठी देतां येत नाहीं, व त्यालाहि स्वस्त्रीला आपल्या व्यभिचाराची गोष्ट समजेल कीं काय, कळून येईल कीं काय, याची सदैव भीति असते; कारण मग त्याच्या स्त्रीलाहि, त्या नवऱ्याला सोडचिठ्ठी देण्याचा अधिकार राहतो.

माझ्या पतिराजाना स्वैरवर्तनाची माझ्याकडून पूर्ण परवानगी पाहिजे होती; आणि ती मागण्याचें धाडस मात्र त्यांना माझ्यापुढें होत नव्हतें. अशा स्थितींत मला मुंबईला वेगळी ठेवून, गुप्तपणें त्यानी प्रेमाचीं खूपच कारस्थानें चालविलेलीं होतीं.

विसराळुपणा हा एक त्यांच्यांतील मोठा दोष होता. प्रियकरणीचीं किंवा तत्सम स्त्रियांचीं आलेलीं प्रेमपत्रें, पुस्तक वाचतां वाचतां त्यांतच ते ठेवून देत, किंवा त्यांतच विसरून जात! किंवा एकाद्या कोटाच्या खिशांत तीं तशींच घालून ठेवींत. दुसऱ्या प्रियकरणीचें पत्र आलें, म्हणजे पहिल्या प्रियकरणीच्या पत्राची त्याना स्मृति राहात नसे. नव्या लांडोरीपुढें ते नवा नाच पुनः पहिल्यापासून सुरू करीत. अशा कलहस्थितींत मी दिवस कंठीत असतां एकदा एका प्रख्यात इंग्लिश विदुषि-कुमारिकेचीं कांहीं रसभरित पत्रें, मला त्यांच्या कोटाच्या खिशांत व पुस्तकांतून सांपडलीं. त्या वेळीं मला अगदीं गुप्त डिटेक्टिव्हचेंच काम करावें लागत होतें! ती इंग्लिश कुमारिका एतद्देशीय म्हणजे मराठी भाषा उत्तम प्रकारें जाणत असे; इतकेंच नव्हे तर त्या भाषेंत ती विदुषि उत्कृष्ट प्रबंध, गोष्टी, कविता यांची रचना करीत असे. माझ्या पतिराजांची व तिची योगायोगानें मैत्री जमली होती. आज तिचीं पत्रें मजजवळ पुराव्याला नाहींत; नाहींतर सुशिक्षित कुमारिकांनीं गुप्त प्रेमाची वाट कशी चालून जावी, यांची उत्तम पाऊलवाट दाखवणारीं तीं पत्रें होतीं! त्या पत्रांतील तिची एकच काव्यकल्पना आतां मला आठवते. माझे पतिराज तेव्हां तिच्यापासून तीनशें मैल अंतरावर, दूर राहात होते! दोघेहि एकमेकांकरतां झुरत होतीं! तेव्हां त्या कुमारिकेनें माझ्या पतिराजाना लिहिलें होतें,—

"प्रियकरा ? तूं माझ्यापासून तीनशें मैल दूर आहेस; तुझ्याकडे मला प्रत्येक क्षणाक्षणाला यावेंसें वाटतें. माझें मन तर विद्युत्‌गतीपेक्षां अधिक गतीनें, तुझ्याकडे जातें आणि परत येतें; तुझ्या माझ्यामध्यें तीनशें मैल लांबीची प्रेमाची दोरी आहे! त्या दोरीला धरून, प्रियकरा ?—सरसरा तुझ्याकडे यावे आणि परत फिरावें असें वाटतें! त्यावरून मी तुझ्याकडे नित्य येतेंच! त्या-शिवाय मला कोणता आधार आहे? ती प्रेमाची एक अदृश्य दोरी आहे! त्या प्रेमदोरीच्या आधारानें तूं रोज संध्याकाळीं माझ्याकडे ये, आणि सूर्यकिरण दिसूं लागतांच पुनः त्याच दोरीला धरून तूं निघून जा! किंवा, मी तुझ्याकडे येईन!

त्या वेळीं ती सुशिक्षित कुमारिका माझ्या पतीस असेंहि लिहावयास चुकली नाहीं, कीं, "हे प्रियकरा ? तूं फार सावध रहा! तुझ्या बायकोला ही गोष्ट कळतां कामा नये! तुझ्या अंतःकरणाच्या एकाद्या कोपऱ्यांत माझें 'प्रेमस्थल' आहे, हें तिला समजून येतां कामा नये; नाहींतर तुझ्या माझ्या प्रेमांत तिचा अडथळा येईल! तेव्हां तूं अति सावध, दक्ष रहा!" ते शब्द असे होतेः—

"Be careful that your wife may not know the corner of love in your heart!" नंतर तिनें एकदा लिहिलें होतें, कीं, "आपण दोघेहि अमेरिकेंत जाऊन वास्तव्य करूं! तुझ्या बायकोला येथेंच, हिंदुस्थानांतच राहूं दे!"

शेवटीं ती विलायतेस गेली, व सांगावयाची दुःखाची गोष्ट अशीं कीं, ती माझी गोरी भावी कुमारिका सवत, दुर्दैवानें तिकडे जातांच ख्रिस्तवासी झाली!

त्या वेळीं माझ्या पतिराजांना परमावधीचें दुःख झालें! ते दुःखानें सुस्कारा टाकून म्हणाले, "शिक्षणखात्यांत अशी बी. ए. झालेली, नटीहून सरस, खरी ज्ञानाभिलाषी मैत्रीण, पुनः मला मिळावयाची नाहीं! परमेश्वर अशी प्रतिभासंपन्न कवयित्री क्वचितच निर्माण करतो! प्रत्यक्ष ती स्वरमाला!"

परंतु तिचीं पत्रें कोठें गहाळ झालीं, बेपत्ता झालीं, हें मात्र त्याना समजलें नाहीं. मला तर त्याबद्दल त्यांना विचारतां येणें शक्यच नव्हतें. म्हणून ते अगदीं, तिचा प्रश्न काढतांच नेहमीं गप्प बसत!

त्या घटनेनंतर कांहीं वर्षांनीं मी मुंबईस वर सांगितल्याप्रमाणें मुलांना घेऊन राहात असतां, नुकतीच एक नवी जागा भाड्यानें घेतलेली होती. परंतु त्या घरांत नित्य मध्यरात्रीं एकाद्या बाईच्या रडण्याच्या आवाजासारखा रडण्याचा भयंकर आणि भेसूर आवाज ऐकूं येत असे. सर्वजण म्हणत तें घर ६३८ नंबरचें आहे. म्हणजे ९ या आंकड्यानें भागलें असता, बाकी ८ राहते! म्हणजे तेथें भुताटकी, पिशाच्चबाधेपासून त्रास, अशा गोष्टी आढळून येतात. त्या घरांत धंदेवाल्याचें दिवाळें वाजतें! त्या घरातील स्त्रियांची बुद्धि फिरते! त्यांचीं मनें वाईट बनतात. अपकीर्तिच्या गोष्टी वारंवार घडून येऊन उदासपणा, दुसऱ्याविषयीं अनादरभाव, मत्सर यांचें प्राबल्य माजतें; व नेहमी अपयश येऊं लागतें!—मुख्य गोष्ट बाधिकपणाची. मला तें ज्योतिषशास्त्र आधीं माहीत नव्हतें! प्रथम प्रथम, मीहि त्या आवाजानें दचकत असे; पण पुढें पुढें तो आवाज माझ्या चांगला परिचित झाला; पण माझें भय मात्र ती जागा पुढें मी सोडली तरी कधींच नष्ट झालें नाहीं.

त्या भुताटकीच्या घरांत एक दिवस पतिराज, वास्तव्याकरतां आले! त्या दिवशीं ते बाहेर कोठें तरी क्लबांत रंग करून मोठ्या प्रतिष्ठितपणें, डौलानें माझ्या घरीं आले होते. बरोबर मध्यरात्रीं, त्यांनी तो भयंकर आवाज ऐकला. आणि ते दचकलेच!

परंतु ते अशा भुताटकीला, भ्रमपूर्ण कल्पनेला दचकून जाणारे, भिणारे नव्हते. ते धीटपणें उठले, हातात त्यानी दिवा घेतला, आणि घराचा कोपरा नी कोपरा धुंडाळला! पण कांहीं त्या आवाजाचा त्यांना शोध लागला नाही शेवटीं त्यांची निराशाच झाली!

अंथरुणावर येऊन ते असे डोळ्यांवर पांघरूण घेतात तों पुनः तोच भयंकर आवाज! आणि आवाज तरी किती भयंकर,—अंगावर कंप उत्पन्न करणारा थरकांप करून सोडणारा तो भेसूर आवाज! तें भूत ओरडत असे,..."ऊहूं ऊहूं, ऊहूं! ऊहूं ऊहूं ऊहूं!"

तो भेसूर आवाज पुनः ऐकतांच पतिराज घाबरले. त्यांच्याहि अंगाला दरदरून घाम सुटला! ते मला भयकंपित ओठांनीं म्हणाले," कसला ग ह

भयंकर भेसूर आवाज ऐकूं येतो आहे, या घरात? एकाद्या महा दुःखी तरुण स्त्रीचा, भुताटकीचा हा आवाज मला भासतो आहे!"

मी उत्तर दिलें, "होय, तो स्त्रीचाच, तरुण दुःखी स्त्रीचाच आवाज मलाहि वाटतो आहे!"

"किती हा भयंकर, छातींत धडकी भरवणारा आवाज!" पतिराज पुनः उद्गारले.

मी पुनः उत्तर दिलें, "आवाज स्त्रीचा आहे, यांत कांहींच शंका नाहीं. पण तिच्या आवाजावरून ती आपल्या इकडची हिंदी स्त्री दिसत नाहीं. हा आवाज अगदीं एकाद्या अमेरिकन, युरोपियन स्त्रीच्या आवाजासारखा आहे! हिंदी माणसात भुतें आहेत किंवा माणसें भुतें होतात, आणि युरोपियन लोकात भुते नाहींत, असें कुठें आहे?"

पतिराज भयचकित स्वरानें पुनः म्हणाले, "खरंच, कोण आहे ग? किती भेसुर आणि भयंकर आवाज! कोण आहे ती? कां रडते आहे? तिची कसली इच्छा राहिली आहे?"

मी तेव्हा थट्टेनें म्हटलें, "खरं सांगूं ती कोण आहे ती? माझा आपला तर्क आहे! भुतांची, त्यातल्या त्यांत हडळींची भाषा पुरुषांपेक्षां बायकांनाच अधिक स्पष्ट, आणि लौकर समजते. मी सागूं तुम्हाला, ती काय म्हणते आहे ती?–तिची काय अंतिम इच्छा राहिली आहे ती? सांगूं मी?" मी आग्रहानें पतिराजाना विचारलें!

पतिराज म्हणाले, "सांग बघूं!"

मी म्हटलें, "त्या हडळीने, मरणापूर्वीं कांहीं गुप्त प्रेमपत्रें, आपल्या एका प्रियकर प्रोफेसराला दिलेलीं आहेत. तीं तिला परत न मिळाल्यामुळें, आणि त्या पत्रांच्यामुळें अब्रूचा फार घोटाळा होणारा असल्यामुळें, ज्याला तिनें तीं पत्रें दिलीं आहेत त्याच्याजवळ करुणवाणीनें प्रार्थना करून ती परत मागते आहे! हडळ उत्तम इंग्लिश भाषेंत रडगाणें गाते आहे!"

पतिराजांना पुढें अधिक कांहींच सांगावें लागलें नाहीं! ते मनांत सर्व कांहीं उमजले. आणि माझी फार मनधरणी करून त्यानीं त्यांतील कांहीं

पत्रें मजकडून परत मिळविलीं. व मीहि मूर्खपणानें, भोळ्या स्त्रीस्वभावास अनुसरून त्यांना परत देऊन टाकलीं! कांहीं पत्रें हातांत पडतांच त्यानीं दुसरे दिवशीं जें दुपारच्या गाडीनें आपल्या कॉलेजच्या गांवीं जावयाचें ठरविलें होतें, ते दुसरे दिवशीं उजाडतांच पहिल्या गाडीनेंच निघून गेले! बाकी राहिलेलीं कांहीं पत्रें, 'आपल्या भावाचा पराक्रम, आणि आपल्या भावाची नीति पाहण्याकरतां म्हणून' मी त्यांच्या भावाकडे रजिस्टर पोस्टानें पाठवून दिलीं. त्या पत्रांचे फोटोहि मी घेतले होते; व रजिस्टर्ड केल्याची पावतीहि मी कुठें जपून ठेविली होती.

त्यांच्या पशुतुल्य आचरणाला पुढें काहींच सीमा राहिली नव्हती. मद्यपी आणि विषयांध यांची तुलना करावयाची झाल्यास, त्या दोघांत मद्यपी मी अधिक बरा म्हणेन. कारण, जोपर्यंत बाटलीला पैसा आहे, तोपर्यंतच तो आपले चाळे करील. पण विषयांधाची तृष्णा कधींच पुरी होणारी नाहीं. पैसा असो नसो, तो गरीब अबलेला नित्य छळत राहणारच. 'मन हें ओढाळ गुरूं, परधन--परकामिनीकडे धावे,' एवढें एकच आर्याचरण त्यानीं आपल्या कृतीनें, आपल्या पत्निला सिद्ध करून दाखविलें होतें!

प्रवासाकरतां असेच एकदा ते, एका ठिकाणीं गेलें असतां, तेथील घरच्या यजमानानी त्यांना सांगितलें, "मिस्टर जोशी! हें घर आपलेंच आहे असें समजा! तुम्ही आज गरीबाच्या घरीं आलांत, मला आनंद झाला! आज रात्रीं तुम्ही इथें माडीवर खुशाल झोपा; आजची रात्र तुम्हाला झोप मिळाली, म्हणजे उद्यां सकाळीं पहिल्या गाडीनें आपणास हैद्राबादला जातां येईल!" असें म्हणून त्या सज्जन गृहस्थानें माझ्या पतिराजांच्या देखतच आपल्या तरुण पत्नीस सांगितलें, "हें बघ, पहाटे प्रोफेसर साहेब लौकर उठतील; तेव्हां त्यांना चहा लौकर दे. सकाळीं अगदीं पहिल्या ट्रेननें ते जाणार आहेत. मी आज गांवाला जाऊन उद्यां संध्याकाळीं परत येतों." असें सांगून आणि माझ्या पतिराजांना अभिवादन करून, तो भला गृहस्थ त्याच रात्रीं परगांवीं निघून गेला.

पतिराजानी ती रात्र अर्धवट कशी तरी काढली. आणि भल्या पहाटेसच

ते उठले. अर्थात घरच्या बायकांना, विशेषतः एका स्वयंपाकी तरुण बाईला, लौकर उठावें लागलें. ती बाई कसली,–१८ वर्षांची एक आश्रित सुंदर मुलगीच होती. तिनें ऊन पाणी दिलें; आणि त्वरेनें चहाहि केला. व तो त्यांना देण्याकरतां म्हणून कपबशी घेऊन ती त्यांच्यापुढें गेली; तोंच माझ्या पतिराजांची बुद्धि फिरली; आणि त्यांनीं तिचा हात धरून व तिला खालीं पाडून तिच्यावर बलात्कार केला! त्याबरोबर ती मोठ्यानें ओरडली! प्रसंग आपल्या अंगाशीं येणार असें दिसतांच त्यानीं आपली बॅग आणि लहान प्रवासी वळकटी स्वतःच्या हातांतच घेऊन जें स्टेशनकडे पलायन केलें, ते आपल्या इच्छित स्थळीं पोहोचेपर्यंत त्यानीं मागें वळूनच पाहिलें नाहीं! अब्रू जाण्याच्या भयानें बायकानीं तें प्रकरण तेथेंच थांबविलें; नाहीं–तर त्या दिवशीं पतिराजांच्यावर फारच मोठें संकट येणार होतें. पाहुणा घरीं आला म्हणून काय झालं? त्याची दृष्टि कशी आहे, हें कर्त्या पुरुषानें प्रथम पाहिलेंच पाहिजे. कारण प्रत्येकाचें मन पापीच आहे; पापी विचारांकडे धांवणारेंच आहे.

ती सर्व हकिकत पुढे त्या गरीब गृहस्थाच्या बायकोनें डोळ्यांत पाणी आणून मला सांगितली. कारण, त्या गरीब अविवाहित मुलीला तिनें लहानपणापासून सांभाळलें होतें. पण, मी जेव्हां पतिराजाच्या जवळ त्या तरुण मुलीबाबत खुलासा विचारला, तेव्हा ते उलट मलाच दोष देऊन म्हणाले, "स्त्रियांना कामेच्छा फार असते. त्या प्रत्येक क्षणाला नटतात मुरडतात, पुरुषाकडे पाहतात, याचा अर्थच असा असतो, कीं, 'पुरुषांनीं आपल्याकडे पहावें!' एकाद्या सुशील स्त्रीची इच्छा पुरुषानें आपल्याकडे थोडेंच पहावें अशी असते, तर एखाद्या जास्त नटव्या स्त्रीची इच्छा, पुरुषांनीं आपल्याकडे अधिक आकर्षण व्हावें, बघणाराचें मन, दृष्टि, अधिक ओढलीं जावींत अशी इच्छा असते. पण 'इच्छा असते' हा मुख्य सिद्धान्त! त्याशिवाय, ती स्त्री नट्टापट्टा अधिक करणारच नाहीं. नट्टापट्टा जास्त होत चालला कीं, समजावें, ही नटी आहे! अर्थात् तिची इच्छा वाईट हेतूची नसली, तरी तिची भूमिका आकर्षण करून घेणारी म्हणून असणारच! बायकांना ताळतंत्र कुठें असतो?

एकवेळ पुरुष कितीहि निर्लज्ज झाला, तरी दुसऱ्या स्त्रीचा हात धरण्यासहि एकांतांत तो भिईल, पण निर्लज्ज स्त्री मात्र, लज्जेचा खोटा आविर्भाव करून, निर्लज्जपणें त्याच्या गळ्यांत हात घालील! वेश्या काय करतात? त्यांना सुद्धां लज्जा असते! त्या पोरीनें त्या सुप्रभातीं, मला चहा देतांना एकदम माझा हातच धरला! माझ्या हातांत होतें ५०० रुपयांचें रिस्टवॉच! मला वाटलें, तेंच ती हिसकावून घेत आहे; म्हणून त्या गैरसमजुतीनें मी तिचा हात धरला!! सारा गैरसमजुतीचा प्रकार आणि घोटाळा! माझा हात धरूनच ती गप्प राहिली नाहीं, तर मला म्हणाली, "तुम्ही माझें कांहीं ऐकलें नाहीं, तर मी ओरडेन, आणि सर्व मंडळी मग जागी होतील!" अब्रूच्या भयानें कसातरी हात सोडवून घेऊन, सामान घेऊन, टांग्याची वाट न पाहतां मी पळून गेलो! यांत माझा काय दोष? मी तिचा हात धरला, कीं तिनें माझा हात धरला! कुणाचा हात कुणाला लागला? सांग!"

मी म्हटलें, "तुम्ही धन्य पुरुष आहांत! एवढ्या मोठ्या संकटांतूनहि सहीसलामत सुटलांत!"

पतिराज म्हणाले, "ज्या पुरुषाच्या हातावर शुक्राचा उंचवटा तांबडा, व उसळून आलेला असतो आणि आयुष्य रेषेकडे येणाऱ्या आडव्या रेषा फार असतात, आणि त्यांची मोठी जाळी झालेली असते, तेव्हां, त्याच्या आयुष्यात असे स्त्रियांच्या भानगडीचे प्रसंग फार येतात; पण माझ्या हाताच्या शुक्र उंचवट्यावर तो उंचवटा कितीहि दोषी असला, तरी चौक (Square) आहे; त्यामुळें मला असा स्त्रीच्या बाबतींत कोणताही संकटाचा प्रसंग आला, तरी दैवानें त्यांतून मी बचावतों; माझें संरक्षण होतें! अग, सामुद्रिकशास्त्रावर माझा पूर्ण भरंवसा आहे. नशिबाचा सूक्ष्म उलगडा पाहिजे असेल, तर प्रत्येक व्यक्तिनें आपला उजवा हातच बघितला पाहिजे. मग ती व्यक्ति स्त्री असो, कीं पुरुष असो! कुंडलीवरून, आंकडेमोडीनें ही गोष्ट पूर्णपणें समजणारी नाहीं. **स्त्री-पुरुषांच्या हातांत शुक्राच्या उंचवट्याचें फारच महत्व आहे. आणि Square (चौक) कोठेंहि असो, त्याचेंहि महत्त्व फारच!"**

तशाच प्रकारें मी मुंबईस असतां ते परगावाहून अकस्मात आले. मी घरांत नव्हते. नर्सच्या कामास गेले होतें. शेजाऱ्यांनीं सांगितलें, "तुमची मंडळी अमुक एका ठिकाणीं, आपल्या ओळखीच्या मैत्रिणीकडे बसावयास गेली आहेत, तिकडे तुम्ही जा!" मी त्या दिवशीं त्या मैत्रिणीकडे गेलेंच नव्हतें. पतिराज लगबगीनें, त्यांना सांगितलेल्या ठिकाणीं पत्ता काढीत गेले. ती माझी ओळखीची बाई अत्यंत सुस्वरूप, तरुण व घरात एकटीच होती. एक लहान मुलगीहि तिला होती. नवऱ्याची गरिबी होती, व तो गिरणींत नोकर होता; मात्र शरीरानें सुदृढ, पैलवान होता.

माझी चौकशी तिच्याकडे केल्यावर ते विश्रांतिकरतां तेथें बसले! नंतर प्रेमाची प्रस्तावना करीत ते तिला म्हणाले, "असल्या तुमच्यासारख्या सुंदर स्त्रीनें असल्या भिकारड्या जागेत आणि पुरेशा अन्नवस्त्रांवांचून गरिबींत दिवस काढावेत, हें पूर्वजन्मीचे दुर्दैवच म्हणावयाचें!–पूर्वजन्मीचें तुमचें पापच!" असें म्हणून ते पंख्यानें वारा घेत, तिच्याकडे बघत खुर्चीवर बसून राहिले.

ती आदरानें, आणि एवढा मोठा माणूस आपल्या घरीं आला म्हणून केवळ शिष्टाचारानें त्याना म्हणाली, "चहा घेतां का?"

पतिराज म्हणाले, "अवश्य! चहा मला पाहिजेच!" म्हणून ती लगबगीनें स्टोव्ह पेटवण्याकरतां गेली. पण साखरेचा डबा तिने उघडून पाहिला, तों त्यांत साखरच नव्हती, असें तिला दिसून आले. तेव्हा ती त्याच्यासमोर येऊन नम्रतेनें म्हणाली,—

"नाइलाज आहे; साखरच घरांत शिल्लक नाहीं. संध्याकाळीं गिरणींतून येतांना आणणं होईल!"

पतिराज लगबगीनें खुर्चीवरून उठले, आणि तिला म्हणाले, "एवढंच ना? मी साखर आणून देतों! चहा काय आतां होईल!" असें म्हणून ते खालीं गेले, आणि थोड्याच अवधींत एक शेरच नव्हे, तर चांगला ५ शेर साखऱ्या त्या बाईस आणून दिला; इतकेंच नव्हे तर रोख ५ रुपये त्या धाकट्या मुलीच्या हातांत खाऊसाठीं म्हणून दिले! माझ्या पतिचें तें केवढें

औदार्य होतें ! नंतर, त्यांच्यासमोरच, पण दूर बसून ती बाई चहा तयार करूं लागली. पतिराजांनीं आधीं सत्य साखर पेरलीच होती; त्यांना वाटलें 'साखर पेरली म्हणजे साखरच उत्पन्न होईल;' पण उगवलें विष !

पतिराजानी इकडचें तिकडचें बोलणें केल्यावर मूळ आपल्या मुद्यावर प्रस्तावना केली, " असं दुःखी आयुष्य घालविण्यापेक्षां, तुम्ही माझ्याबरोबर विद्यावती नगरींत रहावयास याल, तर फार बरें होईल. तुम्हाला पुष्कळ सुख लागेल. येथें तुम्हाला सुखाचा वाराहि नाहीं ! रत्न हें नेहमीं कोंदणांतच बसलं पाहिजे. माझी बायको–ती अवदसाहि सध्या माझ्या घरीं नाहीं. तुमच्या नवऱ्याला मी तिकडंच कुठंतरी नौकरीहि लावून देईन; आणि माझ्याबरोबर तुम्हाला सुखानें संसार करतां येईल ! तुम्ही म्हणतच असाल, तर माझ्या बायकोला पुनः घरांत न घेतां, तुम्ही सांगाल त्या ठिकाणीं हाकलून देईन !"

ती बाई संतापली. तिनें हलक्या स्वरांतच पण त्याना ऐकूं जाईल अशा खणखणीत आवाजांत त्यांना सागितलें "आतां मी तुम्हाला चहा देतच नाहीं ! ती तुमची साखर आणि ते तुमचे पांच रुपये खुशाल परत घेऊन जा; आणि शक्य तितक्या लौकर जा ! त्यानी गिरणींतून येऊन तुम्हाला पाहिलें नाहीं, त्याच्या आंतच तुम्ही इथून निघून जा ! ते आहेत भीमसेन ! गांठ पडेल त्यांच्याशी ! आणि फुकट दोघांची कुस्ती पाहायला प्रेक्षक येथें जमा होतील. ते माझे पति तुमच्यापेक्षां फार खंबीर, सशक्त, आणि लठ्ठ धिप्पाड आहेत; व मला ते आवडतातहि ! ते भारी संतापी आहेत. पत्रिकेंत त्याना मंगळ आहे !"

" होय कां ? तो मंगळ-मनुष्य आहे ? " असें म्हणून तात्काळ त्यांनीं चहा न घेतांच हॅट डोक्यावर चढवली, आणि ते तेथून जिना उतरून पसार झाले !

पूर्वीच्या बाईप्रमाणेंच त्याहि बाईनें ही आपली हकिकत मला सांगितली.

बंगल्यांतील जागेंत खडी टाकून जमीन करणाऱ्या एका बाईबरोबरहि त्यानी पांच रुपये तिला बक्षिस देऊन अतिप्रसंग केला. दरवानानें त्या प्रसंगाचें वर्णन केलें, तें असें ! :—

"...तुम्ही नसतांना, ती बाई हंसत हंसत साहेबांच्या माडीवर गेली; आणि बऱ्याच वेळानें फार खूष होऊन, पुनः हंसत हंसतच खालीं आली!...पांच रुपयांच्या नोटेची मोड ती माझ्याकडे मागण्यास आली, म्हणून ही गोष्ट आपणास समजली!"

अशा एक कां दोन?–अनेक त्यांच्या प्रेमाच्या गोष्टी!

शेवटच्या प्रसंगानें मात्र कळसच केला! ते कॉलेजच्या सुट्टीच्या वेळीं प्रवासाकरता म्हणून पंजाबमध्यें गेले होते. त्यांचे मित्रहि, जे समानशीलाचे आणि समान व्यसनाचे होते, तेहि त्यांच्याबरोबर होतेच. तेथें एका उत्तम वेश्यागृहात ते गेले. त्याना तेथें म्हणें 'अंग चोळून घ्यावयाचें होतें.' त्यांना मर्दन करण्यास रूपवति स्त्रिया, अर्ध नग्न स्थितींत त्यांच्याकडे आल्या. त्या एक का दोन? अनेक होत्या! त्या म्हणे याना गोपीचंद राजाच समजल्या! यांना तेव्हा असें झालें, कीं, त्या अप्सरामधून कोणती पसंत करूं, नी कोणती पसंत न करूं? शेवटीं, एक मेनका पसंत करून त्यानी तिच्या सहवासांत ती सर्व रात्र घालविली; बोलून चालून ती वेश्याच होती! सुभाषितांमध्यें अग्निहोत्री, तापस, ब्रह्मज्ञ यांच्याबरोबर गंमतीनें वेश्येचीहि तुलना केलेली आहे. वेश्येनें अग्निहोत्राची दीक्षा अहोरात्रच घेतलेली असते! तशीच ती उंदराप्रमाणें मनुष्याजवळचें द्रव्य असेल नसेल तें कुरतुडून घेणारी आहे, असेंहि म्हटलेलें आहे. प्रत्यक्ष व्यवहारांत त्या दोन्ही म्हणी मुळींसुद्धां खोटया नाहींत; अक्षरशः सत्य आहेत. पतिराजांना तिनें दोन्ही गोष्टींचा तात्काळ अनुभव, तात्काळ साक्षात्कार दिलेला होता! उंदराचें कुरतडणें आणि वेश्येचें कुरतडणें सारखेंच!

पंजाबहून ते जे परत आले, तोंच आठवे दिवशीं त्यांची मला तार आली,– "ताबडतोब निघून ये! फार आजारी!" तार मिळतांच मी तत्काळ गेले.

जी सुंदर स्त्री म्हणून, मी जिचें वर वर्णन करून सांगितलें ती दर्शनी सुंदर होती, अप्सरा होती! पण गुप्तव्याधीनें अत्यंत ग्रस्त झालेली होती. ती अग्निहोत्री असल्यामुळें आपल्या अग्निचा प्रसाद त्यांना तिनें यथास्थित दिलेला होता! तिच्यामुळें त्यांना भयंकर रोग जडला होता. खरोखर जे वेश्यासमागम

करून स्वपत्नीशींहि पुनः समागम करतात, त्यांच्यासारखे नीच पुरुष जगांत दुसरे नसतील. स्वतःच्या स्त्रीचें पावित्र्य तेच अधम पुरुष आपण होऊन नष्ट करतात. माझे पतिराज त्या गुप्त भयंकर रोगाच्या आजारानें अगदीं अहोरात्र एकसारखे तळमळूं लागले; म्हणूनच त्यानीं मला तावडतोब बोलावलें होतें.

मी जाऊन बंगल्याकडे दुरून पाहतें, तों, सर्व बंगला हिरव्या चिकाच्या पडद्यांनीं आच्छादित केलेला, नव्हे अगदीं मढवूनच काढलेला! प्रकाशाचा एक किरणहि आंत प्रवेश करणें शक्य नव्हतें. मला बघतांच तीव्र वेदनांनीं, आणि त्यांना झालेल्या पश्चात्तापानें, त्याना जें रडूं कोसळलें, तें त्यांचें त्यांनाच आवरेना!

ते म्हणाले, " सुंदर? या वेळीं कांहींहि करून तूं माझा जीव वांचव; माझी शुश्रूषा कर. तूंच माझी खरी देवता. पुनः असें नीच कृत्य मी करणार नाहीं; माझा जीव वांचव! माझ्या सर्वांगाचा दाह होतो आहे; माझें सर्वांग अहोरात्र पेटलें आहे, पेटत आहे, असें मला वाटतें!"

मी त्यांना म्हटलें, " तुम्ही असें कोणतें दुष्कर्म केलेंत?"

ते म्हणाले, " मी पंजाबी स्त्रियांचें सौंदर्य फार दिवस ऐकत होतों, म्हणून मी पंजाबला गेलों होतों. बाह्यात्कारीं सुंदर दिसणाऱ्या एका वेश्येला मी भाळलों. माझे शंभर रुपये गेले, घड्याळहि गेलें! संबंध झाला मात्र, माझ्या सर्वांगाचा भडका उडाला! कुठें तरी जाऊन नदींत, विहिरींत, समुद्रांत एकदम उडी ठोकावी असें मला वाटलें. हालाहल प्राशन करतांना शंकराच्या गळ्याची जी भयंकर अवस्था झाली, तीच माझीहि झाली! माझ्या ऊष्णतेनें पाणी सुद्धां तापेल, पेटेल असें मला वाटलें! खरोखरच तुमच्या पुराणांतरीं जें लिहिलें आहे, कीं, वेश्या ही मातीच्या लोट्याप्रमाणें आहे; आणि तो लोटा जसा एकदा स्मशांत टाकून दिला, म्हणजे त्यास कोणी स्पर्श करीत नाहीं,-आणि त्यास स्पर्शहि करूं नये अशी धर्माज्ञा आहे, तीच गोष्ट वेश्येच्या बाबतींत. पण तें पुस्तकांतलें ज्ञान मी व्यवहारांत विसरलों! जसा कांहीं शरीराला विजेचा धक्का बसावा, किंवा अग्नींतून एकादें रताळें भाजून निघावें आणि त्याची जशी वाफेनें स्थिति

व्हावी, अगदीं तसेंच मला झालें. त्या क्षणापासून, त्या वेश्येच्या विषानें, माझ्या शरीराची शिमगीपौर्णिमेची होळी पेटली आहे ! काय करूं ! कुठें जाऊं ? म्हणजे माझा दाह शांत होईल ! ”

असें म्हणत असतांच, मोठ्या कष्टानें ते आपल्या कॉटवरून उठले, खाद्यावर कसा तरी एकदा टर्किश टॉवेल टाकला, आणि स्नानगृहांत शॉवरबाथ-खालीं जाऊन बसले. त्या वेळीं ते मला म्हणाले, “या माझ्या शरीराच्या स्पर्शानें पाण्याचा नळ सुद्धा तप्त होऊन, त्यांतलें पाणी पेटेल कीं काय, असें मला भय वाटतें आहे ! ”

त्या वेळीं ते दिवसारात्रींतून शंभर शभर वेळां तरी एकसारखे शॉवरबाथखालीं जाऊन बसत होते. बंगल्याला तर अगदी गोषाचेंच स्वरूप प्राप्त झालेलें दिसत होतें. तितक्या आंघोळीहि करून, थंड पाण्यांत डुंबूनहि, त्यांना बरें वाटलें नाहीं; आणि शेवटीं, तो त्याचा स्पर्शजन्य आजार फारच विकोपास गेला !

मी त्याना माझ्या दुःखाश्रूंनीं डबडबलेल्या डोळयांनीं म्हटले, “ तुमच्याशीं चागल्या स्त्रीनें अशा भयंकर स्थितींत संसार तरी कसा करावा ? अगदीं पतिव्रता स्त्री झाली, तरी सुद्धा तिनें तुमची सेवा अशा स्थितींत कशी करावी ? तुम्ही असें बाहेर जाऊन विष खाऊन येणार, भलतेसलतें खाऊन येणार. त्याची बाधा मलाच काय, पण ज्या ज्या स्त्रीला, व्यक्तिला तुम्ही भेटाल, त्या प्रत्येकीला ती बाधा होणार. तुमच्या या कृत्याचा परिणाम तुमच्याच मुलांनाहि भोगावा लागावयाचा. त्या लहान अर्भकांनीं, मुलामुलींनीं अशा तुमच्या विषमय देहास ‘ बाबा ? ’ म्हणून कशी प्रेमानें मिठी मारावी ? त्यांनीं तुम्हांला कसें भेटावें ? त्या लहानग्यांनीं तुमच्या विषारी ओठांचें चुंबन कसें घ्यावें ? त्यांनीं तुमचें उष्टें कसे खावे ? आणि सुगृहिणीने अशा स्थितींत तुमच्याशीं संबंध तरी कसा करावा ? मला तुम्ही दूर ठेवलीत, हें एका दृष्टीनें चांगलेंच केलेंत असेंच आतां मी म्हणेन. कारण माझ्याबरोबर अजून तीन कच्ची-बच्चीं आहेत. त्या माझ्या दोन लतांना, आणि एका तरूला तुमच्या दाहाचा स्पर्श झाला तर त्या लता आणि तो तरु हीं करपून जातील; त्यांच्यावर अनिष्ट परिणाम होईल. परमेश्वराचे खरोखरच याबद्दल मी आभारच मानते. तुमची सेवा

करणें माझें कर्तव्यच आहे; तें मी अवश्य करीन. परंतु या भयंकर रोगांतून तुम्ही कसें वांचणार याचीच माझ्या हृदयाला चिंता लागून राहिली आहे. असल्या कृत्यांनीं तुम्ही पुरुष स्वतांचाच नाश करतां असें नव्हे, तर स्वपत्नीचा, मुलांचा, भावी पिढीचा, कुटुंबाचा, समाजाचा, राष्ट्राचाहि नाश करतां!"

ते गयावया करीत करुण वाणीनें मला म्हणाले, "पुनः मी असें कृत्य,-पापकृत्य करणार नाहीं! पण माझा यावेळीं जीव वांचव! मला पुनः आयुष्य प्राप्त करून दे! पर्वताच्या डोक्यावर ज्याप्रमाणें कमळ उगवणें शक्य नाहीं, घोड्याचें कार्य जसें गाढवाकडून व्हावयाचें नाहीं, जवसाचे जसे तांदुळ व्हायचे नाहींत, तितकीच अशक्य गोष्ट वेश्याच्या पवित्रपणाबद्दलची आहे! मी पुष्कळ विद्या शिकलों, पण प्रत्येक विद्येचें नुसतें चुंबन घेण्यापलीकडे मी अंतःकरणांत कांहींच ग्रहण केलें नाहीं! अनेक विद्यांचें चुंबन घेणारा मी पदवीधर, आणि अंतःकरणांत प्रेम नसतांना प्रत्येकाचें चुंबन घेणारी वेश्या यांच्यांत कांहींच अंतर नाहीं! आतां त्या यमलोकच्या मार्गानें मी कधींच जाणार नाहीं!"

मला त्यांची तेव्हां फारच दया आली. उभयतांमधील त्या वेळपर्यंत असलेला तीव्र विरोध, कलह, मी पार विसरून गेलें! त्यावेळपर्यंत त्यांच्यापासून मला झालेलें दुःख, मला भोगावे लागलेले कष्ट, यांचा मी मनाला विसर पाडला; आणि पति म्हणून त्यांची सेवा शुश्रूषा करण्याचें माझें कर्तव्य मी ठरवून, तसें वागण्याचा मी त्याच क्षणीं दृढ निश्चय केला. त्यावेळीं त्यांच्या हाताच्या मधल्या बोटाच्या पहिल्या पेऱ्यांतील रक्ताचा एक थेंब कांचेवर काढून घेऊन, तो केवळ तपासण्याकरतां, एका युरोपियन डॉक्टरला मला, फक्त एका वेळेस ऐंशी रुपये द्यावे लागले; आणि तदनंतर, रोगाचें खरें निदान झालें. वांगें भाजून जसें तें दिसावें, तशी स्थिति तेव्हा त्यांची झालेली होती. त्या वेळीं, ज्या दिरानें मला हाकलून दिलें होतें, माझें सर्वस्व लुबाडून घेतलें होतें, त्याला मी तार करून बोलावलें! आणि आपल्या गरीब भावजयीला दोष देण्यापेक्षां आपल्या भावाची करणी, आणि त्याची झालेली स्थिती, उघड्या डोळ्यांनीं पहा म्हणून सांगितलें. त्याच्याहि अंतःकरणांत तेव्हा तो देखावा पाहून चर्रर झालें! एका वेळेस माझ्याजवळचे

शेपाचशें रुपये खर्चून त्या दिराच्या बायकोचीहि मी जिवापलीकडे शुश्रूषा केलेली होती; म्हणूनच त्या दिरास माझ्या पतिची स्थिति बघण्यास मी बोलावलें होतें. मोठ्या कष्टानें त्यानें तें भावाच्या यातनांचें दुःख गिळून, तो परगांवीं निघून गेला!

त्या भयंकर गुप्त आजारातून, माझ्या पतीस बरें होण्यास पुष्कळच कालावधि लागला! माझ्या सेवेला, शुश्रूषाकार्याला यश लाभलें, आणि माझे पतिराज त्या भयंकर दिव्यातून बाहेर पडून दीर्घायुषी झाले!

बरे झाल्यावर एक दिवस, पश्चात्तापानें दग्ध झालेल्या स्थितींत, सद्गदीत होऊन, ते मला कृतज्ञतेनें म्हणाले, "सुंदर! तूं केवळ मला दमयंतिप्रमाणें भासते आहेस. दमयंतीनें नलराजाची प्रेमानें समजूत घालतांना असेंच म्हटलें आहे, कीं, "नच भार्यासमं किंचित् विद्यते भिषजां मतम्। औषधं सर्व दुःखेषु..." जगांतील सर्व वैद्यांचें अगदीं एकमत आहे, कीं, भार्या हीच खरी वैद्य आहे; तीच खरी शुश्रूषा करणारी आहे. नवऱ्याच्या सर्व दुःखरोगावर औषध देणारी एक भार्याच फक्त या जगांत आहे. खरोखर तें वाक्य, या वेळीं, तुझ्याहि बाबतींत अगदीं सत्य आणि अक्षरशः खरें आहे! तूं माझ्या सन्निध होतीस म्हणूनच मी वांचलों; माझा अपमृत्यु टळला!"

## प्रकरण १३ वें



# मारुतीचा साक्षात्कार!

वडील वारले तेव्हांपासूनच माझ्या धार्मिक वृत्तींत फार मोठा बदल झालेला होता. वडील मारुति-उपासक होते, हें पूर्वी सांगितलेंच. माझीहि मारुतिवर अत्यंत श्रद्धा होती. अमेरिकेंत असतांना आणि प्रत्येक संकटाच्या वेळीं मी त्यालाच सहाय्यार्थ हाक मारीत असे. माझ्या पतीची वृत्तिहि धर्मबाबतींत फार चमत्कारीक होती. ते हिंदुमित्राचेकडे गेले, की, हिंदुधर्मासारखा श्रेष्ठ व उत्कृष्ट धर्म नाहीं असें प्रतिपादन करीत. उलट मुसलमान मित्रांचेकडे मेजवानीवर ताव मारण्यास गेले, म्हणजे तो धर्म त्यांना अगदीं प्यार असे! माझ्या बाबतींत मात्र ते माझ्या मारुतिउपासनेच्या आड नेहमींच येत. खिस्तिधर्माची पुरेपूर सत्ता ते घरांत आणि विशेषतः माझ्यावर चालवीत. मी जरी परधर्म स्वीकारला होता, तरी मारुतिची भक्ति करण्यांत कांहीं पाप आहे असें मला कधींच वाटत नसे. म्हणून मी मोठ्या प्रयासानें हरिद्वारकडून आलेली एक मारुतिची सुंदर मूर्ति मिळवून माझ्या संग्रहीं ठेवली होती, त्या मूर्तिची दर शनिवारीं मी पूजाअर्चा करीत असे व त्याच्यापुढें तुपाचा दिवा लावून प्रार्थना करीत असे; परंतु तो प्रकार त्यांच्या गैरहजेरींत आणि नकळत, गुप्ततेनें पार पाडावा लागे! असा क्रम माझा कित्येक दिवस चालला होता. पण आमचा दोघांचा जेव्हा जेव्हां वाद होई, त्या त्या वेळीं माझ्या मारुतिभक्तीची ओळख त्याना झाल्यावांचून रहात नसे. हिरण्यकश्यपूला ज्याप्रमाणें प्रल्हाद दिसत असे, त्याप्रमाणेंच तेहि माझ्याकडे पहात होते. त्या माझ्या मूर्तिच्या शोधांत ते नेहमीं असत. ती मी मूर्ति जिवापलीकडे गुप्त आणि जपून ठेवीत असे. पण एक दिवस पाळत ठेवून त्यानीं ती मूर्ति लांबविली आणि जेथें त्यांची केवळ बुटांची खोली होती, तेथें बुटांच्या ढिगाऱ्यांत ती त्यानी फेकून दिली!

शनिवारीं ज्यावेळीं मी मूर्ति शोधूं लागलें, त्यावेळीं ती मला सांपडली नाहीं. त्यांना विचारण्याची तर सोयच नव्हती. अशा स्थितींत चार दिवस गेल्यावर

आणि मी चिंतेंत असतां, ते एक दिवस अगदीं खुशींत येऊन मला म्हणाले, " आतां मात्र इतःपर तुझ्या धार्मिक बाबतींत मी आडवा अगर उभा येणार नाहीं. माझ्या डोक्याला गेल्या शनिवारपासून भयंकर त्रास होतो आहे. डोकें भयंकर दुखत आहे. "

मी म्हटलें, " तेल चोळूं का ? "

ते म्हणाले, " नको; तुझा मारुति मी बुटाच्या खोलींत फेकून दिलेला आहे; तेवढा तूं काढून नीट ठेवून पूजा अर्चा कर ! मी तुझ्या कधीं भक्तीच्या आड येणार नाहीं ! "

मी म्हटलें, " तुम्ही ती फेकून दिलेली मूर्ति मी काय म्हणून आणीन ? ज्यानें अविचारानें फेकून दिली आहे, त्यानेंच ती जेथल्या तेथें आणून ठेवावी; म्हणजे सर्व कांहीं मानसिक त्रास नष्ट होईल ! "

तेव्हां ते रडकुंडीस येऊन म्हणाले, " त्या फेकून देण्याच्या कृत्यानें माझ्या मनाला इतक्या कांहीं वेदना होत आहेत, त्या काय सांगूं ? तो तुझा मारुति म्हणजे मला नारसिंहच दिसतो आहे. "

त्यानंतर ती मूर्ति त्यानी मुकाट्यानें पूर्वस्थळीं जशीच्या तशी आणून ठेवली, व माझ्या भक्तिआडहि ते येईनासे झाले. दर शनिवारीं तशा धर्मांतरामध्येसुद्धां, रुईच्या फुलांच्या सुंदर लांबलचक माळा, ब्राह्मणांकडून गांवांतील मूर्तिला मी पोंचत्या करीत असे ! चोरटेपणानें मारुतिच्या मंदिरापुढें रस्त्यावर उभें राहून, 'माझ्याकडे कोणी पाहात नाहींना' असें बघून, मी मारुतीस अनेकदां हात जोडून नमस्कार करीत असे. दक्षणा, कापूर, माळा यांची मी अनेकदां मारुतिपुढें लयलूट केली आहे. चातुर्मासांत, हनुमज्जयंतीचे दिवशीं मारुतीस मी ब्राह्मणांकडून महारुद्रहि करवीत असे. ती माझी धार्मिक वृत्ति ख्रिस्तीधर्म स्वीकारल्यानेंहि मुळींच नष्ट झाली नाहीं. उलट त्याच्यावरील माझी श्रद्धा वाढली. अमेरिकेंतहि मी मारुतिउपासना सोडली नाहीं.

अमेरिकेंत पूर्वी असतांना धार्मिक वृत्तीची कसोटी जास्तच होती. अमेरिकेहून हिंदुस्थानांत येऊन, खूप पैसा खर्च करून, चैन करून व परत

अमेरिकेला जाऊन, हिंदुस्थान आणि धर्म यांवर व्याख्यानें झोडणाऱ्या मिशनरी स्त्री-पुरुषांची, तेथें फार चलती आहे; पूर्वीहि ती होतीच.

हिंदुस्थानसंबंधानें फारच दिशाभूल त्यांच्याकडून करण्यांत येई. हिंदी लोक माकडाची पूजा करतात अशी जेव्हा टीका होत असे, तेव्हां माझ्या मारुतिरायाचें योग्य तें बलवर्णन मी तेथें करीत असे. मी तेथें युक्तीने असें सांगत असें, कीं, मारुति ही वायुदेवता आहे. वायु म्हणजेच प्राण आहे. प्राणाला बल वायुशिवाय नाहीं, याकरतां दीर्घायुष्याकरता त्याची उपासना करणें जरूर आहे. मारुति व भीम हीं आमचीं अध्यात्मिक व सांसारिक राष्ट्रीय तेजस्वी दैवतें आहेत. त्यांच्यांत आधुनिक शास्त्र संपूर्ण सामावलेलें आहे.

हिंदुस्थानच्या प्रश्नासंबंधानें कोठें व्याख्यान असलें, कीं, अमेरिकन स्त्री-पुरुषांची नेहमींच अलोट गर्दी लोटे. तशा अलोट जनसमुदायाचा फायदा घेऊन, हिंदुस्थानांतून तिकडे गेलेले मिशनरी इकडचीं वर्णने भडक करून मजेदार रीतीनें सांगत !

मिस मेयोनें जीं वर्णनें दिलीं आहेत, त्यांचा नमुना मी अमेरिकेंत आज ३५ वर्षांपूर्वीच पाहिलेला होता.

"हिंदुस्थान देश म्हणजे सर्पांचा देश, गारुड्याचा देश, व्याघ्र-सिंहांचा देश, अशी तिकडे तेव्हां प्रसिद्धी !" एकादी विनोदी अमेरिकन मिशनरी स्त्री पुढीलप्रमाणें त्या सभेंत आपलें वक्तृत्व गाजवत असे !—

ती सांगे, "हिंदुस्थानांत जिकडे तिकडे सापच साप. जेथें जेथें पाऊल ठेवावें तेथें तेथें साप, नाहींतर विंचू ! म्हणून आम्ही तेथें नेहमीं चौपाईवर चौपायी ठेवून जीवाची आशा सोडून झोंपत होतों ! आणि प्रभु आमचा संरक्षणकर्ता असल्यामुळें तशा स्थितींत त्या विषारी प्राण्यांचा आम्हांस त्रास न होतां, आम्हांला गाढ झोंप लागत असे. त्या सर्पांमध्येंहि अनेक जाती; ब्राह्मण सर्प, क्षत्रिय सर्प, अस्पृश्य सर्प, राक्षस सर्प ! विंचु तर तळहाताएवढे मोठे; आणि त्यांची नांगी ६ इंच कमीत कमी लांब ! हिंदुस्थानांतल्या पुरुषांच्याविषयीं मी कांहीं आज बोलत नाहीं ! पण हिंदुस्थानांतल्या बायकांसंबंधीं मात्र आज मी सत्य तेंच बोलतें !" असें म्हणून ती पुढीलप्रमाणें वर्णन करी !

--" हिंदुस्थानांतल्या सर्व बायका आपल्या अमेरिकन बायकांइतक्याच सुशिक्षित, फॅशनेबल, सुधारलेल्या आहेत! आपल्यासारखीच त्याहि वेषभूषा करतात! तिकडची बी. ए. झालेली बायको असो, किंवा अगदीं अडाणी बायको असो, पोषाख सर्व अमेरिकन!"

अशी प्रस्तावना करून मग अभिनयासह हिंदुस्थानातील लुगडें नेसलेल्या स्त्रीचें चित्र, ती अमेरिकन श्रोत्याच्या पुढें उभें करी!

ती म्हणे, ( १ ) हिंदी स्त्रीनें नेसलेल्या लुगड्याचा, आपल्या डोक्यावर पदर घेतला, कीं, आपल्या इकडल्या स्त्रियांसारखी त्यांची हॅट होते! या हॅट्स तिकडे सर्व हिंदी स्त्रिया सर्रास वापरतात!

( २ ) हिंदी स्त्रियाची हॅडबॅग म्हणजे त्याच नेसलेल्या लुगड्याचा ओटा! त्यांत त्यानीं हात घातला, कीं, ती त्यांची 'हॅडबॅग' तयार होते. त्या त्यांच्या हॅडबॅगमधून पायली पायली जोंधळे मावतात! प्रत्येक १४ किंवा १० जानेवारीला सर्व स्त्रिया त्या हॅडबॅगचा उपयोग करतात! त्या दिवशीं हॅडबॅगचें सर्व कापड नवीन असतें!--कोरें असतें!

( ३ ) आम्हां अमेरिकन बायकांना हँडकरचीफ फार लागतात. तो प्रत्येक हातरुमाल आपल्याला निराळा ठेवावा लागतो; पण हिंदुस्थानांत त्या नेसलेल्या लुगड्याचाच हॅडकरचीफ करतात; तिकडील स्त्रिया नाक पुसायला, तोंड पुसायला जो हॅडकरचीफ वापरतात, तो म्हणजे, त्याच नेसलेल्या लुगड्याचा एक अगर दोन्ही पदर! त्यानें त्या घाण नाक स्वच्छ करतात!

( ४ ) विशेष गोष्ट त्यांच्या डायरीबुकाची! तिकडे सर्व बायका लिहावयाला येणाऱ्या! आपणाला डायरीचें पुस्तक निराळें लागतें; शिवाय लिहावयास फाऊंटनपेन लागतें! पण हिंदुस्थानांतल्या स्त्रियांच्याच काय पण पुरुषांच्याहि डायऱ्या म्हणजे त्यांच्या लुगड्यास किंवा धोतरास मारलेल्या आठवणीच्या गांठी! प्रत्येक गांठ म्हणजे डायरीचें एकेक पान! अशा ३६५ गांठी त्याच्या वस्त्राला असतात; अशी ती त्यांची डायरी!..."

असें तिचें व्याख्यान जेव्हां मी ऐकलें, तेव्हा मला फार चीड आली. मी तशा एका सभेंत धैर्य धरून उठलें. मारुतिचें स्मरण केलें, आणि अस्खलित

इंग्रेजींत सभेस विचारलें, कीं "हिंदुस्थानच्या प्रश्नावर या बाईनें जें वर्णन केलें आहे, त्या बाबत खरी स्थिति सभेपुढें मांडण्याची परवानगी सभा मला देईल काय ?"

होकारार्थी टाळ्यांचा कडकडाट उडाला! सगळीकडून एकच आवाज जोरानें उमटला, "परवानगी अवश्य दिली जाईल! खरी स्थिति आम्हांला कळलीच पाहिजे! आम्ही हिंदी स्त्रीच्या तोंडून खरी स्थिति ऐकण्यास उत्सुक आहोंत!"

त्यावेळीं हिंदुस्थानविरुद्ध मिशनऱ्यांनीं प्रतिपादन केलेलें म्हणणें खोडून टाकणारें, पहिलें अमेरिकेंतील माझें भाषण मी केलें! मी सभेला सर्व गोष्टी विशदपणें पटवून दिल्या. खऱ्या उदार स्त्री-पुरुष अमेरिकनांना माझें भाषण फारच आवडले, व त्यांनीं माझा गौरवहि केला. परंतु हिंदुस्थानांत जाऊन धर्मोपदेश करणाऱ्या दांभिक ख्रिस्ति धर्मोपदेशकांना तें माझें भाषण आवडलें नाहीं! व त्याचा सूड पुढें माझ्यावर उगविण्याची त्यांनीं बाकी ठेवली नाहीं. माझ्या पतिराजानी व इतर धर्ममार्तंडांनीं तेथें माझा छळच मांडला; व हिंदुस्थानांतहि माझा पाठपुरावा केला! त्या सर्व छळास त्रासूनच मी पुनः धर्मांतर करून, एका हिमालयनिवासी ब्राह्मणयोग्याचा शेवटीं आश्रय केला; व मारुतिरायाच्या चरणांसन्निध आलें. त्यासाठीं माझा व माझ्या पतीचा मतभेद होऊन, व अखेरीस कलहात रूपान्तर होऊन, पुनः मी पूर्णपणें हिंदु झालें. ज्यांनीं मला त्या संकटकालीं छळांतून, वनवासांतून, भयंकर आपत्तींतून मुलांच्यासह मुक्त केलें, त्या माझ्या गुरुदेवतेचा वृत्तांत आणि माझी राहिलेली सर्व हकिकत पुढें सांगून हें आत्मवृत्त मी संपवितें! मारुतिरायाच्या कृपेनेंच मला 'सेतू' मिळून मी पुनः हिंदुधर्मांत आलें! तोच माझा मारुतीचा साक्षात्कार! व तेंच माझ्या मारुतिचें सामर्थ्य!

---

## प्रकरण १४ वें



# " जो जाय कुल्लु....ओ, हो जाय उल्लू!! "

( स्वामीजीनीं सांगितलेली हकिकत )

दुसऱ्या खेपेस गुरुशिवाय स्वतंत्रपणें मी नेपाळचा प्रवास केला. त्या प्रदेशांतील दऱ्याखोऱ्या, खडकाळ प्रदेशांतून ओरडत सुटलेल्या आणि आपला मार्ग काढीत चाललेल्या सुंदर पुष्टदेही नद्या, जिकडे तिकडे झिरपणारे रम्य पाझर, याचीं नयनरम्य व हृदयास आल्हाद देणारीं दृश्यें पाहात काटमांडूस पोचलों. तेथील एका संन्याशाची व माझी ओळख असल्यामुळें मला पास काढावा लागला नाहीं. नेपाळ हद्दींतून जाण्यास पास लागत असतो. या खेपेस माझीं संन्याशी पादत्राणें जेथवर मला नेतां येतील तितक्याच अंतरावर जाऊन मंदिराचें मी दर्शन करून घेत असें. नेपाळात सुमारें चार हजार मंदिरें हिंदूंचीं आहेत. शंकर, विष्णु, बुद्ध यांचींच मंदिरें विशेष आहेत. ब्राह्मण व गाय यांवर नेपाळी लोकाची अत्यंत श्रद्धा आहे. गाय ठार मारणें आणि माणसाचा वध करणें हीं दोन्हीं कृत्यें सारखींच क्रूर समजतात. गाय ठार मारणारास तेथें फाशीची शिक्षा आहे. ब्राह्मण आणि स्त्री याना मात्र त्यांच्या गुन्ह्याबद्दल कधीं ठार मारण्यांत येत नाहीं; हिंदुस्थानात मात्र गोवध करणारास कांहींच शिक्षा नाहीं; त्यांचे कत्तलखाने सर्रास चालू आहेत. अमेरिकेंतसुद्धां गोवध कमी आहे. नेपाळांत हिंदुधर्म आणि हिंदुराजा असें असल्यामुळें गाईचें संरक्षण केलें जातें. साधुसंतावरहि नेपाळी लोकांची फार श्रद्धा आहे. नेपाळी लोक फारच शूर आहेत.

नेपाळ व तिबेट यांच्या सरहद्दीवर मी फिरत असतां एकदां जंगली लोकांच्या वस्तींत प्रवेश केला. त्या वस्तींत गवताचे जोडे घालून बर्फ तुडवीत जावें लागत होतें. त्या ३०।४० मैलांमध्यें बर्फ बाराहि महिने पडत असतें. त्या जंगली लोकास नेवारी म्हणून संबोधतात. त्या वस्तीमध्यें मी एका झाडाखालीं

जाऊन बसलों. इतक्यांत कांहीं लोक मजकडे धावत आले; व माझ्यापुढें हात जोडून आणि पायांवर मस्तक ठेवून म्हणाले, "स्वामी नारायण ? येथें आमच्या जातीचा फारच मोठा यज्ञ चाललेला आहे. तर कृपा करून आमच्याकडे भोजनास चला!" मला फार आनंद झाला. कारण दोन दिवसांत पोटांत अन्नच नव्हतें. भोजनाच्या उद्देशानें त्यांच्याबरोबर यज्ञस्थलीं मी गेलों. सभामंडपामध्यें नेपाळी सुंदर लोकरीचा, फूटभर जाडीचा गालीचा अंथरलेला होता. त्यावर मला बसावयास सांगितलें. मी बसलों, आणि सभोंवर दृष्टि टाकली, तों मला एक भयंकर दृश्य दिसलें! प्रचंड यज्ञकुंडाच्या सभोंवार पुष्कळसे बोकड, त्यांचें कातडें सोलून उलटें टांगून ठेवलेले होते! मला मनांतून वाटलें, कीं, हे नेवारी लोक मला काय बोकडाचें मांस खावयास घालतात कीं काय? मी त्यांना विचारलें, "हे इतके बोकड, कातडें सोलून, कशाकरतां टांगून ठेवलेले आहेत?"

त्यांच्यापैकीं एका मुख्यानें अत्यंत श्रद्धेनें आणि नम्रतेनें उत्तर दिलें, "आपके लिये! सब आपके लियेहि है!—आपल्यासाठींच ते बोकड आहेत! सर्व बोकड आपल्यासाठींच केवळ आहेत!!"

मी भ्यालों. मला वाटलें, आता मला मांस खाण्याचा प्रसंग येणार. ती कल्पना येतांच आणि ती अजापुत्रांची अपूर्व मालिका पाहतांच, माझी भूक कोठच्या कोठें पळून गेली; तेथील घाणेरडेपणाचा मला किळस आला; आणि मी जो तेथून एकदम पळत सुटलों, तो मैलभर थांबलोंच नाहीं!

यज्ञमंडपांतून मी पळत निघाल्याबरोबर ते नेवारी लोकहि माझ्या मागें पळत येऊं लागले. अतिथि विन्मुख जाणें म्हणजे यज्ञाला अत्यंत अपशकुन असें त्यांना वाटलें, आणि ते माझ्यामागून येऊं लागले. शेवटीं त्यांनीं मला एका नदीपाशीं गांठलेंच; आणि माझे पाय दोन्ही हातांनीं घट्ट धरून ते नेवारी लोक मला आर्जवानें म्हणाले, "महाराज ? तुम्ही कां पळतां ? इतक्या लांब तुम्हाला परमेश्वरानें पाठविलेलें आहे, तर आपण आमच्या आदरातिथ्याचा स्वीकार करा! त्यावांचून जाऊं नका! आम्ही सर्व लोक, आपले सेवक आहोंत."

त्यांना मी सांगितलें, " मी मांसाहारी ब्राह्मण नाहीं. तेव्हां मी तुमच्याकडे अन्न घेणें शक्य नाहीं ! "

ते म्हणाले, " मांस तुम्हाला नको असेल, तर तूप, गव्हाचें पीठ, साखर यांची आम्ही व्यवस्था करतों. आपण स्वहस्तानें शिरा करा; पण यज्ञाला आपण हजर असलेंच पाहिजे ! "

पोटांत भूक मी म्हणत होती. मी परत फिरलो, आणि निराळ्या जागीं चूल पेटवून शिरा करून त्यावर हात मारला; तसेंच त्याच्या यज्ञास आशीर्वाद देऊन पुढील प्रवास सुरू केला. माझा प्रवास बहुतेक सर्व रात्रीचा असे. मनुष्यवस्तीशीं मी फारच थोडा संबंध ठेवीत असें. नेपाळी लोक बोकडाचें मांस फारच प्रेमानें खातात. तेथील बोकड पांढरेशुभ्र असतात; काळे बोकड तिकडे नाहींत. त्याच्या अंगावरची लोकर एक फूट लांब, म्हणजे आपल्याकडील लोकरीच्या धाग्याच्या लांबीहून वीसपट सुमारे असतें. आपल्याकडील घोड्याच्या उपयोगाप्रमाणें, मालवहातुकीस तिकडे त्या बोकडांचा उपयोग सर्वत्र केला जातो. नेवारीलोकांत दोन जाती असून त्यांचे मांसाहार भिन्न आहेत. एक जात डुकराचें मांसच खाते, तर दुसरी जात त्या मांसास न शिवतां फक्त रेड्याचेंच मांस खाणारी. बोकडाचा फन्ना, दोन्हीं जाती उडवतात ! नेपाळांत पूर्वी सतीची चाल होती; एकदा चितेवर चढलेली स्त्री परत फिरू लागली, तर तिला जळत्या लाकडांनीं ढोसून पुनः चितेंत ढकलण्यांत येई; आतां ती चाल बंद झाली आहे. ' बोकडयज्ञांच्या ' मागें लागून मला देवाची भेट होईल, असें वाटलें नाहीं; म्हणून मी पुढें पुढें जाऊं लागलों.

त्यावेळीं एका निबिड जंगलांत एका सिद्ध महात्म्याचें दर्शन झालें. तो वृद्ध पुरुष सुमारें १५० वर्षांहून अधिक असावा. त्याच्या डोळ्याच्या ज्या पापण्या पुढें पडलेल्या होत्या, त्याच मुळीं चार बोटें लांबीच्या होत्या. तो बर्फांतच निवास करून राहिला होता. बर्फांतलीं कंदमुळें खाऊन राहणारा तो महायोगी होता. त्याला मी नम्रतापूर्वक वंदन करून, नम्रतेनें विचारलें, " महाराज ! मला परमेश्वराचें दर्शन होईल काय ! मला परमेश्वर पाहण्याची फार इच्छा आहे. परमेश्वराचें सगुण दर्शन व्हावें अशी माझ्या जिवाला

अहोरात्र तळमळ लागून राहिलेली आहे. परमेश्वरी दर्शन मला कोणत्या उपायानें होईल, हें जर सांगाल, तर फार बरें होईल."

तो महायोगी उद्गारला "बच्चा ! हृदयांत प्रत्यक्ष परमेश्वर असतांना, दर्शन घेण्यास तूं कुठें भटकत आहेस !"

मी म्हटलें, "तुमची गोष्ट खरी; परंतु हृदयात मला कांहीं दिसत नाहीं."

तेव्हा तो महायोगी पुनः म्हणाला, "प्रत्येक जीवाच्या हृदयांत देवाचा अंश आहे. जें ब्रह्मांडीं, तेंच पिंडीं; आणि जें पिंडीं तेंच ब्रह्मांडीं."

मी त्याना प्रश्न केला "आपलें वय काय ?"

योगीराज उद्गारले, "किती वय आहे, तें काहीं सांगता येणार नाहीं. कारण, माझा बहुतेक वेळ समाधीमध्यें ईश्वरध्यानांत जातो."

मी विचारलें, "समाधिमध्यें काय दिसतें ?"

योग्यानें उत्तर दिलें, "प्रकाश; तेज."

मी पुनः प्रश्न केला, "प्रकाश पाहून, तेज पाहून समाधान होईल काय ?"

योगीराज म्हणाले, "तात्पुरतें होईल !" शेवटीं ते योगीपुरुष बोलले, "बच्चा ! तूं योगसाधन कर. त्याला तूं लायख आहेस. समाधीचा अभ्यास कर. मी सांगतों त्याप्रमाणें परकाया-प्रवेशाचा अभ्यास कर. म्हणजे तुला बरेंच ज्ञान प्राप्त होईल."

मी म्हटलें, "मला ज्ञानाची जरुरी नाहीं. मला तुमच्या वेदांताची जरूरी नाहीं. मला शाब्दिक छलाचा, शाब्दिक समाधानाचा अगदी कंटाळा आलेला आहे. ईश्वर सगुणस्वरूपांत, चर्मचक्षूंना दिसण्याचा काहीं मार्ग आहे काय ? तसा मार्ग असेल तर तो सागा; तो मार्ग मी आचरीन; मग तो कितीहि खडतर कष्टतर, असो."

योगी म्हणाले, "हा मार्ग दाखविण्यास मी असमर्थ आहे. तो ज्याचा त्यानेंच पाहिला पाहिजे. अजून मलाहि सगुण साकार दर्शन झालेलें नाहीं." सगुणदर्शन म्हणजे स्वप्नभ्रम. तो निव्वळ मनाचा एक प्रकारचा काल्पनिक खेळ आहे.

त्या महान योग्याच्याहि सान्निध्यांत मी बराच काल काढला, आणि मनाचें समाधान न झाल्यामुळें पुनः काश्मीरकडे वळलों. खरोखरच काश्मीर देश म्हणजे

स्वर्गाचें नंदनवन यांत कांहींच शंका नाहीं. तेथील अनंत गुलाबाचे बगीचे, अनंत सुंदर रूपवती स्त्रिया, अनंत रम्य निसर्गस्थानें पहात पहात मी बद्रिनारायण रस्त्यानें कुल्लु देशांत प्रवेश केला! साधुलोकात अशी एक सुप्रसिद्ध म्हण आहे, कीं, "जो जाय कुल्लु ...ओ, हो जाय उल्लू!--जो कोणी कुल्लु देशांत प्रवेश करील, तो उल्लू झाल्यावांचून राहणार नाहीं!"

कुल्लू म्हणजे चम्मा पहाड. तो चढण्यास फारच त्रास होतो. गवताचे बूट घालून चढावें लागतें. सर्व रस्ता बर्फांतून. केव्हां केव्हां तेथून चालत असतांना मनुष्य घेरी येऊन पडतो. त्यावेळीं थोडा वेळ आपले डोळे दाबून धरले, म्हणजे आलेली भोवळ नष्ट होते. अशा रीतीनें ३ दिवस मी बर्फांतून प्रवास केला. आपल्याकडे जसे धनगर, तसे तिकडचे पहाडी-ब्राह्मण. हजारों मेंढरांचें कळप बाळगून त्यांच्या आधारावर ते जीवन गुजरीत असतात. तेथें जाणारे बहुतेक साधु, तेथील सुंदर स्त्रियांना पाहून गृहस्थाश्रमी होतात! म्हणूनच वरील म्हण प्रचारांत आलेली आहे. तेथील ते धनगर लोक साधुलोकांना आपले जामात करून घेऊन त्याच्याकडून चापून काम करून घेतात! मेंढरें राखणें हेंच महत्त्वाचें काम. तेथील बायकांचे सौंदर्य खरोखरीच अवर्णनीय आहे. चंद्राची कोर कोठें पहावयाची असेल, तर तेथें! चंद्रमुखी कोठें पहावयाची असेल, तर तेथें! आजच्या मराठी कादंबऱ्यांतलीं लेखकांचीं वर्णनें त्याच्यापुढें फोल आहेत; इतक्या त्या सुंदर. कालिदासानें तशा सुंदर स्त्रिया स्वताच्या डोळ्यांनीं पाहिलेल्या होत्या, म्हणूनच तो त्यांचें तसें वर्णन करूं शकला. त्याच्या वर्णनांत मुळीसुद्धा अतिशयोक्ति नाहीं. कालिदासाच्या स्त्रीवर्णनाला अतिशयोक्ति म्हणणारांची मी कींव करतों. कारण, हिमालयांतील स्त्री-सौंदर्याविषयींचें त्या व्यक्तीचें तें अज्ञान आहे. अप्रतिम फ्रेंच अगर पाश्चात्य देशीय स्त्रियाहि, त्यांच्या सौंदर्याशीं बरोबरी करणार नाहींत; युरोपियन स्त्रियांहूनहि त्या फारच गोऱ्या व देखण्या. त्यांना पाहिल्यानंतर पुरुष उल्लू होणार नाहीं, तर तो पुरुषच नव्हे! **हैमवती**-पार्वती अत्युत्कृष्ट सुंदर स्त्री असली पाहिजे; म्हणूनच ती शंकराला फार आवडली! तेथील मीनाक्षीला, ब्रह्मचाऱ्याला भुलवण्याकरतां अर्धनग्न पोषाख करून पाण्यांत बुडी मारावी लागत नाहीं!

परंतु त्या जर कां जवळ येऊन बसतील, तर मात्र, आपल्याला त्यांच्याजवळ बसवणार नाहीं. त्यांच्या शरीराला मासाची, वाघसिंहांच्या शरीरांच्या वासासारखी घाण आल्यावांचून राहणार नाहीं. ( त्यापेक्षां मग महाराष्ट्रीय सौंदर्यच बरें वाटूं लागतें. ) त्या, बकऱ्यांचें मास आणि दूध खाणाऱ्या; हिमवर्षावामुळें गारठ्यामुळें कित्येक दिवस त्यांच्या शरीराला स्नान नसावयाचें; त्यामुळें त्यांचे रूप तेज:पुंज असलें, तरी सान्निध्य, सहवास गोड नसतो! तशा अप्सरांवर भाळून अनेक ब्रह्मचारी त्यांचे एकाच जन्माचे नव्हे, जन्मानुजन्मांचे दास होऊन पाय चुरीत आहेत! बोलपटातील खरी रूपवती नटी, हिमालयांत आहे. पावडर अगर पीठ फासण्याची तिला तेथें जरूरी नाहीं!

मी तेथील कोणत्याहि त्या धनगर ब्राह्मणाचा जांवई,–'घरजावई' न होतां, पुढें आणखी गंगोत्रीच्या प्रवासास निघालों.

गंगोत्री आणि जम्नोत्री हीं स्थळें घनघोर अरण्यराजींत बघण्यासारखीं आहेत. गंगोत्रीपासून गोमुख म्हणून ठिकाण आहे, तेथें फक्त आषाढ–श्रावण महिन्यांतच जातां येतें. त्याशिवाय इतर वेळीं अतोनात बर्फ असतें; त्यामुळें ती यात्रा फार कठिण आहे. त्या स्थळीं भगीरथराजानें तप केलें होतें असें म्हणतात. तेथें बर्फांत भगीरथराजाची शिळा दाखविण्यांत येते. ज्या ठिकाणाहून गंगा निघते, तेथें करांगुलीएवढीच धार पडत असते. पुढें तिला अनंत नद्या मिळून मोठी गंगा झाली आहे.

बर्फाच्या प्रदेशांतील अनेक घटना मनोरंजक आहेत. मासे बर्फाखालीं लपले जातात, आणि शोधक कुत्रीं, बरोबर मासे असलेली जागा उकरून मालकास शोध लावून देतात तो प्रकार बघण्याजोगा आहे. मासा भला मोठा आणि बर्फाखालीं निदान एक हात तरी खोलीवर तो असतो, त्या माशास, तिकडील कुत्रीं अचूक शोधून काढतात. माशाच्या तेलाचा उपयोग दिवट्यासारखा करतात. बर्फमय प्रदेशांतील लोकांचा इलेक्ट्रिक लाइट म्हणजे माशांचें तेल. त्यांचीं घरें म्हणजे मेंढरांच्या, हिंस्र जनावरांच्या, कातड्यांचे मोठे तंबू! तो तंबू केसासकटच असावयाचा; म्हणजे घर शाकारण्याची त्यांना आवश्यकता नाहीं! वाईट वर्तन करणाऱ्या स्त्रीपुरुषांस त्या वन्य जातींत ठार मारण्यांत येतें त्यामुळें त्यांच्यांत अनीति नाहीं. मात्र सोडचिठी दोघांसहि देता येते.

ज्या स्त्रीला आपला नवरा आवडत नसेल त्या स्त्रीनें रात्रीं नवऱ्याच्या उशाशीं एक सुपारी ठेवून केव्हांहि पळून जावें!-म्हणजे सोडचिठी झाली! तसेंच नवऱ्याला बायको नको असल्यास कांहीं मेंढरें पुढाऱ्याला देऊन सोडचिठी मागता येते. हिंदुधर्मावर त्या लोकांचें फार प्रेम आहे. त्यांना अन्न क्वचितच ठाऊक. मास, दूध, हेच त्यांचे प्रमुख खाद्यपदार्थ. दर आठवड्यास नाचाचा कार्यक्रम सुंदर असतो. इग्रजी लोकाना तो नाच ठाऊक असेल कीं नाहीं कोणास ठाऊक! सर्व वाद्यें कातड्याचीं. तो सर्व नाच बर्फावरच चालतो. नृत्य गायनांत ते कुशल असतात. तसेच बनसळ अथवा पावा फारच उत्कृष्ट वाजवितात. काळजी हा शब्द त्याना ठाऊक नाहीं! द्रव्याची तर त्यांना पर्वाच नाहीं! ईश्वरावर श्रद्धा अपरंपार. धर्मगुरूला मान फार मोठा. ईश्वर आपणाशी बोलतो, आपल्या मार्फत जगाचीं सर्व कामें परमेश्वर करतो, असे ते धर्मगुरु लोकांना सांगून उत्तम बुवाबाजी चालवतात. त्याना दक्षणा म्हणजे रुचकर मांस, लोंकर, कातडीं! त्यांची भाषा आपल्याकडील कोणत्याहि डिक्शनरी-काराला, अगर शब्दकोशकाराला समजणार नाहीं! फक्त गुरुलोक तेवढें क्वचित हिंदुस्थानी बोलतात; कारण त्यांनीं कांहींथोडा जवळपासच्या प्रदेशांत प्रवास करून भाषेचे ज्ञान करून घेतलेलें असतें.

तेथून मी देवाच्या शोधाकरतां अमरनाथच्या यात्रेस गेलो. यात्रेस ५ ते १० हजार समाज लोटतो. प्रति श्रावण महिन्यांत ती यात्रा भरते. चमत्काराची मोठी गोष्ट अशी कीं, त्या श्रावण महिन्याशिवाय इतर वेळीं सर्व प्रदेश बर्फाच्छादित असतो; पण त्याच महिन्यांत आपोआप बर्फ वितळून बर्फाचेंच एक देऊळ, आणि एक महादेवाचें लिंग आपोआप उत्पन्न होतात! तो चमत्कार बघण्याजोगा आहे.

त्या ठिकाणीं लोकाच्या उत्कंठेची दुसरी विशेष गोष्ट म्हणजे अचूक त्या यात्रेच्या कालांत फार दुरून एक कबूतराचा अति सुंदर जोडा त्या देवालया-पाशीं येतो; इतकेंच नव्हे तर तो कबुतराचा जोडा देवापुढची साखर खाऊन जातो! तें अद्भुत दृश्य पाहण्याला भाविकांची समुद्राच्या लाटांसारखी, गर्दी उसळते. दंतकथा इतकी मनोरंजक आहे कीं, तो कबूतरांचा जोडा म्हणजे

शंकर-पार्वतीचाच जोडा ! तो थेट त्या दिवशीं गौरीशंकराहून त्या ठिकाणीं येतो. त्या कबूतराच्या जोड्याचें दर्शन झालें, म्हणजे सर्व पापें नष्ट झालीं, नष्ट होतात, असें फार भाविक लोक समजतात.

अश्रद्धावान लोक त्याची अशी चिकित्सा करतात कीं, " देऊळ आणि लिंग बर्फाचीं बनतात, ही गोष्ट खरी आहे. तो आकार हुबेहुब येतो. पण कबूतराचा जोडा येत नाहीं. पूर्वी कधींकाळीं कदाचित् येत असेल; पण हल्लीं मात्र लबाड पंडे लोक यात्रेकरूंची धर्मश्रद्धा कायम टिकविण्याकरतां आपल्या खिशातून, यात्रेला येतेवेळींच, कबुतराचा जोडा घेऊन येतात, आणि अचूक वेळीं कांहीं ठराविक अंतरावरून तो सोडून देतात." तो जोडा भाविकांना दिसतांच ते धन्य होतात, किंवा मोक्षप्राप्ति झाली असें म्हणतात. कबूतराचा जोडा अचूक सोडणें हेंहि कसब आहे; एवढी गोष्ट खरी, कीं, त्यामुळें लोक आश्चर्यानें स्तंभितच होतात.

त्यानंतर, देवाच्या शोधासाठीं बद्रीकेदार, कैलास, मानससरोवर, आणि बर्फाचा विपुल मर्यादेचा प्रदेश यांचेंहि मी दर्शन घेतलें; पण कोठेंच परमेश्वर-देव मला मिळाला नाहीं; मला दिसला नाहीं !

त्यानंतर माझा जिवंत समाधीचा प्रसंग घडला ! तेंहि वर्णन अपूर्वच वाटेल ! पण, सत्य तेंच मी सांगत आहें. काहीं असलें तरी कुल्लु देश मला फारच आवडला ! मी उल्लू झालों नाहीं, एवढेंच त्यांत खरें तथ्य.

## प्रकरण १५ वें



# माझी जिवंत समाधी

हिमालयांतील माझ्या रात्रीच्या प्रवासांत मला नित्य कांहींतरी नवीन चमत्कार दृष्टीस पडे. त्यावेळीं योगाभ्यास करीत असतां मला चरस पिण्याची अत्यंत आवश्यकता वाटूं लागली. व त्याचेहि मी साधन केलें. चरस ही एक अपूर्व वस्तु आहे. ती वनस्पति कोणाला मानवली, तर हत्तीसारखें सामर्थ्य त्याच्यांत आल्याचा भास मात्र खास होतो ! तो अत्यंत उन्मादकारक आहे. मी जेव्हां जेव्हां त्याचें सेवन करीत असे, त्या त्या वेळीं भीती हा शब्द मला कधीं स्पर्श करीत नसे. चालण्याचे श्रमहि त्यामुळें मला होत नसत. एकाच गोष्टीशीं, ध्येयाशीं मी तद्रुप होत असे.

एका पौर्णिमेच्या दिवशीं चरस पिऊन मी घोर जंगलांतून वाट चालू लागलों. त्या दिवशीं चरसाचा अंमल मजवर फारच झाला होता. बिकट रस्त्याचे ठिकाणीं पायाखालीं नीट न पाहिल्यामुळें मी जो आकस्मात घसरलों. तो सुमारें अर्धामैल खोलीवर गंगेच्या प्रचंड प्रवाहात जाऊन पडलों. मी पडलों खरा, पण पडताना माझ्या काखेंतील चरसाचा तुंबा मात्र त्या बिकट कड्याच्या वाटेवरच पडून राहिला. मी व माझा सोटा असे दोघे पाण्यांत पडलों. वास्तविक पाहतां इतक्या उंचीवरून पडताना माझ्या ठिकऱ्या ठिकऱ्याच व्हावयाच्या. पण माझें नशिब बळकट असल्यामुळें किंवा आयुष्याची दोरी बळकट असल्यामुळें मी नेमका पाण्याच्या डोहात जाऊन पडलों. त्यामुळें कांहींच लागलें नाहीं. मात्र त्यानंतर मी सावधगिरी एवढीच केली, कीं, वहात असतां एका खडकाच्या सुळक्याला घट्ट मिठी मारून धरून बसलों. त्यावेळीं मला प्रल्हादाच्या कडेलोटाची आठवण झाली. ईश्वरावरील दृढश्रद्धेनेंच तो वांचला असेल, असें मला वाटलें. “ ईश्वरावर निष्ठा असणाराना ईश्वर वांचवितो ” असें माझ्या अनुभवास आलें. त्यावेळीं मी परमेश्वराची

पुष्कळच प्रार्थना केली. कोणी म्हणतील, कीं, तूं चरसाकरितां प्रार्थना केली असशील !—तर तसें मुळींच नाहीं. मी पूर्णपणें शुद्धिवर राहून त्याची प्रेमभावानें प्रार्थना केली. पुनः मार्गाला लागण्यास व त्या पाण्यांतून निघण्यास मला चार तास सुमारें लागले. त्यावेळीं भयंकर बर्फ पडत होतें. थंडीचा कडाका पडला होता. थंडीनें मी इतका गारठलों होतों, कीं, पाण्यांतून वांचलों तरी थंडीपुढें प्राणाची आशा धरणें अगदीं खुळेपणाचें होतें. मनात विचार आला कीं, या वेळेस जर मला चरस मिळेल, तर माझी थंडी पार पळून जाईल ! माझा तुंबा कोठें पडला याचें मला भानच नव्हतें. मला वाटलें होतें, तो खास पाण्यांतच माझ्याबरोबर पडला असला पाहिजे; म्हणून मी निराश झालो. आणि आस्ते आस्ते झाडा-झुडपांचा आधार घेत घेत अचूक पूर्वजागेवर येऊन ठेपलों ! समोर पाहतों तो माझा प्रिय तुंबा उताणा होऊन व दुःखाकुल दृष्टीनें माझ्या आगमनाकडे चातकासारखे डोळे लावून पडला होता ! त्यास पहातांच मला अत्यंतच आनंद झाला. लगेच मी चरस चिलमीमध्यें घालून चकमकीनें निखारा तयार करून तो चिलमीवर ठेवून कार्यभाग उरकून घेतला. तें माझें सर्व सामान तुंब्यांतच असे. शेवटीं मी आजुबाजूचीं लाकडें गोळा करून प्रचंड धुमी पेटवली व शरीरांत चांगली भरपूर ऊष्णता आल्यावर, जवळ जवळ उजाडतांना मी पुनः मार्ग चालूं लागलों. तेव्हांपासून रात्रीचा प्रवास हिमालयांतून करणें चांगलें नाहीं, असें मला वाटलें; पण पुढेंहि मी दिवसा प्रवास क्वचितच केला.

चरस पिण्याचा माझा एकदा कसा कडेलोट झाला, तें मी येथें सांगतों ! उत्तरकाशीच्या घोर अरण्यांतील तो माझा रम्य प्रसंग आहे ! परमेश्वराच्या भेटीची एकदा अत्यंत निराशा झाली. त्या दारुण निराशेमुळें मी जीवनाचा शेवट करण्याचें ठरविलें. आणि त्यासाठीं सुमारें ४० तोळे चरस घेऊन गंगेच्या कांठावर मी त्याचें अनुष्ठानच सुरूं केलें. जी जी गोष्ट स्वीकारावयाची ती चांगली असो अगर वाईट असो तिचा शेवट लावावयाचा आणि त्या गोष्टीच्या मोहपाशांतून मन मुक्त करून घ्यावयाचें अशी माझी प्रतिज्ञाच होती;

म्हणून मी चरसाचें अनुष्ठान चालविलें होतें. त्यावेळीं अहोरात्र ३ दिवसपर्यंत मी चरस पीत राहिलों. अन्न नाहीं, पाणी नाहीं. चरस मी एकटाच पीत असे. मला कोणीहि साथी नसे. मला कोणत्याहि कामास साथी आवडत नसे. चरसाचा अतिरेक झाल्यावर शरीरात ऊष्णता भयंकर भडकली; आणि मी तो पीत असतांनाच माझा प्राणवायु पोटांतून फिरून माझ्या मस्तकांत अखेरीस तो प्रविष्ट झाला. किती ती भयंकर गोष्ट होती. मी तर जगाला असेंच सांगेन कीं, असलीं भयंकर अनुष्ठानें कधीं कोणी करूं नयेत, अगर त्या मार्गानें कोणीहि जाऊं नये. डोक्यांत वायु प्रविष्ट झाल्यामुळें मी फार थोड्या वेळांत अगदीं मृतवत् झालों.

बऱ्याच वेळानें आजुबाजूच्या मठांतून आणि अन्नछत्रांतून बातमी पसरली, कीं, कोणी एक सन्याशी साधु, जंगलात, बसल्या ठिकाणींच मृत झालेला आहे. त्यावेळीं आत्मप्रकाश म्हणून एक माझे जिवलग मित्र होते. सन्याशाच्या मृत्यूची बातमी ऐकतांच तो माझा मित्र आपल्याबरोबर १०।२० सन्याशी घेऊन, 'जंगलात कोण साधु मेला आहे', हें पाहण्याकरता म्हणून माझ्याजवळ आला! मला पाहतांच आत्मप्रकाशानें ओळखलें, कीं, हे साधु म्हणजे आपले परम मित्र केशवानंद सरस्वतीच आहेत. तेव्हां तो विचार करूं लागला, कीं, 'हा माझा मित्र कशानें बरें मृत झाला असावा?' सर्व साधुलोकांनीं ठरविलें कीं, केशवानंद सरस्वती जे मेले, ते चरस पिऊनच मेले असावेत. कोणी म्हणाले, "सर्पदंशानें त्यांचा मृत्यु झाला असावा." शेवटीं आत्मप्रकाशानें ताबडतोब बॅंड वगैरे बोलावून संन्याशाची योग्य अशी व्यवस्था करून, माझ्यावर फुलांच्या शेंकडो माळा घालून, माझ्या गळयांत चांगला ४ मणाचा भला मोठा एक दगड बांधला; आणि माझें प्रेत गंगेंत लोटून देण्याचें ठरलें! भंडारा वगैरेहि सुरू झाला. जमलेले साधुलोक भरपूर गांजाहि पिऊं लागले; आणि मला गंगेंत सोडण्याच्या बॅंडच्या सूचक स्वराच्या आवाजानें तें सर्व अरण्य दुमदुमून गेलें! इतक्यांत एक वृद्ध साधु माझ्याकडे सूक्ष्म दृष्टिनें पहात सर्व मंडळींना उद्देशून म्हणाला "मला फारच मोठी शंका आहे. केशवानंद हा चरस पिऊन मरणार नाहीं; त्यानें कदाचित् अनुष्ठान

करून समाधि लाविलेली असेल! त्यासंबंधानें आधीं खात्री करून घ्या, आणि मग त्यास गंगेंत लोटून समाधि द्या!" तो वृद्ध साधु एक प्रसिद्ध डॉक्टर होता. त्यानें माझें प्रेत नीट तपासलें; आणि तो निर्णयात्मक बुद्धिनें म्हणाला "याचें सर्व शरीर जरी थंड झालेलें आहे, तरी याचा प्राणवायु मस्तकांत निश्चयानेंच आहे; केशवानंद मुळींच मेलेला नाहीं. डोकें अद्याप तप्त आहे. तरी यास गंगेंत लोटूं नका. अजून कांहीं दिवस वाट पाहून नंतर बुडवा!" त्या डॉक्टरचें म्हणणें आत्मप्रकाशासहि खरें वाटले; कारण, आत्मप्रकाश माझ्या योगसामर्थ्याची शक्ति जाणत होता. त्या डॉक्टर साधुनेंहि पुनः पुष्कळ विचार करून माझ्यावर कांहीं तात्काळ उपचार सुरू केले. तो व इतर सर्व साधु, गंगेच्या पाण्याच्या थंडगार घागरी भरून आणून माझ्या डोक्यावर ओतूं लागले. हत्तीच्या सोंडेसारखी पाण्याची मुसळधार माझ्या मस्तकावर सुरू झाली. सुमारें पाचशें घागरी पाणी ओतल्यावर माझ्या तोंडातून ॐ चा ध्वनि बाहेर पडला.

मी शुद्धिवर येऊन डोळे उघडून पाहिलें, तो माझ्याभोंवतीं साधुलोकांची प्रचंड गर्दी जमलेली. मला त्या प्रकाराचें फार आश्चर्य वाटलें. मी त्यांना विचारलें, "तुम्ही सर्व कां जमलां आहांत?" तेव्हा आत्मप्रकाशानें सारी हकीकत सांगितली. बॅंडच्या २५ रुपयांच्या खर्चाचा भुर्दंड मात्र आत्मप्रकाशास निष्कारण भरावा लागला. पण त्यांत त्यास एवढाच आनंद झाला कीं, मी पुनः जिवंत झालों. त्यानंतर त्यानें आपल्या मठांत मला कायमपणें राहता येईल अशी तजवीजहि केली. परंतु पुढें मी त्याचा आश्रय फारच थोडा घेतला. ईश्वरी शोधाचें मला वेडच लागलेलें होतें. ज्या ज्या मार्गानें त्याचा शोध लागेल ते ते सर्व मार्ग अवलंबावयाचे, असें मी ठरविलेलें होतें. त्याकरतां मी एकदा नग्न संन्याशांचें महंतपदहि प्राप्त करून घेऊन, त्या पंथाचाहि कसा विचित्र अनुभव घेतला, तें पुढील प्रकरणांत सांगेन! स्त्री-पुरुषांच्या नग्नतेच्या तत्त्वाचें, नग्न वसाहतीचें वेड, हिंदुस्थानात पाश्चात्य देशांतून सध्यां येऊं पाहात आहे; परंतु नग्नतेचें व्रत आणि नग्न-संप्रदाय हिंदुस्थानांत फार प्राचीन कालापासूनच आहे. तें तत्त्व हिंदुस्थानांत नवीन नाहीं!

## प्रकरण १६ वें

# संन्याशाची लग्नाची उठाठेव !

दांभिक बुवाबाजीचा मला अगदीं कंटाळा आला होता. परमेश्वरप्राप्ति तर होतच नव्हती. परमेश्वर प्राप्त करून घ्यावयाचा असा तर मी हट्ट धरला होता. संन्याशी आणि बैरागी या दोघांची अत्यंत वाकडीक असते. साधु, महंत, संन्याशी, बैरागी, आणि गुरुमहाराज किंवा बुवा यांच्यामध्येंहि परस्परामध्यें वांकडेपणा राहावा, ही गोष्ट मला फार आश्चर्याची वाटली ! परमेश्वरप्राप्तीचें ध्येय डोळयांपुढें ठेवावयाचें किंवा जगाला तसें सांगावयाचें, आणि वागतांना मात्र अस्सल कामांधाहून, अस्सल लोभ्याहून, एकाद्या अस्सल संसारी मनुष्याहून अधिक त्यांनीं वागावयाचें, याचा मेळच मला घालतां येईना ! परमेश्वराबद्दलची खरी उत्कंठा त्यांच्यामध्यें फारच थोडी अनुभवास येते. प्रत्येक पंथाचा मी परिपूर्ण अनुभव आयुष्यांत घेतला, आणि त्या प्रत्येक पंथापासून माझें मन विटलें. त्यांच्याकडून देवप्राप्ति करून घेण्यापेक्षां तो देव न मिळालेला बरा, असेंहि वारंवार मनाला वाटत असे. गिरिपुरी भारती संन्याशी बैरागी नागाजी या सर्व पंथांतून जाऊन मी हें माझें चरित्र लिहीत आहें. "वर वर पहावें तो देखावा खूपच ! पण अंतरांतली खूण राम जाणे !" ह्याच अनुभव मला अधिक आला. त्या प्रत्येक पंथांतील व्यक्तींचीं आचरणें अत्यंत खोटीं आणि अशुद्ध.

सगळयांत विशेष गोष्ट "नग्न संन्याशांची." त्या पंथाविषयीं मला फारच कौतूहल वाटत होतें. म्हणून मी त्याहि पंथांत शिरलों. सर्वांगाला रगडून भस्म फासावयाचें आणि वस्त्राच्या एका सुताच्या तुकड्याला सुद्धा जन्मांत स्पर्श करावयाचा नाहीं, अशी त्या पंथांतील व्यक्तींची भीष्मप्रतिज्ञा असते. अशा ८ हजार नंग्या संन्याशांचें मी एकवेळ महंतपद प्राप्त करून घेतलें होतें. तो खुसांत अद्भुतच ! तें महंतपद मला माझ्या गांजानें प्राप्त करून दिलें.

गांजाची जी मी अपूर्व तपश्चर्या केली होती, त्याचे फळ म्हणजे ते महंतपद. एक अगडबंब मोठी चिलीम असते. तींत कमीत कमी १० तोळे चरस राहावा लागतो. महंतपदाच्या निवडणुकीच्या वेळीं ती प्रचंड चिलीम मनुष्याला सहज पितां येईल अशी, पण उंच एका वडाच्या झाडाला, टांगण्यात येते; व ती ओढावयाची असते. ती पिण्याविषयीं साधुलोकांत शर्यत लावली जाते. खालीं पडून तोंडानें ती चिलीम इतकी जोरानें ओढून दाखवावयाची, कीं, त्या चिलमींतून ज्वाळा निघाली पाहिजे. व ती पहिल्या दमांतच निघाली पाहिजे; तरच महंतपद मिळावयाचें ! 'नाग्या संन्याशांची' चिलीम ओढणारे, साधी तंबाखूची चिलीम ओढणारे, चिरूट तोंडांत धरून तो पुष्कळ वेळ ओढणारे, उंची किंवा साधी सिगारेट ओढणारे आणि केवळ विड्या फुंकणारे, यांच्या त्या ओढण्याचें जर कोणी प्रदर्शन भरवील किंवा त्यांचा इतिहास लिहील, तर तो फार मनोरंजक, उद्बोधक, आणि राष्ट्राचा नाश त्या व्यसनानें कसकसा होत आहे, याचें अपूर्व चित्र समाजाला दिसेल ! सगळ्यांचा हेतू 'ओढणें' हा एकच; ओढणें आणि धूर काढणें ! व त्याची मीमांसा करणें ! केवळ धूम्रवलयेंच तीं ! मी त्या सर्व प्रकारांस व्यसनच म्हणतों ! असो.

ज्या वेळीं पहिला महत आपल्या पुढील महंताची नेमणूक करतो, त्या वेळीं तशा प्रकारची परीक्षा घेतली जाते. पहिला महंत जिवंत असतांनाच ही निवडणूक व्हावयाची असते. माझ्यावेळीं तें चिलमीचें दिव्य मांडून पहिल्या महंतानें सर्व नग्या संन्याशांना आव्हान दिलें ! त्यावेळीं नेहमींच २५।३० हजारापर्यंत 'नागा' संन्याशी जमतो.

त्यावेळीं मुख्य महंत त्या २५ हजार नागा संन्याशांना म्हणाला "ज्याची हिंमत असेल त्यानें ही चिलीम पिण्यास उठावें आणि महंतपद मिळवावें." खरोखरीच तें वीराचें काम होतें; सहज सोपें, सुसाध्य काम नव्हतें. शेवटीं कोणत्याहि पंथांतील एकहि संन्याशी उठेना. तेव्हां माझ्याजवळ बसलेल्या एका साधूनें मला आग्रह केला; तो मला म्हणाला, "तूं महान योगी आहेस. हिमालयांत खूप फिरला आहेस. पक्का गंजड्या आहेस; आणि

ब्रह्मचारी, शक्तिमान आहेस; तर तूं ऊठ, आणि ही चिलीम चेतवून महंतपद घे !–तुझ्या सामर्थ्याला हें आवाहन आहे!"

मी मनांत विचार केला, 'चिलीम चेतली तर बरें; नाहींतर, धनुष्य मोडावयाला उठणाऱ्या रावणासारखी, या २५ हजार संन्याशांत माझी आज फटफजिती व्हावयाची; चांगलाच हंशा व्हावयाचा! एवढ्या मोठ्या अतिरथीं- मधून कोणी जर उठत नाहीं, तर आपण तरी ती पेटवूं किंवा कसें?' त्यावेळीं मी मनाशीं पुष्कळच विचार केला. पण कांहींच निश्चय होईना !

महंतानें सर्व समाजाला पुनः प्रश्न केला, "कोणीच संन्याशी या दिव्यास उठत नाहीं काय?"

त्या वेळीं मी उत्सुकतेनें उठलो! हातातील चिमटा फेकून दिला ! आणि झाडाखालीं जाऊन झोपून, त्या प्रचंड रावण–चिलमीस मी तोंड लावलें! त्यावेळीं मी माझें योगसामर्थ्य त्यासाठीं खर्च केलें; आणि असा दीर्घ, प्रचंड श्वास खेचला, कीं, त्या श्वासास अजगराच्या श्वासाचीच उपमा द्यावी लागेल! त्या माझ्या श्वासाबरोबर त्या चिलमींतून एवढी प्रचंड ज्वाळा निघाली, कीं ती ज्वाळा त्या चिलमीच्यावर ५ फूटपर्यंत वर उडाली! त्या बरोबर माझ्या नावाचा प्रचंड जयघोष झाला! आणि सर्व नागा संन्याशांनीं केशवानंदासच महंत करावें, अशी मुख्य महंतास अनुमती दिली. मुख्य महंत तर फारच खूष झाला; कारण त्यावेळपर्यंतच्या सर्व चिलीम–बहाद्दरांचें झालेले रेकॉर्ड मी पार मोडलें होतें.

मुख्य महंत हर्षानें उठला; त्यानें महंतगिरीची माळा माझ्या गळ्यांत तत्क्षणीं घातली! जरीची कफनी, जरीचा लंगोटा व इतर जरीचाच सर्व शृंगारसाज त्यानें माझ्यावर चढविला. वस्त्राचा स्पर्श फक्त तेव्हांच काय तो एकदां महंतास होत असतो. त्यानंतर माझी पालखींतून प्रचंड मिरवणूक काढली. त्या नागा संन्याशांना उत्पन्नाच्या मोठमोठ्या जमिनी असून, मठ पालखी मानपान या सर्व गोष्टी असतात. त्यांचें एक संस्थानच असतें. आठ हजार नागा संन्याशांना एका वेळेला पुरेल इतक्या अन्नाची नित्याची तरतूद त्यांच्या मठांत असते, या हिशोबावरून त्यांच्या संपत्तीची कल्पना येईल. ४० गांवांची

मालकी त्या पंथास आहे. शिवाय अन्य नेमणुका आहेतच. त्या नग्न संन्याशांची ती प्रचंड पलटण, नव्हे तें नग्न सैन्यच दर तीन वर्षांनीं एकदा क्रमानें प्रयाग, नाशिक, हरिद्वार, उज्जैनी या ठिकाणीं फेरी करतें. नग्न राहण्यानेंच परमेश्वर मिळेल अशी प्रत्येक नंग्या संन्याशाची समजूत असते. आजकालचे समाजस्वास्थ्यवाले नग्न स्त्री-पुरुषांच्या ज्या प्रचंड वसाहती व्हाव्यात म्हणून पाश्चात्य देशात व हळूहळू आपल्याकडे धडपडत आहेत, त्या सज्जनांचा हेतू समाजस्वास्थ्यापेक्षां परमेश्वराची प्राप्ति करून घेण्याचाच खास असला पाहिजे ! 'नग्न-पंथ आम्हीच प्रथम सुरू केला' अशी हाकाटी सुधारकांनीं मारण्याचें कांहींच कारण नाहीं; ते जेव्हा जन्मले नव्हते तेव्हांपासून हिंदुस्थानांत नग्न साधूंचा संप्रदाय आहे. आणि त्यांना भिऊनच परमेश्वर कोठे जाऊन दडून बसलेला आहे, असें मला वाटलें ! 'नग्नत्वानें सुख मिळेल, नग्नत्वानें परमेश्वर मिळेल, नग्नत्वानें आपण निसर्गाकडे जाऊं,' अशीं ब्रीदवाक्यें घोषित करणें म्हणजे केवळ जगाची फसवणूक करणें आहे. तो एक प्रकारचा अहंकार आहे; अहंकाराचा तो एक प्रकारचा रोगच समाजाला जडत आहे, एवढाच त्याचा अर्थ. इंद्रियदमन हा त्यांतील मुख्य हेतू; पण त्याकडे कोणाचेंच लक्ष नसतें; सर्वांचेंच दुर्लक्ष ! त्या पंथांत गेल्यावर इंद्रियाच्या शिरा तोडून टाकून बडवलेल्या बैलाप्रमाणें मनुष्याची स्थिति करतात; वीर्यप्रवाह किंवा पौरुष याचा प्रवाहच त्यामुळें आयुष्यभर बंद पडतो. परंतु त्या व्यक्तिच्या मनांतील, अगर मनाची वासना थोडीहि नष्ट होऊं शकत नाहीं. प्रजोत्पत्ति करणाऱ्या त्या शिरा तोडण्यात येतात. अंतर्यामांत विकारांचे काल्पनिक होमकुंड पेटलेलें असतेंच. फक्त एकच महत्त्वाची बाब, त्या नंग्या सन्याशांत स्त्रियांचा अंतर्भाव कधींच नसतो. 'सुधारक नग्नपंथाला' आपल्याबरोर स्त्रियाहि पाहिजे आहेत, एवढाच त्यात फरक ! आणि कांहीं कालानें सुधारलेल्या फॅशनेबल हिंदी स्त्रियाहि, लज्जारक्षणापुरतेंच स्त्रियांच्या अंगावर केवळ वस्त्र असावें असा हट्ट धरणाऱ्या, त्या पंथांत सामील झाल्यावांचून राहणार नाहींत ! ते सर्व नंगे संन्याशी रोज मालपुव्याचे डोंगराएवढे ढीगच्या ढीग फस्त

करून टाकत असतात. त्या पंथांत राहून, त्या पंथाचें महंतपद मिळवूनहि मला परमेश्वराची भेट झाली नाहीं. किंवा तो भेटण्याची आशाहि उत्पन्न झाली नाहीं. म्हणून मी त्याहि पंथाचा त्याग केला; आणि हरिद्वारास येऊन सरळ ब्राह्मण झालों. परंतु ब्राह्मण होण्याने माझ्यावर अधिकच आपत्ति ओढवली. संन्याशाना ब्राह्मणाचा द्वेष! 'त्यांच्या' अन्नछत्रांत ब्राह्मणाला अन्नाची भिक्षा नाहीं! अशा एका अन्नछत्रात मी गेलों असतां मला खरमरीत उत्तर देण्यात आलें, "येथे फक्त संन्याशासच जेवण मिळतें; ब्राह्मणाची सोय येथें नाहीं!" मी म्हटलें ठीक. तसा विचार करून पुनः मी दोन पैशाचा गेरू आणून आपलीं वस्त्रें भगवीं करून संन्याशाचे सोंग घेऊन त्याच छत्रांत पुनः जेव्हा गेलों, तेव्हां पोटावर हात फिरवून छाटींतून अन्न नेण्यापर्यंत, मोकळीक मिळाली! एकंदरीत अंतर्यामापेक्षां बाह्यदेखाव्याचेंच जगांत अत्यंत महत्व. संन्याशी म्हणावयाचें आणि सर्व इंद्रियें इतकीं सैल सोडावयाचीं कीं, त्यांना सीमा नाहीं. सर्व संन्याशाची जिव्हा रोज शिरापुरी, मालपुवा, लाडु, कचोरी, 'तस्मैखीर' खाण्यासाठीं कुत्र्यासारखी हपापलेली! अन्न हाच त्यांचा परमेश्वर! खाण्याची चिंता नसल्यामुळें संन्याशांचा, बैराग्याचा, साधूंचा, गुरुमहाराजांचा पंथ हिंदुस्थानांत उत्कर्षस्थितींत आहे! गोड गोड पंचपक्वानें खाल्ल्यावर, तूपदूध, शिरापुरी, अत्तरें आणि माळा यांचा उपभोग घेतल्यावर कोणता साधु, योगी, महाराज इंद्रियदमन करूं शकतो, याचाच मी अद्याप शोध करीत आहें! असा साधु, बुवा, बैरागी, महाराज मला अवश्य पहावयाचा आहे! मी सर्व संन्याशाना आणि त्या ढोंगी साधुमहाराजांना 'बोकड संन्याशी' 'बोकड महाराज' असेंच नाव देतों. पंचपक्वानें, मादक पदार्थांचें सेवन, यांच्या तडाक्यांत मोठमोठे सुशिक्षितहि भोळेपणानें सांपडलेले व संन्याशी झालेले मी पाहिले आहेत. ते पंथांत शिरतांना जरी बी. ए. एम्. ए. असले तरी, अन्नदोषानें, संस्कार दोषानें त्याना 'डी' हें अक्षर शेवटीं त्या डिग्रीपुढें आपोआप लागतें! धर्माच्या नांवाखालीं आयतखाऊंची संख्या भरमसाट वाढत आहे. अन्नछत्रांचा, मठांचा उद्देश खऱ्या साधूंचें भरण पोषण सहजरीतीनें होऊन त्यांच्या तपश्चर्येंत कोणतेंहि विघ्न येऊं नये, असाच होता. त्या संन्यासी

संप्रदायांत आतां कोणता मनुष्य कशा प्रकारचा आहे हें ओळखून काढणें फार अवघड काम झालें आहे. पुष्कळ चोर चोरी करून, पुष्कळ खुनी खून करून, पुष्कळ लोक लोकांच्या बायका उठवून, संन्याशाचा वेष पत्करून बोकडसंन्यासी झालेले आहेत ! किर्लोस्करादि मासिकांतून लेखकांच्या स्वानुभवाच्या अभावीं, ज्या गोष्टी यावयाच्या राहिल्या आहेत, त्या--मी येथे नमूद करीत आहें ! ही झाली पुरुष संन्याशांची स्थिति. अल्प वयात स्त्रियांना केवढें वैराग्य प्राप्त होतें, याचें दृश्य हिंदी स्त्रियाना तेथेंच पहावयास मिळेल !

पुरुषांप्रमाणें शेकडों बायकाहि त्या पवित्र क्षेत्रात जन्माच्या जोगिणी होऊन बसल्या आहेत ! त्यांना 'माईजी !' ही पदवी आहे ! स्वामीजींना शिरापुरीचें जेवण मिळतें, तर माईजींना रोज शिधासामग्री मिळते; पण दोघांचाहि चरितार्थ व्यवस्थित चालतो! अशा स्थितींत पवित्र स्थलींच अनाचाराचा कळस मांडला गेला असेल यांत नवल नाहीं ! ऋषिकेषमध्यें तर १६ वर्षांपासून ७५ वर्षांपर्यंतच्या तरुण आणि वृद्ध दोन हजार माईजी मी पाहिल्या. त्यांतील शेकडा ९९ संन्याशांच्या शिष्या असतात. सकाळीं गंगेमध्यें स्नान करणें, दुपारीं बारा वाजता शिरापुरीवर ताव मारणें, संध्याकाळीं गंगातीरावर 'सीताराम सीताराम' भजन करून मिळालेल्या दक्षिणेंत गाजा चरस इत्यादि मादक पदार्थ आणून सेवन करणें, आणि रात्र आली म्हणजे माईजींच्या मठांत पळून जाऊन आणि तेथेंच झोप काढून पुनः पहाटे गंगेंत 'हर हर गंगे !' म्हणून पाप धुवून टाकणें, हा हजारो संन्याशांचा दैनंदिन कार्यक्रम अव्याहत चालू आहे. बाहेर तोंडांत ईश्वराचें नांव आणि हृदयांत जोगिणीविषयीचें प्रेम, हेंच सर्व साधुत्व ! त्या पवित्र ठिकाणीं साधु म्हणणारे लोक, द्रव्याला 'विस्तव' समजणारे संन्याशी आणि मठाधिपति, आज राजांहून अधिक मजेंत आहेत. मला एका गोष्टीची तर तेव्हां अत्यंतच चीड आली. ती गोष्ट अशी कीं, अनेक जातीच्या स्त्रिया गंगेमध्यें नग्नतेनें नित्य स्नान करीत असतात; 'आणि कामिनींचा त्याग केला आहे, कामिनीचा त्याग करा !' म्हणून उपदेश करणारे 'बोकड संन्याशी' पुलावर बसून हळूच चोरट्या नजरेनें काकनजरेनें, त्या नग्न स्त्रियांकडे नीचपणें पहात असतात ! तेंच त्यांचें योगसाधन; तीच त्यांची गंगेवरची तपश्चर्या !

त्या गोष्टीच्या योगानें मला इतकी चीड आली कीं, 'यापेक्षां आपण संसारी झालेलें काय वाईट असें वाटलें! दांभिकपणें जगाला फसवणें म्हणजे स्वतांलाच फसवणें आहे. मग यांत काय लाभ? परमेश्वर तर कांहीं आपल्याला भेटत नाहीं!' पण एकदा संन्याशी म्हणून माझें नांव गाजल्यावर, एकदा मी कानफाट्या म्हणून समाजाच्या दृष्टिनें ठरल्यावर, त्या भूमिकेंतून संसारी पुरुषाच्या भूमिकेंत येणें म्हणजे एक भयंकर दिव्य होतें. पण तें दिव्य करण्याचें मी ठरविलें; आणि त्याच्या सिद्धतेस मी लागलों. पण संन्याशाचें लग्न होणार कसें? मी मनास म्हटलें, "प्रयत्न कर! तूं गृहस्थाश्रमांत योग्य रीतीनें राहूं शकशील. तेव्हां मला पुनः लग्नाकरतां, शेंडीपासून सर्व तयारी पुनः करावी लागली. व त्या कामीं माझे प्रियतम मित्र स्वामी श्रद्धानंद यांनींहि मला आशीर्वाद दिला; आणि मी ब्रह्मचाऱ्याचा संन्याशी, आणि संन्याशाचा पुनः संसारी, असा आश्रमपालट केला. माझें लग्न नशिबानें कसें झालें, तें मी पुढें सांगेन! अशा रीतीनें वैराग्य पावून देवाचा शोध करतां करता, बायको शोधूं लागलों! मी मनाशीं म्हटलें, "श्रीज्ञानेश्वरांचा पिताहि पुनः संसारी झालेला होता!"



## प्रकरण १७ वें



# " बंडीवाले साहेबांचा फर्स्टक्लासमधून प्रवास ! "

सत्य परमेश्वर मिळविण्याकरतां मी बहुत प्रयत्न केला. जर कोणाला अजून परमेश्वर मिळालेला असेल, तर तो त्यानें मला अवश्य दाखवावा; मी पाहाण्यास तयार आहें. त्यासाठीं त्या वेळपर्यंत मी बहुत अनुष्ठानें केलीं; केवळ बेलफळांवर मी कित्येक महिने काढले. पंचाग्नी पेटवून कैक दिवस मी गायत्रीमंत्राचा जप केला; पण माझें कशानेंहि समाधान झालें नाहीं. जीं माणसे परमेश्वर आपण पाहिला असें स्वतः म्हणतात तीं त्यांचीं केवळ शाब्दिक कोडीं आहेत; शाब्दिक कसरती आहेत. त्या परमेश्वराच्या बाबतींत स्थूल दृष्टिस, चर्म-चक्षूंस ' हा सूर्य हा जयद्रथ ' या नात्याने परमेश्वर दाखविणारा मला कोणीहि भेटला नाहीं. जर कोणी असा मांत्रिक, तांत्रिक, योगी, महंत, बुवा, शंकराचार्य, गुरुमहाराज, स्वतःचें सामर्थ्य दाखविण्यास तयार असेल, व त्याला दिसणारा परमेश्वर तो दुसऱ्याला दाखवूं शकत असेल, तर त्याच्या चरणकमलांचा मी अजूनहि दास होईन ! ती एक उत्कृष्ट सोनेरी टोळी आहे, एवढाच त्याचा अर्थ. असो.

जोपर्यंत मी मनुष्यवस्तींत राहात नसे, तोपर्यंत माझ्यावर कामदेवाचें सामर्थ्य मुळींसुद्धां चाललें नाहीं. परंतु वस्तींत येऊन राहू लागल्यावर हळूहळू तो चमत्कार मजवरहि घडूं लागला. पूर्वी सांगितल्याप्रमाणें मी मनांत निश्चय केला, कीं, लग्न करूनच आपण ईश्वरप्राप्तिचा मार्ग साधावा. ब्रह्मचारी रामदासानींहि ' प्रपंच करावा नेटका ' असा उपदेश केला नसता. मात्र मनाला एवढेंच वाटलें, कीं, आपल्या मतांस जुळणारी, ईश्वर-भजनपूजन करण्याची आवड असलेली, उत्तम कंठाची स्त्री जर मिळाली, तर तिच्याशी लग्न करून तिच्यासह तपाकरतां आपण पुनः हिमालयावरच यावयाचें. बायकोशिवाय पुरुषाला तप करतां येणार नाहीं, आणि ती त्याची लग्नाचीच बायको पाहिजे. असा माझा

पूर्ण सिद्धान्त ठरल्यावर पंजाबमध्यें मी माझ्या एका धनाढ्य भक्ताकडे गेलों; आणि त्याला माझ्या मनांत जें होतें तें सर्व स्पष्ट सांगितलें. त्यानें मला तावडतोब ५०० रुपयांचें बहुविध लग्नाचें सामान आणि रोख पांचशे रुपये देऊन व चरणांवर मस्तक ठेवून तो म्हणाला, "गुरुमहाराज, तुम्हींच मला योग्य मार्गाला लावलें आहे. तेव्हां तुम्ही मनांत योजलेलें कार्य अवश्य करा; ही मी फुलाची पाकळी आपल्या कार्यसिद्धर्थ्य आपल्या चरणांवर वाहिलेली आहे. आपण अवश्य घरीं जा, आणि आनंदानें लग्न करा." माझ्या अंतःकरणाचाहि जो अखेरचा आदेश मी घेतला, त्यानेंहि मला असाच हुकूम फर्मावला, कीं, "वासनेचा क्षय केल्यावांचून तप करूं नको. लग्न कर, गृहस्थाश्रम हाच परमेश्वरप्राप्तीचा खरा राजमार्ग आहे. त्या राजमार्गानें तू जा."

माझ्या त्या शिष्यानें वरीलप्रमाणें सहाय्य तर केलेंच, पण मला लाहोरपासून थेट मुंबईपर्यंत फर्स्टक्लासचें तिकीट काढून देऊन माझी आदरानें व थाटानें रवानगी केली.

त्या वेळची आमची मूर्ति कोणाच्या स्मरणांतून जाणें शक्यच नाहीं! अंगांत जी भगवी बंडी होती, त्या बंडीला कमीत कमी २५ ठिकाणीं भलीं मोठीं छिद्रें होतीं. टाकेहि तितकेच मारलेले होते. ती माझी बंडी फार पुरातन होती! नेसण्यास लंगोटी, हातांत मुसळासारखा एक दंडा; असा आमचा अवतार होता!

फर्स्टक्लासमध्यें आमच्यासारखें वरील पोषाखांतील ध्यान पाहिल्यावर, प्रत्येक स्टेशनवर रेल्वेच्या नौकराना व इतर लोकांनाहि शंका येऊं लागली! हा कोणी चोर, खुनी, दरोडेखोर तर नसेल, अशीहि शंका त्यांच्या मनास शिवल्यावांचून राहिली नाहीं! परतु शंभर रुपयांचें तिकीट पाहिल्यावर मला कांहीं विचारण्याची कोणाची छाती झाली नाहीं. प्रत्येकजण माझ्याकडे साशंकतेनें पाही आणि पुढें निघून जाई!

मनांत असें आलें कीं, वाटेंत जबलपुरास उतरावें, आणि नर्मदेचें स्नान करून पुढें जावें! त्याप्रमाणें जबलपूरचें स्टेशन येतांच मी खालीं उतरलों.

खालीं उतरतांच मला पाहण्यास फारच गर्दी जमली. पोलीस अंमलदारहि करड्या नजरेनें माझ्याकडे पहात आपल्या पार्श्वगणांसह आले! मी खालीं उतरतांच मोठमोठ्यानें खणखणीत आवाजांत कूलींना हाका मारूं लागलो, "ए कूलि, एक स्वतंत्र मोटार बुलाव!" एक कूलि आला, पण वेड्यासारखा माझ्या तोंडाकडे बघतच राहिला! पुनः मी ओरडलो, "ए कूली, एक मोटार बुलाव!" मग मात्र अनेक कूली जमा झाले. पोषाखाच्या तुलनेनें मीहि कूलीच! त्या खऱ्या कुलींना आपल्यामध्यें व माझ्यामध्यें फरक दिसेना!! तिकीट पाहणाऱ्या अधिकाऱ्याचीहि तीच स्थिति झाली. तो मनांत खूप तडफडत होता, पण करतो काय?—माझ्या हातात शंभर रुपयांचें तिकिट; त्यालाहि गप्प बसावें लागलें! परंतु पोलिस अंमलदार अशा वेळीं थोडेच गप्प बसणार? त्याना वाटलें, हा भला मोठा दरोडेखोर आज आपल्या हातीं लागणार! म्हणून एक अंमलदार, असेल नसेल तेवढें सामर्थ्य खर्चे करून मला एकदम दटावून म्हणाला "तुम कौन लोक है? कहासे आये? कहा जायेंगे?" ती त्याची उर्मट पोलिसी भाषा माझ्या स्वतंत्र व शांत मनाला फार झोंबली. मी त्याला प्रथम सरळपणेंच उत्तर दिलें, "मी एक फर्स्टक्लास पॅसेंजर आहे; माझा पोषाख दरिद्री असला म्हणून काय झालें? माझें तिकीट तुला काय सांगतें आहे?" इतक्यांत एक त्याच्या हाताखालचा अंमलदार माझ्याकडे बघून त्या अधिकाऱ्याला म्हणाला, "ए कोई बदमाष साधु दिखता है!" तेव्हा पहिल्या अंमलदाराला अधिकच जोर चढला.

तो अधिकच दम भरीत मला म्हणाला, "बोल, तूं कोठून आलास?"

माझा राग अनावर झाला. मी त्याला खडखडीत उत्तर दिलें, "तूं जसा आपल्या आईच्या पोटांतून आला आहेस, तसाच मी आलों आहे! आणि तूं ज्या दिशेनें आणि जिकडे जाणार आहेस, त्या दिशेनें आणि तिकडेच, मीहि पण जाणार आहे!"

माझें खरमरीत उत्तर ऐकून तो अधिकारी बोलला, "जरा सीधी बात करो!—जरा सरळ बोला!"

मीं उत्तर दिलें, " तूं सरळ बोल. लोकाच्या सेवेकरतां तुला सरकारनं नेमलं आहे. तूंच सरळ बोल. तूं मला सीधे विचारलें असतेंस, तर सीधा जबाब तुला मिळाला असता; तुझ्या मगरुरीमुळें मला असें अपमानकारक बोलावें लागत आहे.

तो प्रसंग फार धोक्याचा होता. कारण त्यावेळीं माझ्याजवळ ५ ट्रंका भांग आणि गाजा हीं भरलेलीं होतीं.

अंमलदारानें मला विचारलें, " पेटींत काय आहे ?"

मी सरळ आणि रोख ठोक उत्तर दिले, " साधु लोकांजवळ दुसरें काय असणार ?—भांग आणि गाजा ! "

अंमलदारास मी त्याची थट्टाच करतो आहे, अशी समजूत होऊन ट्रंका तपासण्याची त्यास ईश्वरीकृपेनें बुद्धिच झाली नाहीं !

पोलीस अंमलदारानें मग स्वतःच मोटार पाहून दिली; तसें करण्यांत त्याचा उद्देश असा होता कीं, ' मी कोठें जातो, आणि काय करतो, हें पाहावें.' म्हणून त्यानें मोटार ठरवून देऊन माझ्या पाठोपाठ गुप्त पोलिसहि सोडले.

मी जेथें जाऊन उतरलों, तें घर एका लक्षाधिशाचें होते ! तो गृहस्थ माझा परम शिष्य होता. मी त्याकडे गेल्यावर पोलिस लोकांनीं त्या श्रीमंताकडे माझी माहिती काढली. तेव्हां त्या श्रीमंतानें त्यांना उत्तर दिलें, " हे माझे प्रत्यक्ष गुरुदेव आहेत. त्यांनी माझें जन्माचें कल्याण केलेलें आहे. यांच्याकरतां लाखाचा जामीन तुम्हाला पाहिजे असला, तरी तो मी द्यावयास तयार आहें. तुम्ही यांचें सामर्थ्य जाणत नाहीं. मुंबई, कलकत्ता, मद्रास, पंजाब, अमेरिका या मोठमोठ्या ठिकाणीं याचे शिष्य आहेत. स्वामी रामतीर्थांना तुम्ही जाणतां ? त्यांच्याशींहि गुरुदेवानीं चर्चा केलेली आहे. तेव्हां यांची कोणत्याहि खोल प्रकारें अधिक चौकशी करण्याचें कारण नाहीं ! "

त्या धनिकाच्या तोंडून माझी सर्व हकिकत त्या वरिष्ठ अधिकाऱ्यानेंहि समजून घेतल्यावर तोहि प्रसन्नचित्त झाला. इतकेंच नव्हे तर, पुनः मी

नर्मदास्नान करून मुंबईचा रस्ता सुधारीपर्यंत त्यानें मला फारच आदरानें वागविलें; त्याबद्दल त्याचे आभार मानावे तेवढे थोडेच!

नंतर, आमची स्वारी लग्नाप्रीत्यर्थ सर्व सरंजामासह मुंबईस येऊन, भुलेश्वरीं तळ देऊन राहिली. मुंबईचा वृत्तांतहि मनोरंजक! तेथ माझा बडेजाव फारच झाला. शेकडो शिष्य झाले. मंत्रतंत्रविद्या, आसन, प्राणायाम, भुतें काढणें, वगैरे पूर्वाश्रमीचीं साधनें पुनः मी पाजळून सिद्ध केलीं; आणि मनाशी निश्चय केला, कीं, आपण संसारी होऊन परमेश्वराचा शोध लावायचा; मग जग आपणाला कांहींहि म्हणो! या रीतीनें मुंबईस येऊन मी सांसारिक जीवनाची नांदी म्हटली; आणि त्यानंतरच माझें 'सुमुहूर्त सावधान' झालें!



## प्रकरण १८ वें



# नायकिणींचें गुरुपद.

मुंबईस येऊन माझें बस्तान चांगलेंच बसलें. लग्न करावयाचें, तर पैसाहि मिळविला पाहिजे, त्याशिवाय आपली जीवनयात्रा चालणार नाहीं हे मी पूर्णपणें जाणत होतों. पण द्रव्यावर माझी मुळींच आसक्ति नव्हती; द्रव्य-संपादन बाबतींत मी उदासच होतों. त्यावेळीं माझ्या बुवाशाहीला जी सुरुवात झाली ती फारच जोरकस होती. दोन पैशाचें पंचांग मला तेव्हां फारच उपयोगीं पडलें. भुलेश्वरला तळ ठोकल्यावर मी नित्य पंचांग उघडून बसूं लागलों! वेश्येला आणि ज्योतिषाला आपलीं **पंचांगें हीं नेहमींच उघडीं करून दाखवावीं लागतात! राजकर्मचारी, ज्योतिषी, वैद्य, वेश्या, यांना दुसऱ्यांना खूष ठेवावेंच लागतें;** क्षणोक्षणीं त्यांना तें मरणच असतें! गिऱ्हाइकाला असमाधान उत्पन्न करून त्यांचा धंदा कधीं चालणार नाहीं. मला पंचांगाचें परिपूर्ण ज्ञान तरी कुठें होतें? परंतु एकानेंहि मला विचारलें नाहीं, कीं, " ज्योतिषीबुवा, ज्योतिषज्ञान कितपत आहे?" मी आपला मात्र केतू, राहू, शनि, मंगळ, गुरु यांना हातांशीं घट्ट धरून त्यांच्या पीडेबद्दल भविष्य सांगत असें! मी नेहमीं पंचांग पाहण्यांत गर्क असें! त्यामुळें मी मोठा पंचांग-तज्ञ आहे असें समजून, आपोआप माझ्याभोंवतीं गर्दी जमूं लागली. हिंदुस्थान देशच असा आहे, कीं, तुम्ही एकादें कोणत्याहि रंगाचें निशाण घेऊन चालूं लागा, किंवा पोथीचें एकादें जुनेंपुराणें, फाटकें पान हातांत धरून रस्यावर कोठेंहि बसा, कीं तुम्हांला अनुयायी भक्त हे मिळालेच म्हणून समजा! हिंदुस्थानांत अनुयायांना कधीं तोटा पडणार नाहीं! हिंदुस्थानच्या लोकसंख्येच्या मानानें अजून बुवांची संख्या फारच कमी आहे! नाहींतर बुवाबाजीला हिंदुस्थान-सारखें सुपीक आणि विशाल क्षेत्र जगांत नाहीं! त्यातून ती महालक्ष्मीची नगरी—मुंबई! त्यावेळेस तेथें हरतऱ्हेचे लोक माझ्याकडे येत असत. 'घोड्याची रेस, कापसाचा अंदाज, तेजी-मंदी, आणि द्रव्य एकदम कसें मिळेल?' हे प्रश्न सर्वांत

मुख्य आणि अधिक असावयाचे! परंतु मी योगाभ्यासी, हिमालयांत भटकणारा मला त्यांतील कांहींसुद्धां सांगतां येत नव्हतें. कोणाला तेजी सांगावयाची, तर कोणाला मंदी सांगावयाची; ज्याला जें पटेल त्याची माझ्यावर श्रद्धा बसे, व ज्याला पटत नसे, तो पुनः पुनः विचारून समाधान करून घेई! भविष्य सांगणें सोपें काम नाहीं! ज्योतिषाला खरें ज्योतिष उत्कृष्ट समजलें असतें तर त्याच्या डोळ्यांपुढची आपत्तीची, बिन पैशाची, निराशेची अंधारी, केव्हाच नष्ट झाली असती; व तो स्वतःचा उत्कर्ष तात्काळ करून घेऊं शकला असता! खरें ज्योतिष मला कोठेंच आढळलें नाहीं. दुसऱ्याला घोडा सांगता येतो; आंकडा सांगता येतो; लॉटरीचा नंबर सागता येतो; तर त्या ज्योतिषाला स्वतःलाच, ती गोष्ट कां साध्य होत नाहीं? दुसऱ्यांना द्रव्य-योग दाखविणारे स्वतः दरिद्री कां? तर केवळ त्या व्यक्तिचा एकंदरीत तो अंदाज असतो; तेंच त्याचें भविष्य आणि ज्योतिष! माझे ज्योतिष पुष्कळ लोकांना पटूं लागल्यामुळें अन्नछत्राच्या आश्रयाची आवश्यकता मला राहिली नाहीं! मी स्वतंत्रपणें, षड्रस अन्नाच्या मेजवान्या झोडूं लागलों! वास्तविक तेव्हां जगांतील सर्व खोट्या धंद्यांची, खोट्या स्तोत्रांची मला अत्यंत चीड आलेली होती. परंतु पुष्कळ विचार केल्यावर मला असें दिसून आलें कीं खोटें बोलल्या शिवाय आजकाल कोणत्याहि व्यक्तिचें चालत नाहीं; चालणार नाहीं. कोणी व्यक्ति अल्प खोटें बोलत असेल, तर दुसरी कोणी व्यक्ति पावलोपावलीं खोटें बोलून, द्रव्यार्जन करीत असेल! पण प्रत्येक व्यक्ति निःसंदेह खोटें हें बोलतेंच! गृहस्थाश्रमी समाज ज्याप्रमाणें मारुतिचें प्रतिक डोळ्यांपुढें ठेवून त्याची उपासना करीतच असतो; त्याप्रमाणेंच, नाटकांतलें अगर बोलपटांतलें हरिश्चंद्राचें चित्र डोळ्यापुढें आदर्श म्हणून ठेवून समाज सत्याचा व्यवहार करीत असतो! सर्वांची इच्छा खरें बोलण्याची, पण प्रत्येकाच्या आचरणांत मात्र, प्रत्येक शब्दा-शब्दा मागें रहस्य! असो. मीहि पण मग निरुपायानें पंचांग बघून लोकांशीं चांगलेंच खोटें बोलूं लागलों!

एक दिवस एक बडा इंजिनिअर माझ्या भेटीसाठीं आला; त्यानें अगदीं गयागया करून मला विचारलें, "कृपा करून माझे सध्याचे ग्रह तुम्ही बघाल काय? फार वाईट दिवस मला आले आहेत!"

मी त्याला चापून सांगितले, "तुम्हांला कशाची तरी बाधा झालेली आहे!',

तो म्हणाला, " अगदीं खरें आहे गुरुमहाराज ! मला पैशाला कांहींच कमी नाहीं; माझ्या दोन मुलाना भुतानें पछाडलेलें आहे. त्याचें कांहीं निवारण होऊं शकेल काय ? भुतें माझ्या मुलांना सोडतील काय ?"

मी विचारलें, " तीं भुतें काय प्रकार करतात ? "

त्यानें उत्तर दिलें, " मुले अन्नाला हात लावत नाहींत. आकस्मात तीं आपोआप झाडांला उलटीं टांगलीं जातात ! मांत्रिक कोणी आला, तर त्याला बेदम मार देऊन त्यालाच क्षणांत पळवून लावतात ! अशीं जबरदस्त पिशाच्चें माझ्या दोन्हीं मुलांना लागलेलीं आहेत. तेव्हा आपल्यापाशीं त्याचा कांहीं बंदोबस्त आहे काय ? "

मला जादुगिरीमुळे पिशाच्च भुतें यांचा पूर्ववयांत पुष्कळच अनुभव आलेला होता. मी बेधडक त्याला उत्तर दिलें, " कोणतेहि भयंकर पिशाच्च असूंदे मी त्याला एका क्षणात नष्ट करीत असतों ! "

त्या वेळीं, त्याचीं मुले नरसोबाच्या वाडीस दत्ताजवळ ठेवलेलीं होतीं. तेथें तार करून त्यानें मुलांना तात्काळ आणविलें; व मीहि मोठ्या उत्साहानें तें कार्य हातीं घेऊन, मुलांना अंगारा लावून पिशाच्च-बाधा तावडतोब दूर करून टाकली! त्या दिवसापासून तीं मुलें सुखी झालीं. चार महिने त्यांच्या पिशाच्यानें कोणत्याहि प्रकारें हालचाल केली नाहीं असें अनुभवास आल्यावर त्या गृहस्थानें मला अत्यंत आनंदानें दोन हजार रुपये दिले! ती एक अपूर्व गोष्ट घडून जगजाहीर झाल्यावर, मला शेकडों आमंत्रणें नित्य येऊं लागलीं. व तो माझा धंदा पंचांगापेक्षां जोरांत सुरू झाला. खरोखर पिशाच्चें फार चांगलीं आहेत! भुतें परोपकारी आहेत ! तीं आपल्या बाधेने मांत्रिकाचा धंदा करणाराला अदृश्यपणें चांगलाच हात देतात. पैशाचा पुरवठा करतात. माझ्या पाहण्यांत अनेक मांत्रिक आले आहेत, आणि त्यांना झालेली प्रचंड द्रव्यप्राप्ति केवळ भुतांचेकडून, पिशाच्यांकडूनच झालेली आहे. अर्थात् हा धंदा सर्वांनाच बरकत देणारा नाहीं ! मला मात्र द्रव्याच्या बाबतींत भुतांनीं अगदीं मनावर घेऊन कामगिरी केली, द्रव्य दिलें ! तीं जगांत नसतीं तर

कदाचित मीहि उपाशी मेलों असतों! पैशाकरतां दिवसाढवळ्या जगाला दिसणारें एक जिवंत भूतच मी झालों असतों!

मी जीं पिशाचें आणि भुतें काढून गाडलीं, त्यांत त्या भुतांचें आणि पिशाच्चांचें प्रेम बायकांच्यावर अधिक होतें! माझ्या स्वतःच्या अनुभवानें जगांत भूत, पिशाच्च कांहींएक नाहीं. "भूत आहे असें म्हणणें, हीच भूताची अस्तित्वाची मुख्य कल्पना. सारा तो कल्पनेचा खेळ!" माझ्या जलाल अंगाऱ्यानें मात्र, तीं सर्व पिशाच्चें कोठेच्या कोठें क्षणांत पळून जात! मी एक अंजन तयार केलें होतें! अत्तराच्या फायांतून, गुलाबाचें फूल, वास घ्यावयास देऊन तें अंजन मी त्या व्यक्तिच्या नाकास लावीत असें. जलाल दर्प नाकास लागतांच एका सेकंदांत भूत नष्ट होत असे. भुतें काढण्यांत प्रयोगापेक्षां हिकमतच अधिक लागते. थोड्याच दिवसात, मी जो पूर्वी नुसताच बुवा होतों, केवळ ज्योतिषी होतों, 'केतूची पीडा आहे' म्हणून सागत होतों, त्या मला, जगानें पंचाक्षरी बनविलें! हजारों स्मशानें, मसणवटे, भयानक जागा मी रात्रीं, अपरात्रीं, मध्यरात्रीं, एकटा फिरून आलो आहें; पण मला कोठेंहि खरें भूत म्हणून दिसलें नाहीं; खरें माझ्या कधींच दृष्टीस पडलें नाहीं.

माझ्या दीर्घ अनुभवानें 'भूत' हा काल्पनिक रोग आहे. पुरुषांच्यावर स्त्रियांना वर्चस्व पाहिजे असलें, कीं, सर्व त्यांचे उपाय थकल्यानंतर त्या भुताचा आश्रय करतात! आणि तेव्हांपासून त्यांच्या अंगांत येऊ लागतें. माझ्यामते दरवेशाचें लहान माकड आणि भूत सारखींच. धन्याची पिशवी पैशानें ते भरतें! जादूगार लोक, गुरु लोक, बुवालोक, पंचाक्षरी, महंत, मांत्रिक, सर्वजण केवळ त्या गिऱ्हाईक व्यक्तिच्या अज्ञानाचा फायदा घेत असतात. साऱ्या त्यांच्या लबाड्या. ती एक टोळीच, धंदेवाईक टोळीच आहे! त्यातच ज्योतिषशास्त्र दृष्ट्या मी एक योजना लोकाचेपुढें ठेवली, कीं, 'कोणताहि रोग केवळ ग्रहाचा जप करण्यानें नष्ट होतो! बाकी कांहींच करावयास नको!'

एक अपस्माराची पहिली केस माझ्याकडे आली. विलायतेपासून त्या

करण्यास सुरुवात केली! नऊ महिन्यांत रोग बरा करण्याची मी गॅरंटी दिली! मला यश मिळून खूप पैसाहि मिळाला. परंतु पुढें प्रतिदिवशीं, लोकांची गर्दी वाढतच चालल्यामुळें मला माझें सर्व बस्तान समुद्रतीरीं—महालक्ष्मीचे बाजूस न्यावें लागलें; व तेथें मी माझें कार्य सुरू केलें. आता मी फार मोठा बुवा झालों होतों! कारण अनेक अद्भुत प्रयोग मी तेव्हां लोकाना दाखविले व चकित केलें. घागरभर ताडी तयार करणे, टांगलेल्या कंदिलांत सध्याकाळीं दिवा आपोआप लागणें; समुद्रांतून वाळू घेऊन त्याचे निरनिराळे खाद्य पदार्थ करून दाखविणें, असे अनेकविध चमत्कार मी करूं लागलों. त्यावेळीं एका नशिबवान पारशी गृहस्थाची व माझी ओळख झाली. त्याचें दारूचें दुकान गेलेलें होतें; व तो फार संकटांत होता. तो माझ्याजवळ येऊन गरिबीनें म्हणाला "या गरीबाचा अर्ज देवाच्या कानावर घाला! मी बुडालों आहें! माझी अब्रू जाण्याची वेळ आहे!"

मी म्हटलें, "काळजी करूं नको! एक महिन्यांत तुझें दारूचें दुकान तुला परत मिळून भरपूर फायदा होईल!"

बोलाफुलाला गांठ पडली, आणि तसेंच झालें. त्यामुळें त्याची मजवर भक्ति जडली व त्यानें मला फारच सहाय्य केलें. अंगाऱ्याकरता तर मला नित्य सर्वांनीं भंडावून सोडलें! त्यामुळें मी एकदां कडक नियम केला, कीं कोणत्याहि स्त्रीनें माझ्याकडे येऊं नये, फक्त पुरुषानीं यावें! तसा कांहीं काल अंमल चालविल्यावर, मी दुसरा कडक नियम जाहीर केला, कीं, "आतां फक्त नायकिणींनींच यावें; दुसऱ्यांनीं येऊं नये!" तोहि नियम कांहीं काल चालला. एकंदरींत माझ्या सर्व कार्याला मठाचें, भंडारखान्याचें, एकाद्या संस्थानाचें स्वरूप येऊं लागलें! खाण्यापिण्याची चंगळ असल्यामुळें, शिष्य-परिवार फार वाढला! रोज माझे अगणित पट्टशिष्य होऊं लागून त्यांच्यांतहि चढाओढ सुरू झाली! कांहीं कांहीं पट्टशिष्यांनीं खाजगी रीत्या स्वतःच्या हिंमतीवर बुवाबाजीचा स्वतंत्र धंदा सुरू करून त्यावर ते पैसे मिळवूं लागले! सर्वच ते माझी नक्कल करीत असत. एका शिष्यानें मात्र अपूर्व डोकें चालवून एका सधन द्रव्यलोभी मनुष्यास ७।८ शें रुपयांच्या खड्ड्यांत आणलें. त्या शिष्यानें

त्या सधन गिऱ्हाइकाला सांगितलें कीं, " मी तुला तुझ्या घरांत द्रव्याचा हंडा काढून देतों. भूमिगत द्रव्य तुला मिळणार आहे. मात्र त्यासाठीं एक महिना फार मोठें अनुष्ठान करायला पाहिजे. तुमच्या घरांतल्या एकाद्या कुंवार मुलीनें एक लाख वेळा, आपण सागू तो मंत्र, कागदावर लिहून काढला पाहिजे ! " बिचाऱ्या द्रव्यलोभी गृहस्थाची १६।१७ वर्षांची एक मुलगी चांगली इंग्रजी पांचव्या इयत्तेंत असलेली, तिला बापानें शाळेंतून एक महिनाभर घरींच ठेवून घेतली ! आणि तिचीं बोटें मोडेपर्यंत, एक लाख मंत्र तिला लिहावयास लाविला ! शेवटीं तो भोदु गुरू, आणि हस्तक आपले कमंडलु रुपयांनीं तुडुंब भरून घेऊन व त्या गृहस्थास निर्धन करून, ते दोघेहिजण फरारी झाले; मेहेरबानी त्यांनीं एवढीच केली, कीं, त्यांनीं मुलीचें नुकसान केलें नाहीं ! किंवा तिला पळवून आपल्याबरोबर नेली नाहीं ! ते दोघेहि शिष्य बुवाबाजीचा धंदा करण्यापूर्वी दोन पैशांचा रोज कच्चा चिवडा खाऊन जगत होते ! कुमारिकेकडून मंत्र-जप करण्याची त्यांनीं नवी पद्धत काढली होती !

माझाही स्वभाव विचित्रच होता. मीहि चांगला बनलों होतों ! सर्व सुखें अनुकूल झालेलीं होतीं. मला गायनाची फार आवड. त्यासाठीं मी रोज रात्रीं भटकत असे. अमुक ठिकाणीं जावयाचें किंवा अमुक ठिकाणीं जावयाचें नाहीं असा कांहीं धरबंध मी स्वतःला मुळींच ठेवलेला नव्हता. फक्त एक गोष्ट मी पूर्णपणें पाळलेली होती, ती ही कीं, स्त्रीशीं, नायकिणीशीं, संबंध करावयाचा नाहीं. तेवढ्या नैतिक बलावरच, माझी बुवाबाजी यशस्वी झालेली होती. त्या बाबतींतील दोन गोष्टी, येथें मी मुद्दाम नमूद करून ठेवतों !

रात्रीं बेरात्रीं मी रोज भटकत असे. एकादेवेळीं जरीचा बहुमोल पोषाख मी करीत असे; तर कधीं लंगोटी, बंडी, सोटा यांसह फिरत असे ! मला भक्तांनीं बहुमोल किंमतीची नाजुक, सुंदर मोटारही ठेवलेली होती. रोज जितका पैसा मिळेल, तो त्या दिवशींच खर्च करावयाचा, दुसरे दिवसापर्यंत तो ठेवावयाचा नाहीं, असा माझा शिरस्ता असे. माझ्याबरोबर मोटारींत दोन नौकरहि असत; असा मी राजशाही थाटांत होतों.

अशा स्थितींत एका रात्रीं मी लंगोटी-वेषांत असतां, व रस्त्यानें पायींच

चाललों असतां, एका इमारतींतील तिसऱ्या मजल्यावर मधुर गाणें चालूं असल्याचें मी ऐकलें. त्या क्षणीं तें गाणें ऐकण्याची मला फार इच्छा झाली. म्हणून मी बेदिक्कत माडीवर चढलो. व गाणें ऐकत दारातच उभा राहिलों. गाण्याची खास बैठक चालू असून बडे बडे लक्ष्मीपुत्र बैठकीस होते. बैठक ऐन रंगात आली होती. मी माझ्या विचित्र बाराबंदीच्या पोषाखानें बैठकीचें सर्व लक्ष खेचून घेतलें; मी गाणें ऐकत तल्लीनतेनें गप्प उभा आहे असें पाहून थट्टेनें एका चेष्टेखोर गृहस्थानें मला एका रिकाम्या खुर्चीकडे बोट दाखवून, त्या खुर्चीवर बसण्यास सांगितलें! मीहि खुशाल जाऊन बसलों. राजा एकीकडे आणि भिकारी एकीकडे असें ते चित्र होतें! मी खुर्चीवर असा टेकतों न टेकतो, तोंच चार नौकर लोक तेथें धावत आले, आणि त्यानीं गचाडी धरून मला धक्के मारीत पार खालीं रस्त्यावर आणून सोडलें. माझ्या मनाला तेव्हा फार वाईट वाटलें!

मला त्या बैठकींतून हाकलून काढत असतां एक लक्ष्मीपुत्र जरब दाखवून उद्गारला "हें गाणें खास श्रीमंत लोकांकरता आहे; गरिबाकरतां नाहीं! पुनः वर येशील, तर पोलीसाच्या ताब्यात देऊं!"

मी म्हटलें, "काय? हें गाणें गरिबांनीं ऐकावयाचें नाहीं? ईश्वरानें इतका मधुर आवाज त्या व्यक्तीला दिलेला असतांना, तो गोड आवाज गरिबांनीं ऐकावयाचा नाहीं? मग तें तुमचें गाणे घेऊन काय करावयाचें आहे? गंधर्वासारखा गोड आवाज असून त्याचा जर गोरगरीब समाजाला विनामूल्य आस्वाद मिळत नसेल, तर त्या व्यक्तीनें ईश्वराची, मानवजातीची सेवा केली, असें कसें होईल? गवईलोकही किंवा नायकिणीही गरिबांच्या करतां तोंडहि उघडत नाहींत, म्हणावयाच्या! मग तें तुमचें स्वर्गीय संगीत घेऊन मला काय करावयाचें आहे?" पुनः मी त्या श्रीमंत वीराला म्हटलें, "तुम्ही मला काय समजतां? मीहि श्रीमंताचा बच्चा आहे. या गाण्याची काय किंमत आहे? बैठकीनें जितके पैसे देऊ केले असतील, तितके पैसे मी एकटा देऊं शकतों!" पण मी तेथें थांबलोंच नाहीं; तसाच रस्त्यावर आलों. मागें मात्र एक चमत्कार घडला!

जी गाणारीण नायकीण होती, तिचा आवाज एकदम गेला! व तिच्या हृदयास एक प्रकारचा धक्का बसला! ती थांबली. सगळीकडे खळबळ उडाली! जो तो तिला काय झालें म्हणून विचारून, तिच्या शुश्रुषेची संधी साधूं लागला!

नायकिणीनें स्पष्ट सांगितलें, " माझ्या छातींत भयंकर कळ आलेली आहे. आतां माझ्याच्यानें गाणें होणार नाहीं. ज्याला आतांच तुम्हीं हाकलून दिलेलें आहे, त्या साधूंना परत आणलेंत, तरच माझा आवाज पुनः सुरू होईल, नाहींतर आतां माझें जन्माचें नुकसान होणार आहे. त्या गुरुमहाराजांना तुम्ही शक्य तितक्या लौकर परत आणा!"

नायकिणीचा–गाणारणीचा तो हुकूम! ७।८ लोक तात्काळ मजकडे रस्त्यावर धांवत आले! मी त्या इमारतीपासून पुष्कळच दूर गेलों होतों; पण सर्वांनीं माझ्याकडे धांवत येऊन मला गराडा दिला; कित्येकांनीं माझ्या पायांवर भररस्त्यांत डोकीं ठेवलीं, आणि आर्जव करून म्हणाले, " स्वामीजी? आपणाला वर बोलावीत आहेत!"

मी म्हटलें, " पुनः मला ठोक द्यावयाला? अजून तुमचें समाधान झालें नाहीं काय? माझ्याशीं तुम्ही मारामारीच्या भानगडींत पडूं नका! हा माझा सोटा पहा; एकेकाचें टाळकें सडकीन!"

पाया पडणारे लोक अधिक आर्जवानें म्हणाले, " गुरुमहाराज? मारण्याचा प्रश्नच नाहीं! आपण परत तिमजल्यावर आलें पाहिजे; त्याशिवाय गाणें सुरूं होत नाहीं! आपल्या दर्शनाची नायकिणीस अत्यंत इच्छा झाली आहे, तिला तळमळ लागून राहिली आहे, तेव्हां तुम्ही परत चला!"

" बरें तर!" मी म्हटलें; आणि पुनः तसाच त्यांच्या बरोबर गेलों. त्यावेळीं माझा फारच आदर सत्कार करण्यांत आला. ज्या खुर्चीवरून मला ओढून काढलेलें होतें, त्याच खुर्चीवर पुनः मला थाटानें आणि मऊ आसनें घालून देवासारखें बसविण्यांत आलें! प्रथम माझ्याकडे येऊन माझ्या पायांवर त्या गोड गळ्याच्या नायकिणीनें आपला माथा ठेवला; तिनें माझ्या पायांवर डोकें ठेवतांच, तिचेंच अनुकरण ताबडतोब तेथील सर्व ' सभ्य समाजानें ' केलें!

नायकीण माझ्या पायावर डोकें ठेवीत असतां कृतज्ञतेनें म्हणाली, " महाराज ! महालक्ष्मीचे केशवानंद सरस्वति आपणच्च काय ? मी गेल्या महिन्यांत भयंकर आजारी असतां केवळ आपल्यावरील श्रद्धेने आणि आपण दिलेल्या अंगाऱ्यानेंच मी बरी झाल्यें. गायनाच्या नादात मजकडून दुर्लक्ष झालें, याची मला क्षमा करा ! मी तुमच्या चरणांची दासी आहे ! " लोकाचीं अंतःकरणें तर तेव्हां त्या नायकिणीच्या आचरणानें गहिंवरून आलीं.

मी तिला म्हटलें, " गरीबांच्याकरतां रोज थोडा वेळ तरी तूं मोफत गात जा ! म्हणजे ईश्वर तुझ्यावर अधिक प्रसन्न होईल. तुझ्या कलेचा विकास होईल; व तुझे कल्याणच होईल. " त्यानंतर तिचें गाणें झालें !

सांगावयाचें आश्चर्य असें, कीं, त्याच क्षणापासून त्या नायकिणीनें मला गुरु केलें आणि दुसरे दिवशीं आपली सर्व इस्टेट मला अर्पण केली. परंतु मी मात्र तिच्याशीं कधींहि समागम केला नाहीं.

पुढें मी तिला घेऊन प्रयागास गेलों. तेथें एका ठिकाणीं भक्तिरसांत तल्लीन होऊन ती गाणें म्हणत असताना समाधि लागून, ध्यानमग्न स्थितींतच, मृत्यु पावली. तिचा सर्व पैसा मी त्या पवित्र क्षेत्रांत गोरगरिबांना वाटून टाकला. तिची ६० हजार रुपयाची इस्टेट होती. पण सर्व इस्टेटीचा दानधर्मच करण्यांत आला.

आयुष्यांत मी सुमारें दोन हजार नायकिणींना भेटलों; आपल्या मुलीबाळी, आपल्या गरीब बहिणी समजून त्यांच्या मुखांवरून मी हातहि फिरविला. त्याच्याशीं पुष्कळ वेळां थट्टामस्करीहि केली; पण शरीरानें, कधींहि मी उपभोग घेतला नाहीं; तेंच माझें दृढ व्रत होतें. तो एक प्रकारचा माझा योगच होता.

पुनः मी मुंबईस परत येऊन पूर्वीचा क्रम चालू केला.

त्यानंतर आणखीहि एक असाच विलक्षण प्रसंग माझ्या आयुष्यांत घडला. एक दिवस मी फारच थाटामाटाचा आणि जरीचा पोषाख केला होता. फेटा बांधला होता. एकाद्या संस्थानिकासारखा मी शोभत होतों ! त्या स्थितींत कांदेवाडींतून मोटारींतून मजा बघत चाललों असतां एका नायकिणीनें मला

खुणावलें ! मी मोटार थांबविली. नायकीण स्वागतार्थ दाराशीं आली. मोटार-ड्रायव्हरला मी सांगितलें, " मोटार कांहीं वेळ,–मला जितका वेळ लागेल तितका वेळ–रस्त्यावर खडी कर. "

मी त्या नायकिणीच्या घरांत गेलों; तिनें मला ३ ऱ्या मजल्यावर नेलें.

मी तिला विचारलें, " तुम्ही एका रात्रीसाठीं काय घेता ? "

ती म्हणाली, " माझा तसा धंदा नाहीं. माझ्या शेठनें मला नुकतेंच सोडलें आहे, व तो रागावून गेला आहे ! महिन्यावारी हा माझा धंदा आहे. आज शेठच्या त्यागामुळें सडकेवर बघण्याचा मला प्रसंग आला आहे ! " असें म्हणून, तिनें पानांचें चांदीचें तबक माझ्यापुढें ठेवलें !

मी दहा रुपयांची नोट काढून ती तिच्या तबकांत टाकली. तेव्हा ती फारच खूष झाली. त्यावेळचें माझें तारुण्य, रूप, आणि पोषाख सर्वच कांहीं आकर्षक होतें. नाटकांतल्या किंवा स्टूडिओंतल्या पात्रांपेक्षांहि मी उत्कृष्ट सजलो होतों, आणि दिसत होतों ! त्यावेळीं सोन्याचीं सलकडीं माझ्या हातांत झळकत होतीं. उजव्या हातांत मौल्यवान हिऱ्याची आंगठी होती. शिवाय मी मोटारींतून उतरलों होतों. थोडक्यांत म्हणजे सर्व विस्मयकारक गोष्ट ती होती.

मला तिनें त्यानंतर आंतल्या एका खोलींत बोलावून घेतलें. पानांचा सुंदर विडा करून तो मला तिनें दिला. मी तो विडा घेऊन म्हटले, " आज एकादशी असल्यानें हें पान मी आज खाणार नाहीं. जर तुला उत्तम गाणें गातां येत असेल, तर एक गाणें म्हणून दाखव ! " ती गाणारीण नायकीण नसल्यामुळें तिला गातां येणें शक्य नव्हतें. थोड्या वेळानें ती म्हणाली, " बसा ना पलंगावर ! " मी बसलों. नंतर ती पुनः म्हणाली, " मला आतां तुम्ही आपली बायको समजा !–**मला बायको करा !** "

मी हंसलों; मी तिला म्हटलें, " तूं जन्मतःच बायको आहेस, त्या तुला आतां बायको काय समजावयाचें ? मी तुला आतां निराळी बायको, कशी करणार ? तूं रामनामाचा एक हजार जप या वेळीं कर; मग मी तुझा विचार करीन. "

तिनें त्याप्रमाणें जप केला ! आणि पुनः तिनें म्हटलें " शेठ ? मला बायको करा ! "

पुनः मी पूर्वीचेंच उत्तर दिलें, " तूं बायकोच आहेस. यापुढें असले धंदे करून पोट भरण्यापेक्षा कथा, कीर्तन करून, देवाचें गोड नाव घेऊन पोट भर !" पण तिला माझा उपदेश पटला नसावा; कारण तिनें मला नाक मुरडलें.

काहीं वेळ बसून मी तेथून मोटारीकडे जाण्यासाठीं जिन्याकडे वळलों. ती आपल्या आईला ओरडून म्हणाली, "अग आई ? हे शेठ 'गुलाबराव' आहेत!–यांच्यात कांहीं अर्थ नाहीं ! " असें म्हणून आणि माझ्याकडे बघून ती खदखदा हंसूं लागली !

मी तात्काळ मागें वळलो; आणि तिला सागितलें, " तूं मला जाणत नाहींस ! मी एकदांच तुझ्याशीं संगत करीन तर तूं ठार होऊन जाशील, इतकी माझी शक्ति आहे. मला काहीं कर्तव्य नाहीं, म्हणून मी तुझी संगत करूं इच्छित नाहीं. पण ध्यानांत ठेव, माझी संगत होताच तूं मरशील ! मी माझ्या शरीराचा कोणताहि भाग ६० पटींनीं मोठा करूं शकतों. "

त्याचक्षणीं ती पाया पडली. तिनें माझे पाय घट्ट धरून काकुळतेनें विचारलें, " मी काय करूं ? म्हणजे माझा उद्धार होईल ? "

मी म्हटलें, " मी तुला आशीर्वाद देत आहें; मनःपूर्वक आशीर्वाद देत आहें; तूं कीर्तन करणारी हो ! त्यातून तुझा उद्धार होईल. तुझी काया परमेश्वराच्या सेवेला लाव !"

तिनें माझी आज्ञा मानली. आणि हळू हळू कथा–कीर्तनाचें शिक्षण घेऊन त्यानंतर ती उत्तम कीर्तन करणारी झाली. पुढें, ब्राह्मणांच्या बायकासुद्धां, तिचे पाय धरूं लागल्या. मात्र पुनः, ती मला कधींच भेटली नाहीं !



## प्रकरण १९ वें



# स्वामी श्रद्धानंदांचा आशीर्वाद

बुवांपासून लोक नेहमीं चमत्कारांची अपेक्षा करीत असतात. ते चमत्कार ज्याला ज्यास्त सफाईनें, गाजावाजा करून दाखवितां येतात, त्या बुवाचें बस्तान नेहमीं चांगलें बसतें. जो बुवा त्या गोष्टींपासून विन्मुख असतो, त्याला दुपारचीहि भ्रांत पडते ! हवा, पाणी, 'ब्रह्मानंद' यांच्यावरच त्याला जगावें लागतें !, गारुडी आणि सध्याचे बुवा यांच्यांत कांहींच फरक नाहीं ! पहिल्यापासून मी चमत्काराच्या अगदीं विरुद्ध होतों. कारण, त्यांत खरा मानवजातीचा उद्धार नसून ती फसवणूक आहे, असें माझें ठाम मत होतें. माझ्याहि बाबतींत अशा शेकडो गोष्टी घडलेल्या आहेत, कीं त्यांच्यावर एकादी पोथी, एकादा ग्रंथ, एकादें लीलामृत होईल ! एक दिवस रस्त्यानें एक प्रेत चाललें असतांना मी त्या प्रेतास, प्रयत्न करून वनस्पतींच्या प्रयोगानें उठवलें होतें; पण त्याचा अर्थ असा होता, कीं, संपूर्ण प्राण त्या देहांतून गेलेलाच नव्हता. म्हणूनच मृत मनुष्याच्या डोक्यावर पाणी ओतण्याची, किंवा त्यास स्नान घालून तें धुण्याची क्रिया फार महत्त्वाची आहे. कदाचित त्यामुळें पुनः संजीवन होणें शक्य असतें.

भुलेश्वरीं मी असतांना, एक कायदेपंडित मजकडे आला. तो मला साष्टांग नमस्कार घालून म्हणाला, "मला गुरु करावयाचा आहे; व ज्ञानेश्वरी समजून घेणें आहे. तर आपण कृपा करून मला 'गुरुमंत्र' द्यावा !"

मी उत्तर दिलें, '**ज्ञानेश्वरी**' **या चार अक्षरांतच ज्ञानेश्वरीचें मर्म सांठविलेलें आहे.** 'ईश्वरी-ज्ञान' असा त्याचा सरळ अर्थ आहे. ज्ञान हें एक अपूर्व सामर्थ्य आहे. तें सामर्थ्य मिळवून सर्वत्र आपण 'ज्ञानपूर्वक सत्ता' चालवावयाची आहे. नुसतें पुस्तकी ज्ञान हें अज्ञान आहे; कारण खऱ्या ज्ञानाच्या प्रकाशांत मनुष्य कधीं अडखळत नाहीं. ज्ञान झालें आहे असें

म्हटलें, कीं, 'हा सूर्य हा जयद्रथ' असें, किंवा 'तळहातावर आवळा देऊन दाखविण्याइतकें,' तें स्पष्ट झालें पाहिजे. त्यालाच मी 'ज्ञान' म्हणेन. आजकाल लोक ज्याला 'ज्ञान' म्हणतात, तें अज्ञान आहे; अंधाररूप आहे. **ज्याच्या मनांत संशय आहे, तो कधीं सुखी होऊं शकत नाहीं. "...संशयाहूनि थोर । आणिक नाहीं पाप घोर । हा विनाशाची वागुर** ( जाळे ) **। प्राणियांसी ॥"** तुम्ही संपादन केलेलें ज्ञान बोगट व आंधळें आहे. **ज्ञानरूप** खड्ग प्रत्येकानें धारण केल्यावांचून, संशयाचें जाळें तुटणार नाहीं ! मी त्याला स्पष्ट सांगितलें, कीं, "एका काळोखाच्या खोलींत अगदी गरीब स्थितींत, ईश्वरी ज्ञानाची अपेक्षा करून राहणारा, एक न्हावी जातीचा मनुष्य आहे. त्या संताकडे तुम्ही जा; तो तुम्हाला गुरुपदेश देईल आणि **ज्ञानेश्वरी** समजावून सांगेल. माझें स्वतःचें मत म्हणाल, तर ईश्वरीप्राप्तिकरतां कानफुंक्या बुवांकडून गुरुपदेश घेणें हे निव्वळ अडाणीपणाचें काम आहे. पण तुम्ही त्याच्याकडेच जा; तो तुम्हाला मार्ग दाखवील. ईश्वराकडे जाण्याला दलालाची जरुरी नाहीं. **समुद्राकडे जाण्यासाठीं वाटाड्याची जरुरी आहे काय ?** म्हणून, मनुष्यानें भांबावून न जातां, एकाच वेळीं डोळयांस पन्नास वाटा दिसत असल्या तरी, त्यांतील एकच वाट पत्करणें, हेच उचित आहे." कायदेपंडितानें त्या नापिकास आपल्या घरीं नेऊन त्याची पूजाअर्चा करून त्यास मोठे महाराज बनविलें! मोठ्याच मनुष्याची भक्ति बसल्याचें जेव्हां लोकांना दिसून आलें, तेव्हां त्या बुवाचे हजारो शिष्य पुनः निर्माण झाले ! त्या न्हावीबुवास दक्षणाहि मग खूप प्राप्त होऊं लागली. इतकेंच नव्हे तर त्या बुवानी मोठमोठ्या चाळी बांधून गडगंच इस्टेटहि केली. पैशाचा हिशेब ठेवण्यासाठीं कारकुनांची तेथें खूप गर्दी उडाली ! मोठमोठ्या जमाखर्चाच्या वह्या उघडून, नित्य कारकून लोक बसूं लागले ! शेवटीं, त्या न्हावीबुवाचा द्रव्यलोभ इतक्या थरास गेला, कीं, ईश्वरी कायदे, आणि परमेश्वराच्या दरबार त्यास तुच्छ वाटून द्रव्याकरतां तो मानवीकोर्टाचा आश्रय घेऊन राहूं लागला. शिष्यगणांनीं भक्तिनें दिलेला पैसा कोर्टदरबारांत आणि भांडणाचे पायीं, एका 'ज्ञानेश्वरी' सांगणाऱ्याकडून उधळला जावा, ही गोष्ट त्या ग्रंथास

कमीपणा आणणारी, लाजिरवाणी आहे. मग 'डायरी आणि ज्ञानेश्वरी' यात फरक तो काय? बुवा कुरुक्षेत्र म्हणजे कोर्टच समजले! ज्ञानेश्वरी वाचून व त्याचा अर्थ समजून, ठसवून घेतल्यावर, बुवाचा मोह, बुवांचा लोभ, बुवांचा दंभ, बुवांची द्रव्यतृष्णा नष्ट झाल्याचा हा जगापुढें साक्षात्कार! आधीं वाघ्या असतां तो पाग्या झाला, तरी त्याचा मूळ स्वभाव बदलणें शक्य नाहीं. तसेंच सामान्य लोभी, द्रव्यतृष्णा ठेवणाऱ्या माणसाचें आहे.

त्याच न्हावीबुवाला, तो यात्रेला हरिद्वार मुक्कामीं आला असतांना प्रसाद म्हणून ज्ञानेश्वरीची एक प्रत, मी फार दिवसांपूर्वी दिलेली होती. व या ग्रंथानें '**तुझा भाग्योदय** होईल' म्हणून सांगितलें होतें.

त्यानंतर पुष्कळ दिवसांनीं, योगायोगानें, मी फाटक्याच पोषाखांत, दारिद्र्याच्या वेषांत त्याचे भेटीस गेलों असता, चार रूपवती स्त्रिया त्याला वारा घालीत होत्या! व ज्ञानेश्वरीचा दिव्य अर्थ जगाला सांगून त्या ग्रंथांतील तत्वाची स्वतःच विडंबना करणारा तो दांभिक 'न्हावी ज्ञानेश्वर' आरामपणें शेषशाईप्रमाणें मंचकावर पडलेला होता. मला पाहतांच न्हावीबुवा हृदयात घाबरले! मी निर्भीडपणें तेव्हा त्यास म्हटलें, "**गोऱ्या कुंभारा**प्रमाणें स्वतःचा धंदा करून, परमेश्वर-सेवा करा! आपला मूळचा धंदा करून परमार्थ कां करीत नाहीं? अद्याप तुमच्या मनाची द्रव्य-तृष्णा, नष्ट झालेली दिसत नाहीं! परमेश्वराची खरी सेवा करण्यास अद्याप तुम्हाला लज्जा, साशंकता वाटत आहेत. असें लोकांना फसवणें चांगलें नाहीं; हा खऱ्या संतांचा मार्ग नव्हे." माझे ते कटु शब्द बुवाच्या हृदयास फार झोंबले. त्याचे शिष्य माझ्या अंगावर येण्यासाठींहि सरसावले! पण न्हावीबुवा मला पूर्णपणें जाणत असल्यामुळें, आपल्या शिष्यांना त्यानें माघार घ्यावयास सांगितलें!

अज्ञाणी लोकांत अशी खुळी समजूत आहे, कीं, गुरुशिवाय मुक्ति मिळणें शक्य नाहीं; कोणी तरी वाटाड्या हा पाहिजेच. पण माझें म्हणणें तो एकांतांत 'कानफुंक्या' असूं नये! त्याच्यांत सामर्थ्य असेल, तर त्यानें जगाच्या कल्याणाकरतां, उघड उघड प्रकट होऊन गोरगरीबांचा, अज्ञाण्यांचा बुवा व्हावा. असल्या स्वार्थपूर्ण, भोगी व्यक्तीकडून कोणाला मुक्ति मिळणें शक्य

नाहीं; किंवा ईश्वरहि प्राप्त होणें शक्य नाहीं. कारण, मनुष्याचें ज्ञान किती केलें तरी अल्पच आहे; तो स्वतःच आंधळा आहे. तो परमेश्वरच नव्हे. कानफुंक्या गुरुकडून मुक्ति कधींच मिळणार नाहीं; तर मुक्ति ही बुद्धिबलानेंच आणि स्वप्रयत्नांनींच मिळेल!

स्वामी श्रद्धानंदांचें माझ्यावर अत्यंत प्रेम होतें. त्या वेळीं ते एकदां मुंबईस आले असता, मला मुद्दाम भेटण्याकरतां आले होते. येतांना त्यांनी माझ्यासाठीं उत्कृष्ट चरसहि आणला होता. आमची दोघांची प्रेमानें भेट झाली. दिल्लींतील हिंदु शुद्धिकरणासंबंधीं त्यांनी तेव्हा मला पुष्कळच माहिती सांगितली. त्यांच्या मृत्यूच्या आधींची, फार थोडे दिवसाची ही हकीकत आहे. त्यांच्या व माझ्या विचारांमध्यें फारच मतभेद होता. मी तेव्हां त्यांना म्हटलें, " प्रत्येक संन्याशानें एकेक शुद्धि करावी; आणि स्त्री व्यक्ति असेल, तर त्या व्यक्तीस नुसतें शुद्ध करून सोडूं नये, तर त्या त्या, शुद्धि करणाऱ्या संन्याशानें स्वतः, त्याच स्त्रीशीं आपलें पहिलें लग्न करावें; आणि ती शुद्धि टिकवावी. तीच खरी शुद्धि, तीच खरी पतितांची सेवा, तोच खरा उद्धार!"

" नुसती पंचगव्याची आणि होमकुंडांतून मोठमोठ्या ज्वाळा काढून करावयाची शुद्धि, किंवा प्रेमाच्या आकर्षणानें होणारी शुद्धि, ही खरी शुद्धीच नव्हे. रोटीबेटी व्यवहार न घडल्यामुळें शुद्ध झालेल्या व्यक्ति, पुनः मागील धर्मांत जात आहेत; त्या शुद्धिला दांभिक स्वरूप राहतें. खरी शुद्धि म्हणजे त्या व्यक्तिला समाजानें आपल्या जीवनांतील हाडामासाशीं, रक्ताशीं, हृदयाशीं, अन्नपाण्याशीं मिळवून, एकजीव करून घटक करून घेतलें पाहिजे! **हिंदुस्थानांत** माझ्या मतें **जवळजवळ** ( २००००० ) **दोन लक्ष संन्यासी फुकट गेलेला आहे.** ते जर एकेक शुद्धि करतील, शुद्धिकृत व्यक्तीशीं लग्न करून सत्याचरणानें चालतील, तर स्वराज्य काय, हिंदुधर्माला साम्राज्यहि मिळेल! परंतु हें धाडस संन्यासी लोक करीत नाहींत. मी मात्र असा निश्चय केला आहे कीं, जर असा एकादा शुद्धि करण्याचा प्रसंग दैवयोगानें आला व ती शुद्धि एकाद्या स्त्रीची असेल, तर ती शुद्धि मी करीनच, पण या संन्यासाचाहि त्याग करून तिच्याशींच विवाहबद्ध होईन; व खरा जगाच्या उपयोगीं पडेन.

संन्यासी म्हणजे समाजांतील बहिष्कृत व्यक्ति; संन्यासी म्हणजे मुडदा; संन्यासी म्हणजे निरुपयोगी व्यक्ति, अशी जी आजकाल समजूत झालेली आहे, ती मला पार बदलून टाकावयाची आहे. केवळ हिंदुधर्माकरतां ही गोष्ट मी करणार आहे. माझें स्वतःचें मत असें आहे कीं, परशुरामानें सर्वांना ब्राह्मण करण्याचा जो प्रयत्न केला, तो अपूर्व आहे ! त्यानें निःक्षत्रिय पृथ्वी करण्याचा प्रयत्न केला, त्याचा अर्थ मी असा करतों, कीं, **परशुरामाला जगाच्या पाठीवर एकच जात पाहिजे होती, ती म्हणजे ब्राह्मणजात.** 'ब्राह्मण व्हा; मी तुम्हांला ब्राह्मण करीन, दुसरें कोणी जगांत औषधाला उरूं देणार नाहीं!' असें तो म्हणत होता. जगाच्या उत्पत्तीच्या वेळीं एकदां सर्व मानवजात पूर्ण 'ब्राह्मणच' होती. ब्राह्मणानें ब्राह्मणत्व सोडलें व हातांत शस्त्र धरून तो दुसरें कर्म करूं लागला, त्यावेळीं तो ब्राह्मणपदापासून एक पायरी खालीं आला; व त्यास नांव क्षत्रिय पडलें ! क्षत्रियत्व टाकून ब्राह्मण होण्याचा खरा भगीरथ प्रयत्न पुनः केला विश्वामित्रानें ! सागावयाचें तात्पर्य असें, कीं, **जगांत सर्वच मूळचे ब्राह्मण होते व आहेत व यापुढेंहि** जगांतले सर्व लोक ब्राह्मणच झाले पाहिजेत ! ब्राह्मण होणें हेच ध्येय प्रत्येक जातीपुढें असलें पाहिजे ! त्यात दोष उत्पन्न होऊन निरनिराळ्या जातींचीं विशेषनामें, विशेषणें त्या त्या ज्ञातींना केवळ लागलेलीं आहेत. केवळ कांहीं जातींनींच नव्हे, तर सर्व जगानें 'ब्राह्मण बनावें' ब्राह्मण व्हावें, असें मला वाटतें. ब्राह्मण होण्यांत मानव-जातीचा खरा उद्धार असून ईश्वरप्राप्ति घडणें शक्य आहे. पाश्चात्य लोक आज खरे ब्राह्मण होत आहेत ! ब्राह्मण खरें होणें म्हणजे ज्ञान मिळविणें; ब्राह्मण दीन नसतो; ब्राह्मण दुर्बल नसतो; ब्राह्मण अज्ञाणी नसतो; ब्राह्मण होणें हाच मानव्याचा विकास आहे; व त्यांतूनच ईश्वराचा लाभ होणार आहे. सर्व बलांत ज्ञान हेंच मोठें बल, तेव्हां तें सर्व समाजानें संपादन करण्याकरतां 'ब्राह्मण' झालेंच पाहिजे !" मी श्रद्धानंदांना स्पष्ट सांगितलें, कीं, "मला शुद्धिचें कार्य जमून आलें, तर मी त्या व्यक्तीला ब्राह्मण करणार ! जगाला ब्राह्मण होण्याची दीक्षा देणें, हाच माझा खरा संन्यासधर्म आहे."

त्या वेळीं स्वामी श्रद्धानंदानीं मला मोठ्या आनंदानें आपला आशीर्वाद दिला. ते म्हणाले " तूं खरा ब्राह्मण आहेस. हीच ब्राह्मण्याची, ब्रह्माची, जगाची खरी सेवा. तूं असें एकादें शुद्धिकरण करून त्याच स्त्रीशीं लग्न कर; माझा तुला पूर्ण आशीर्वाद आहे. "

तदनंतरच ते दिल्लीला निघून गेले, व पुढे त्यांचा मृत्यु झाला! माझें शुद्धिकृत कार्य बघण्यास दुर्दैवानें ते राहिले नाहींत. त्यांच्या गमनानंतर थोड्याच दिवसांत शुद्धिचा एक योग येऊन, माझें लग्नहि झालें ! मला बुवाबाजी आधीं नकोच होती; आणि त्यांतून दांभिकबुवाबाजी तर मुळींच नको होती. माझें लग्न झालें, हाच मोठा ईश्वरी चमत्कार !



## प्रकरण २० वें



# विवाह !

मी संसारी कसा झालों, ही मोठी अद्भुत गोष्ट आहे. बाया ठेवून नायकिणी ठेवून आणि शिष्यसांप्रदाय वाढवून, सत्यनारायण करून, महंत, बुवा होणें, ही गोष्ट मला मुळींच अशक्य नव्हती. पण मला त्या गोष्टीचा वीट आला होता, हें पूर्वी मी सांगितलेंच. पण माझें लग्न कसें झालें, हें मला अखेरीस सांगितलें पाहिजे !

त्यावेळीं, माझ्या दर्शनाकरतां हजारो लोक येत असत. येणाऱ्या प्रत्येक भक्ताला मी माझ्या लग्नाची गोष्ट सांगत होतों. 'मला लग्न करावयाचें आहे; संसार करायाचा आहे;' असें सांगत होतो ! पण कोणाला तें खरेंहि वाटत नव्हतें. सर्वजण तो माझा प्रश्न हंसण्यावारी नेत होते.

योग असा आला कीं, सुंद्राबाई नांवाची एक परधर्मीय स्त्री आपल्या मुलीला घेऊन माझ्याकडे दर्शनासाठीं आली. माझ्याकडे कोणत्याच धर्माच्या मनुष्याला कधींहि मज्जाव नव्हता. तिनें आपणास व मुलीस शुद्ध करून घेण्याविषयीं मला फार विनंति केली. मी म्हटलें, "तुमची शुद्धि मी जाहीर-रीत्या करीन, पण तुमच्या मुलीशीं लग्न करीन; ही माझी अट मान्य असेल, तरच या शुद्धिच्या साहसांत मी पडणार आहे. नुसत्या शुद्धिच्या फार्साकरतां तुम्ही अन्य कोठेंहि जा ! मला शुद्धिचा दांभिकपणा नको आहे."

सुंद्राबाईनीं ती गोष्ट मान्य केली; आणि मीहि पण त्याच शुद्धिकृत मुलीशीं लग्न करण्याचा दृढ निश्चय केला. लग्नाचीहि तयारी चालविली. माझ्या भजनमार्गाशी जुळणारी, गोड गळ्याची मुलगी मला पाहिजे होती, व ती शुद्ध होणारी मुलगी तशीच होती.

त्यावेळीं, लग्नाचें ठरतांच मी स्पेशल मोटारनें त्या सर्वांना घेऊन आधीं वडिलांना भेटण्यासाठीं, चिपळुणास गेलों. मी मोठ्या प्रेमानें त्यांना तेव्हां भेटलों. वडिलांना मी माझी झालेली सर्व हकिकत स्पष्ट सांगितली.

ते म्हणाले, " मिश्रविवाह तूं ब्राह्मण्याकरतां करत आहेस, तर तूं खुशाल कर. अशा रीतीनें हिंदूंचा धर्म वाढेल. मात्र, या लग्नाचें बाबतींत मी तुला एक महत्त्वाची गोष्ट सागून ठेवतों, ती नित्य मनात वागव ! '**लग्न कर, पण हातांत काठी घेऊन, हें लग्न कर** ! ' हे ध्यानांत ठेव. तुझी ही लग्नाची गोष्ट '**अगो**'**ला**—आपल्या आईला मात्र, तूं बिलकुल सांगूं नकोस !"

भावी वधूला वडिलांच्या पायांवर घालून, आणि माझ्या लग्नाला त्यांचा आशीर्वाद मिळवून पुनः मी मुंबईस आलों. काशीचे एक उपाध्याय, ग्वाल्हेरचे एक सुप्रसिद्ध शास्त्री, आणखी १० ब्राह्मण, यांच्या सहाय्यानें त्या मुलीची व तिच्या [illegible] [illegible]ईची मी शुद्धि केली. शुद्धि झाल्यावर वेदोक्त रीतीनें मी त्या मुलीशीं लग्न लावलें. माझ्या निवासस्थानांत तेव्हा माझ्या शिष्यवर्गांत हाहाःकार उडाला ! कित्येक भगवे शिष्य तत्क्षणीं पळून गेले ! जे कित्येक चिकाटीचे व स्वार्थसाधु पक्के होते, ते, ' पुढें काय होतें !' म्हणून दम धरून राहिले ! मला मात्र तेव्हां अति आनंद झाला. मोठेंच कार्य मी केलें, असें मला वाटलें. संन्यासव्रत संसारात राहून चालवावयाचें, हाच मला परमेश्वराचा आदेश आहे, असें मला वाटलें. ब्राह्मणांना मी तेव्हां भरपूर दक्षणा दिली.

तेव्हां लग्न करण्यापूर्वी, मी माझ्या सर्व शिष्यांना एकत्रित केलें. त्यांना मी सांगितलें, " प्रिय शिष्यांनो ! मी आता लग्न करणार आहें ! आणि तुम्हीहि पण असे अविवाहित न राहता, एकेक शुद्धि करून, लग्नाच्या बंधनांनीं बद्ध व्हा. मी स्वतःच्या लग्नाविषयीं दृढनिश्चय केलेला आहे; त्यामुळें मजवर भयंकर संकटें येण्याचाहि संभव आहे. माझ्यावर तुमची भक्ति–दृढभक्ति असेल, तर माझ्या संकटांत तुम्ही सहाय्यार्थ असलें पाहिजे. तसें तुमच्या हातून घडत नसेल, तर, वाट फुटेल तिकडे तुम्ही आतां जाणें इष्ट आहे ! मी तुमचा गुरु नाहीं; तुम्ही माझे चेले नाहीं; मला असली बुवाबाजी यापुढें नको आहे."

तुंबाजी बोलला, " गुरुमहाराज, बेलाशक लग्न करा ! एकच काय दोन बायका करा ! "

मी थट्टेनें त्यास म्हटलें, " लग्न दुसरें, आणि फजिती तिसरी ! मला फक्त एकच लग्न करावयाचें आहे ! "

सुंद्राबाईची शुद्धि मीच करण्यासहि कारण घडलें; सुंद्राबाई आपल्या मुलीसह शुद्ध होऊन हिंदुधर्मांत येण्याकरतां ठिकठिकाणीं फिरली. शुद्धिच्या नगाऱ्यांत पोकळ भाग फार आहे, हें तिला ठाऊक नव्हतें! त्यावेळीं शुद्धि-कार्य धडाडीनें अंगावर घेणाऱ्या सर्वांच्याकडे ती खेपा घालून आली. पण कोणीहि तिला दाद दिली नाहीं! आचार्य, वीर, महंत, आणि महाराज, कोणीच तेव्हां तयार होईना. चालढकलच अधिक होऊ लागली. अशा स्थितींत ४ महिने तिनें परिश्रम केले. शेवटीं ती जेव्हा माझ्याकडे येऊन रडूं लागली, तेव्हां मी त्या मायलेकरांच्या शुद्धिचा निश्चय केला; आणि पूर्वील कथाभागांत सांगितल्याप्रमाणें, दोघींना शास्त्रोक्त समुद्रस्नान घालून आणि होमहवन करून शुद्ध केलें; व पुढें कांहीं दिवसांनीं, त्याच मुलीशीं मी स्वतः लग्न केलें; व मी संसारी झालों.

त्या माझ्या लग्नामुळें भयंकर खळबळ उडाली. निंदास्तुतीचें सगळीकडून एक प्रकारें रानच पेटलें. संन्याशी साधु तर, माझे त्या लग्नामुळें वैरीच बनले. एकीकडे हिंदुसमाज खवळला, तर दुसरीकडे खिस्तीसमाज मजवर तुटून पडला; आणि माझी फारच बिकट स्थिति झाली. पण मी निश्चय केला होता, कीं, कांहींहि होवो, प्राण गेला तरी बेहत्तर, पण असें एक उदाहरण घडवावयाचेंच. पोकळ कार्य नको! त्या वेळीं प्रथम मला इतकें लोकांनीं भिववून सोडलें, कीं, निंदास्तुतीच्या भयानें मी त्या सर्व कुटुंबास घेऊन खूप दूर नर्मदातटाकीं गेलों. आणि ४ महिन्यानंतर पुनः मुंबईस आलों!

मुंबईस येतांच एका मनुष्यानें माझ्याकडे येऊन मला दटावून सांगितलें कीं, "ही बाई पूर्वीची हिंदु असली, तरी ती खिश्चन झालेली आहे, आणि ही मुलगीहि पण खिश्चन नवऱ्यापासून झालेली आहे. तेव्हां त्या दोघींना तुम्ही आपल्या मठांतून हाकलून लावा!"

मी उत्तर दिलें, "माझ्याकडे शरण आलेल्यांना मरण देण्यापेक्षां माझा मृत्यु झालेला बरा. मी त्यांना केव्हांहि हाकलणें शक्य नाहीं; एवढ्याकरतांच मी स्वतः त्या मुलीशीं लग्न केलें आहे." त्या माझ्या उत्तरानें तो गृहस्थ चडफडत निघून गेला.

लग्न होताच सर्वच गोष्टींत फरक पडला. प्रिय शिष्य जे दुधाच्या लोट्या बदाम पिस्ते नित्य फस्त करून खुशाल पडलेले होते तेहि उलटले! तुंबाजी तर त्या शुद्धिकृत मायलेकराना स्पष्ट सांगू लागला, कीं, "काय केलंत हें? या अघोर योग्याशीं तुम्ही आपल्या मुलीचं लग्न लावलंत? अहो, हा ढोंगी साधु दुसरं सुद्धा लग्न करणार आहे! हा बोलतो त्यावर मुळींच विश्वास ठेवूं नका. या योगी मनुष्याला अद्याप एक सिद्धी मिळवावयाची राहिलेली आहे. ती मिळविण्यासाठीं या अघोर साधूनें हे लग्न केलें आहे. त्याला आणखीहि एका मुलीची अत्यंत जरूरी आहे. हा साधु सिद्धि मिळविण्याकरतां त्या दोघींना हिमालयांत घेऊन जाणार आहे. आणि त्या ठिकाणीं, त्या दोघींना एका दगडावर बसवून आणि त्यांच्या मस्तकांवर हात ठेवून, त्यांचें तात्काळ भस्म करून टाकणार आहे. त्या योगामुळें आणि भस्मप्राप्तिमुळे त्याला सिद्धि प्राप्त होणार आहे. तरी तुम्ही या मनुष्याच्या मागे न लागतां आपला आणि आपल्या मुलीचा जीव वाचवा, अनर्थ टाळा. मी त्याचा फार जुना शिष्य आहे; मी सांगतों यावर विश्वास ठेवा!"

तोच तुंबाजी शिष्य माझ्याकडे येऊन म्हणाला, "हे लोक चांगले नाहींत. तुम्ही एकादी ब्राह्मणाची मुलगी बायको करा. मी तुम्हाला ती शोधून देईन!"

मी त्यास उत्तर दिलें, "तुंबाजी, मी हें सारें धर्माकरतां करीत आहें. यांत मला मरण आलें, तर ते मी संभाजीचे मरण समजेन. विषयलालसेनें हें लग्न मी मुळींच करीत नाहीं. तूं मला शिकवूं नकोस. माझ्या हातून एवढेंच धर्मकार्य होऊन मी मेलों तरी जन्माचें सार्थक झालें, असें मी समजेन." तेव्हां तुंबाजीचा निरुपाय होऊन आणि तो हिरमुसला होऊन माझा आश्रय सोडून निघून गेला. त्याच्यानंतर सर्व शिष्यांची मी हाकालपट्टी केली. मी म्हटलें "आतांपर्यंत तुम्ही खूप चरलात, आतां कोठेंतरी जाऊन धर्मकार्य करा; किंवा पवित्र क्षेत्रीं जा."

त्यावेळीं माझ्यामागें संकटांची परंपरा लागली. बाईचा एक मुलगा रागानें माझ्यावर धांवून आला असतां त्याच्या बहिणीनें, (माझ्या बायकोनें) त्याचा हात धरून त्याला मागें ओढलें. पण कळस झाला, तो पुढेंच!

शिष्यशत्रु जरी निघून गेले, तरी त्या बावटळीचा परिणाम त्या मायलेकीवर एवढा झाला, कीं, कुठले धर्मांतर नी काय,–त्या मलाच सोडून भयानें एक दिवस पळून गेल्या !

माझें मन अत्यंत निराश झाले. ज्यांच्याकरतां मी हें सारें केले, तीं माणसेंच आपल्यावर उलटावीं याहून आपलें खडतर दैव कोणते, असें मला वाटलें ! पण मी थोडेंहि धैर्य सोडलें नाहीं. मठींत मी एकटाच राहिलों. चारी बाजूंनीं तेव्हां मजवर हल्ले ! युद्धास मी सज्जच झालो. माझेंहि डोकें भ्रमण करूं लागलें. करावयास गेलों काय आणि आतां झालें काय असें मला वाटलें. **मिश्रविवाह अखेरीस दुःखदायकच ठरतात** असेंच माझ्या मनात वारंवार येऊं लागलें; आणि त्याच वेळीं वडिलांच्या त्या थोर वाक्याची आठवण झाली, कीं, “ लग्न कर, पण हातांत काठी घेऊन कर ! ” खरोखर, तें वाक्य किती महत्त्वाचें होतें; सोन्याच्या शाईनें तें लिहून ठेवण्यासारखें होतें !

त्या दिवशीं माझा मठ म्हणजे एक बालेकिल्लाच झाला; रणक्षेत्र झालें ! त्या दिवशीं काय झालें कोणास ठाऊक मला उन्माद झाला. मी त्या दिवशीं दारूहि घेतली ! आणि ती फारच अंगावर आली. मठात तेव्हा आसमंतांत मी कांचाच कांचा पसरल्या ! मला असें वाटलें कीं आतां कोणी त्यांवरून येणार नाहीं !

माझी फजिती पाहण्यास त्या दिवशीं खूपच गर्दी लोटली ! खिश्चन, हिंदु, सर्व जातींचे लोक हजर होते. संध्याकाळीं माझ्या मठीजवळ रस्त्यावर एक मोटार शत्रुकडून गुप्त उभी ठेवण्यांत आली होती ! मला ती गोष्ट मुळीच माहीत नव्हती ! मला वाटलें, ती मोटार भाड्याची असावी. म्हणून मी मोठ्या ऐटीनें त्या मोटारपाशीं गेलों; मोटार ड्रायव्हरला विचारलें, “ मोटार खाली आहे ? ”

ड्रायव्हरनें उत्तर दिलें, “ हां जी ! खालीहि है. ” म्हणून मी त्या मोटारींत जाऊन बसलों. ती मोटार शत्रूची होती. त्या मोटारींत बसण्यानें भांडण सुरूं झालें ! आंत जाऊन बसून १० मिनिटें झाल्यावर मोटारड्रायव्हर माझ्याजवळ

आला, आणि मला म्हणाला, "ही मोटार दुसऱ्याकरतां आहे, तुम्ही खालीं उतरा!"

मी त्याला रागानें उत्तर दिलें, "तूं पहिल्यांदांच ही गोष्ट, मला कां सांगितली नाहींस?" आणखीहि उभयतांची बाचाबाची झाली. तो माझ्या शर्टला हात घालून मला खालीं उतरविण्याचा प्रयत्न करूं लागला. माझा राग अनावर झालेला होता. मी गाडींतून मुळींच उतरलों नाहीं. माझ्या अंगाला हात लावताच त्याला मी जोरानें तडाखा देऊन गाडीच्या बाहेर लोटून दिलें. अखेरीस प्रकरण पोलीसपर्यंत गेलें. दोन पोलीस तेथें आले, व त्यानींहि मला खूप धमक्या दिल्या. मी त्यांनाहि काहीं वेळ दाद दिली नाहीं. मी त्यांना म्हटलें, "मला तुम्ही एकट्यालाच कां पकडतां आणि एकट्यालाच कचेरीकडे कां नेतां? दोघांचें भांडण असतांना तुम्ही आम्हा दोघांनाहि सरळपणें कचेरींत न्या!" त्या वेळीं त्या गर्दीत मजवर चोहोंकडून हल्ला झाला. पोलीस मला जबरदस्तीनें त्या मोटारींतून खालीं उतरविण्याचा प्रयत्न करूं लागले. शेवटीं मला बळजबरीनें बाहेर, ओढून काढण्यांत आलें. त्यावेळीं मी रस्त्यावर बेशुद्धच होऊन पडलों. सर्व मस्तक रक्तबंबाळ झालें होतें. गळयास फास घालून कोणी तरी आवळल्यासारखें वाटत होतें; कारण, त्यावेळीं माझी जीभ बाहेर पडली होती. पोलीस दंगा शांत करीत होते; व आम्हां दोघांना कचेरीकडे नेण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होते.

त्यावेळीं मी बेशुद्ध पडल्यावर सर्वांचीच खात्री झाली, कीं, "मी मेलों!" पण थोड्याच वेळांत मी 'श्रीमहालक्ष्मीचें' नांव घेऊन व तिचा प्रचंड जयघोष करीत उठून उभा राहिलों! त्यावेळीं मी रक्तानें पूर्ण न्हालों होतों. धर्माकरतां हाल हाल होऊन मरणाऱ्या संभाजीमहाराजांचें मला तेव्हां स्मरण झालें. त्या स्मरणानें मला धैर्य दिलें! त्यावेळीं मी जे कित्येकांना नुसते हिसके दिले, त्या कित्येक हिसक्यांबरोबर कित्येकजण दूर सहज कोलमडून पडले.

त्यानंतर मला पोलीसस्टेशनमध्यें नेण्यांत आलें; व तेथें जामीन मागण्यांत आला. मी म्हटलें, "मला जगांत कोणीहि जामीन नाहीं; माझे हातपायच मला जामीन आहेत!"

पुढें, माझ्यावर रीतसर खटला करण्यांत आला, व मला तारीख देण्यांत आली. पकडलेल्या दिवशीं पुनः त्याच मोटारींतून मला परत मठींत पोंचतें करण्यांत आलें! अशा रीतीनें मी माझा इष्ट पुरवला.

तारखेच्या दिवशीं मॅजिस्ट्रेटसाहेबानीं सर्व खटला ऐकून घेतल्यावर मला विचारलें, " तुम्हाला कांहीं सांगावयाचें आहे?"

मी ठणठणीत उत्तर दिलें, "माझा कोणीहि या जगांत शत्रू नाहीं! मला कांहींच सांगावयाचें नाहीं! मी निर्दोषी आहें."

माझ्याविरुद्ध पुरावा कांहींच होऊं शकला नाहीं; मला '**पूर्ण निर्दोषी**' म्हणून सोडून देण्यांत आलें!

मी त्या खटल्यांतून, निर्दोषी म्हणून सुटतांच शत्रुपक्षाचें बळच खचलें! त्याची सर्वत्र पळापळ झाली! पुनः मी सुंद्राबाईस व बायकोस परत बोलावून आणून व्यवस्थितपणे संसारास आरंभ केला! त्या पत्निपासून मला पुढें मुलेंहि झालीं. तीन मुलगे आणि तीन मुली आज हयात आहेत. अशा रीतीनें मी संन्याशाचा संसारी झालों. योग्याचा संसारानुरागी झालों! माझ्या पत्निनें मला अत्यंत सुख व समाधान दिलें. गृहस्थाश्रमांत राहूनच सर्व पुरुषार्थ साधतील, व परमेश्वराची सेवा घडून तो भेटेल, अशी मला खात्री पटली. संसारी मनुष्याला ज्या तेरा गोष्टींची किंवा गुणांची पूर्वपुण्याईनें अनुकूलता पाहिजे, त्यांतील बहुतेक गोष्टी मला अनुकूल झाल्या, व परमेश्वराच्या-नारायणाच्या भक्तिमध्यें, मी आपले दिवस आनंदानें काढीत आहें!

## प्रकरण २१ वें

( स्वामीजींचे एक पट्टशिष्य श्री. मोरेश्वर बापूजीशेठ मेंगळे रहिवासी मुंबई, यांनी सांगितलेली हकीकत )

# स्वामींचे चमत्कार !

मला एका सामुद्रिकानें पूर्वी सांगितलें होतें कीं, "मेंगळेशेठ ! तुमच्या एका हातामध्यें, तलप्रदेशात, मस्तकरेषा व अंतःकरणरेषा यांच्यामध्यें एक "La croix mystique" म्हणजे गुह्यविद्या, गूढविद्या, धर्म, आणि अध्यात्मविषयाची आवड असणे याचें निदर्शक स्पष्ट फुलीचें चिन्ह आहे. त्या चिन्हाचा अर्थ असा होतो कीं, गूढविद्या, धर्माचरण, इंद्रजाल, यांत तुमचे मन सदोदित गुंतून राहील. अध्यात्मविषयामध्ये तुमची चागली गती होईल. ईश्वराशीं प्रत्यक्ष संबंध जोडण्याची शक्ति, इच्छा, तुमच्यामध्यें उत्पन्न होईल ( The doctrine that man may by self surrender and spritual apprehension attain to direct communion with God, अशी मानसिक स्थिति ). सामान्य ज्ञानाच्या कक्षेहून तुमच्यांत विशेष दूर दृष्टीचें अध्यात्मिक ज्ञान राहील. आणि तशा ज्ञानाचा तुम्ही लाभ घेऊन, जीवनाचा मार्ग काढाल." आणखी त्याने पुष्कळच सांगितलें होतें. पण तें बाकीचें सर्व मी विसरून गेलों. लहानपणापासून साधुसंतांची मला आवड होती, व अजूनहि आहे, एवढेंच येथें मला सागावयाचें आहे !

१९१० सालीं श्री केशवानंद सरस्वतीस्वामींचें मला प्रथम दर्शन झालें ! त्यावेळीं महाराजांची स्वारी भुलेश्वरीं होती. त्याच्यावर श्रद्धा बसण्यास त्यांचे अनेकविध चमत्कारच मला कारण झाले. जे चमत्कार मी पाहिले, ऐकले व सत्य आहेत अशी खात्री पटली, त्यांतील कांहीं थोडेच मी येथें देत आहें. कारण स्वतः महाराज चमत्कार करून दाखविण्याच्या अगदीं विरुद्ध आहेत. प्रसिद्धी तर त्यांना नकोच आहे. व द्रव्यबाबतींतहि ते उदासीन आहेत.

म्हणूनच इतके दिवस ते गाजावाजापासून दूर राहिले. आजहि मी त्यांच्यावरील माझ्या उत्कट प्रेमामुळेंच, कांहीं चमत्कार या पुस्तकांत सांगण्यास तयार झालों आहें. अर्थात् गुरुआज्ञा नसतांना ही गोष्ट मी, दुःखी, उदास, धर्मजिज्ञासु व ईश्वरीप्रेमासाठीं तळमळणाऱ्या माझ्यासारख्या अन्य व्यक्तिंनांहि दुःखनिवाणार्थ उपयोग व्हावा, म्हणून करीत आहे. श्रद्धा असेल त्याचें दुःख निवारण होईल, असें मला वाटतें.

भुलेश्वरीं महाराज असतांना ज्या घरीं ते रहात होते, तेथें एक अद्भुत चमत्कार प्रथम मी पाहिला. यजमानाचा मुलगा एक दिवस मंदिलाकरतां हट्ट धरून बसला होता. मंडळी त्यास पुष्कळ समजावीत होती. पण तो कोणाचेंच कांहीं ऐकेना. तेव्हा महाराजांनीं सर्व मंडळींदेखत त्या मुलास आपल्याकडे हाक मारली. आणि ते त्याला गंमतीनें म्हणाले, " काय पाहिजे ?"

अज्ञान मुलानें उत्तर दिलें, " मला जरीचा मंदिल पाहिजे !"

महाराज हंसले; ते म्हणाले उपमन्यूला परमेश्वरानें क्षीरसमुद्र दिला, तुला तो मंदिलहि देत नाहीं ? घे देवाचें नांव ! आणि एक समोरच्या झाडाचें जास्वंदीचें फूल आणून दे ! मी तुला मंदिल देतों ! सर्वांना महाराजांच्या बोलण्याचा फार चमत्कार वाटला. मंडळी चमत्कारासाठीं अगदीं उत्सुक होऊन बसलीं !

मुलानें जास्वंदीचें फूल आणून तें महाराजांच्या हातांत दिलें ! महाराजानीं तें फूल आपल्या उजव्या हाताच्या चिमटींत घट्ट धरून ठेवलें, आणि मुलास त्यानीं आज्ञा केली, कीं, " बाळ ! तुला जेवढा मोठा मंदिल पाहिजे असेल तितकें, हें फूल लांब ओढ ! "

मुलानें फूल ओढावयास सुरुवात केली, तों त्यांतून सुंदर मंदिल निघूं लागला. तो मंदिल साधा नव्हता, तर दोन्हीबाजूंस जरीची किनार असलेला असा निघाला. ज्या वेळीं त्या मुलाला आपल्याला एवढा लांब मंदिल पुरे असें वाटलें, तेव्हा महाराज त्यास म्हणाले, " बाळ, आतां इकडे येऊन माझ्या मुठीपासून तो कात्रीनें कापून घे ! " मुलानें तसें केलें ! महाराजांनीं उघडलेली मूठ जेव्हां सर्व मंडळींनीं पाहिली, तेव्हां त्या मुठींत कांहींहि नव्हतें !

## दुसरा चमत्कार

फणसवाडींत एका मोठ्या दुकानांत महाराजांची स्वारी संध्याकाळीं बसलेली असतांना त्या दुकानदाराचा एक नोकर आपल्या मालकाकडे २ रुपये मागण्यास आला.

मालक त्याला म्हणाला, " थोडावेळ थांब ! "

पण त्या नोकरास दोन रुपयांची आणि तेथून जाण्याची इतकी घाई झालेली होती, कीं, तो मालकास एकसारखा तगादा लावूं लागला !

मालकानें पुनः त्यास म्हटलें, " फार घाई करतो आहेस ? "

नौकरानें सरळ उत्तर दिलें, " साडेआठ वाजायला आले....! "

मालकानें ओळखले, कीं, याला दोन रुपये पाहिजे आहेत, ते दारूकरतां• कारण, तो नोकर दारुबाज होता हें त्यास ठाऊक होतें. नंतर दुकान बंद होणार होतें ! मालकानें ती नौकराची गोष्ट महाराजाना सागितली.

महाराज तेव्हां त्या नौकरास म्हणाले, " उशीर झाला तरी हरकत नाहीं. मी तुला इथंच दारू देतों. पण माझी एक अट आहे ! "

नौकरानें उत्कंठेनें विचारलें, " कोणती अट ? "

महाराज म्हणाले, " तूं संसारी आहेस ना ? आणि दारू पितोस ? पण पी !–वाटेल तितकी दारू पी ! माझी अट एवढीच आहे, कीं, आज तुला भरपूर पोटभर दारू प्यावयास मिळाल्यावर उद्या पिऊं नको ! जन्माची दारू सोड ! घे परमेश्वराची शपथ ! "

नौकरानें तसें केलें !

महाराज उद्गारले, " जा ! एक पाण्याची घागर घेऊन ये ! "

नौकरानें पाण्यानें भरलेली घागर महाराजांच्या पुढें आणून ठेवली. महाराजांनीं त्या घागरीवर आपला एक मोठा हातरुमाल टाकला आणि थोड्याच वेळांत देवाच्या नांवाचा जयघोष करीत त्यानीं तो रुमाल तात्काळ काढला. ती सर्व जागा बेवड्याच्या वासानें दरवळून गेली ! नौकरानें हपापल्या

वृत्तीनें तो बेवडा यथास्थित घशाखालीं घातला, आणि थोड्याच वेळांत त्याची इतकी तृप्ति झाली, कीं, तो तत्क्षणींच उद्गारला, " अशी दारू मी जन्मात कधींच प्यालों नाहीं ! माझी पूर्ण तृप्ति झाली. आजपासून मी दारू सोडली ! " असें म्हणून खरोखरीच त्यानें त्या दिवशीं प्रतिज्ञा करून जन्माची दारू सोडली.

## तिसरा चमत्कार

एक दिवस स्वामींच्याकडे एक प्रख्यात बडा जादूगार आला. तो जातीने मुसलमान होता. जगभर त्यानें प्रवास केला होता. त्याच्यात गाडी थांबविण्याचें, गाडी रोकण्याचें अद्भुत सामर्थ्य होतें. तो महाराजाना म्हणाला, " मी विजेनें चालणारी गाडीहि, तात्काळ थांबवूं शकतों ! "

महाराज म्हणाले, " बहोत अच्छा ! " असें म्हणून त्यांनी आपल्या जवळची काड्याची पेटी हळूच त्याच्यापुढें सरकविली; ताबडतोब ती पेटी सर्वत्र पळूं लागली ! स्वामी त्या जादुगारास म्हणाले, " ही काड्याची पेटी रोखून दाखव पाहूं ! "

जादुगारानें काड्याची पेटी थांबविण्याचा खूप प्रयत्न केला, पण काहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं तो स्वामींना शरण येऊन म्हणाला, " आपली शक्ति, कृपा करून खेचून घ्या. आपल्या अद्भुत सामर्थ्यापुढें माझी विद्या काम करूं शकत नाहीं ! " त्या वेळीं महाराजांनीं काड्याच्या पेटीची गती बंद केली !

असे चमत्कार महाराज वेळोवळीं करीत असत. चिलमीस ते आपल्याकडे बोलावत असत, व महाराज बसल्या जागीं ती आपोआप चालत येत असे. तसेंच तहान लागली म्हणजे पाण्यानें भरलेल्या तांब्यास आपल्याकडे येण्याची आज्ञा ते देत; तो तांब्या सरळ त्यांच्याकडे येई ! परंतु हे सर्व चमत्कार महाराज जेव्हां पूर्ण लहरींत असत तेव्हांच घडत. तहान लागली असतां सुंदर द्राक्षांचे घड निर्माण करून ते तान्हेलेल्यास देणे, अनेक खाद्य पदार्थ निर्माण करणें या गोष्टी त्यांच्या नित्याच्या होत्या.

## चौथा चमत्कार

मांडवी कोळीवाड्याची महाराजांच्यावर फार श्रद्धा. त्यांचा एक भक्त

नाखवा महाराजांना भेटण्याचा दृढनिश्चय करून महालक्ष्मीकडे त्यांच्या पर्णकुटींत गेला. पण महाराज तेथें नव्हते. ते हरिद्वारास जाऊन ६ महिने झाल्याचें समजलें. तेव्हा तो निराशेनें परतला. वाटेंत त्याचें, स्वामींच्याबद्दल चिंतन चाललेंच होतें. अर्धी वाट चालून आल्यावर त्याच्या वाटेंतच महाराज त्यास आकस्मात भेटले. नाखवा म्हणाला, "महाराज! आपल्या दर्शनाकरतां मी आपल्या मठीकडे गेलों होतो पण तेथें कुलुप होतें. आपण हरिद्वारास गेल्याचें समजलें.

महाराज म्हणाले, "आता मी आलो आहेना? चल माझ्याबरोबर मठींत!"

दोघेहि परतून मठींत आले. महाराज आसनावर बसले, नाखव्यानें त्यांच्या चरणावर मस्तक ठेवून आशीर्वाद घेतला.

महाराज म्हणाले, "झाला तुझा संकल्प पूर्ण? जा आतां!"

नाखवा आनंदानें मठीच्या बाहेर आला; आणि पुनः मठीकडे मागें वळून पाहतो, तों दाराला बाहेरून पूर्वीप्रमाणेच कुलुप! त्याला फारच आश्चर्य वाटलें!

## पांचवा चमत्कार

मारुतीवर श्रद्धा असणारा एक मनुष्य स्वामींच्या दर्शनास आला होता. स्वामींचें दर्शन घेऊन काहीं त्यानें दक्षणा कमंडलुमध्यें टाकली आणि प्रसादाच्या अपेक्षेने तो हात जोडून उभा राहिला. महाराज त्यास म्हणाले, "तुम्ही हा कमंडलु पालथा करा, जें काहीं निघेल तें प्रसादादाखल घेऊन चला! भक्ताने हर्षानें कमंडलु पालथा केला, त्यांतून मारुतीची एक सुंदर प्रतिमा आणि फुलाचे ताजे दोन मोठे पुष्पहार बाहेर पडले. हे प्रकार कसे होत असत त्याची कांहींच मीमांसा होत नाहीं. तसेंच, एका बाईला दत्ताच्या पादुका पाहिजे होत्या. महाराज म्हणाले, "....या दुधाची गुळणी घे." बाईनें गुळणी घेऊन खालीं टाकतांच त्यांतून दत्ताच्या चिमुकल्या पादुका पुढें निर्माण झाल्या!

## साहवा चमत्कार

एकदा मी बऱ्याच वर्षांच्या करारानें, एकदम रकम आगाऊ देऊन एक जागा दुकानाकरतां भाड्यानें घेतलेली होती. त्या इमारतीचा वेळोवेळीं 'सेल'

होत होता; पण मी कधींच जागा सोडली नाहीं. चौथ्या खेपेस जेव्हां सेल होऊन ती जागा एका खरेदीदारास मिळाली, तेव्हा तो मला फारच त्रास देऊं लागला. मी जागा खालीं करावी म्हणून अनेक आडवणुकीचे प्रयोग त्यानें सुरू केले. मी त्यास स्पष्ट म्हटलें, माझी रक्कम मिळाल्याशिवाय मी या जागेचा ताबा तुम्हास देऊं शकत नाहीं. भांडण अगदीं विकोपास गेलें होतें. द्रव्य व अब्रु असा दोन्हींचा तेव्हां प्रश्न होता.

एक दिवस रात्रीं मी माझ्या एका गरीब स्नेह्यास बरोबर घेऊन स्वामींच्या-कडे गेलों. रात्रीं ११ वाजले होते. मठात जाऊन प्रथम हलकेंच दाराची कडी वाजविली; पुनः जरा जास्त जोरानें दुसऱ्यादां वाजविली; तरी दाद लागली नाहीं. तिसऱ्यांदा अधिक मोठ्यानें वाजविली; तेव्हा आतून महाराजानीं मला प्रश्न केला, "कोण आहे?"

मी नम्रतेनें उत्तर दिलें, "आपला गरीब मेंगळे!"

पुनः महाराज म्हणाले, "कोण?"

मी पुनः जबाब दिला, "मेंगळे शेठ."

"कोण?" पुनः महाराज मोठ्यानें म्हणाले.

मी म्हटलें, "मेंगळेशेठ आले आहेत!"

त्या बरोबर स्वामी प्रेमानें उठले आणि त्यांनी दरवाजा उघडला! त्यावेळीं स्वामी हर्षानें स्वतांशीं म्हणाले, "माझा भक्त मेंगळेशेठ आला खरा! बस तिकडे!" असें म्हणून त्यानीं एका जागेकडे अंगुलीनिर्देश केला. मी व माझा गरीब मित्र दोघेहि बसलों! माझ्या गरीब मित्राला नौकरी नव्हती. तो नौकरीच्या संकल्पानें आलेला होता. तो माझा मित्र मला फार दिवस स्वामींची भेट करून देण्याबद्दल एकसारखा आग्रह करीत होता. 'तुझ्या नशिबाचा योग आल्याशिवाय आपणांस तिकडे जाण्याची बुद्धि होणार नाहीं,' असें म्हणून मी त्यास टाळत होतों. पण त्या दिवशीं मात्र, त्याला बरोबर घेऊन जाण्याची मला इच्छा झाली. माझें मन मला म्हणालें, 'आज याचें कार्य होईल.'

आम्ही बसल्यावर स्वामीजी उद्गारले, "काय काम आहे ! इतक्या रात्रीं का आलां ?"

त्यावेळीं मी त्यांना गहिंवरून म्हटलें, "आपण सर्व कांहीं जाणत असतां मला का विचारतां ? मी कां आलों, कशाकरतां आलों, हें आपण जाणतां. हा प्रसंग आपल्या स्वतःवरच आहे असें समजा. यावेळीं मी फार संकटांत आहें."

तेव्हां स्वामीनी जबाब दिला, " जा ! तुझें काम झालें आहे; तुला पाहिजे असलेली रक्कम मागून घे, मिळेल!"

माझ्या मनानें उत्तर दिलें, " तुझें कार्य खास झालें ! चल आता ! " पण माझ्या मित्राकरतां मी अत्यंत प्रेमानें महाराजांना विनंति केली, " महाराज ? माझें काम केलें, यात नवल ते काय ? आईनें लेकराचें काम केलेंच पाहिजे ! नाहींतर ती आई कसली ? हा माझा एक गरीब मित्र आहे; याचें नांव......हा बिचारा उत्कृष्ट बल्लवाचार्य आहे ! पण कायमची नौकरी अशी कुठें त्यास लागत नाहीं. हा माझा मित्र म्हणजे साक्षात् ' अन्नपूर्णेचा अवतार 'च आहे ! यास उत्तम नौकरी पाहिजे आहे. श्रीमंत लोकांना नौकऱ्या मिळतील, पण गरिबांना ती कशी मिळेल याची फार चिंता असते."

स्वामी तेव्हां थट्टेनें म्हणाले, " आणखी गांवांतले लोक गोळा करून इकडे घेऊन येत जा ! "

मी प्रेमानें उत्तर दिलें, " लोखंड आहे म्हणून सोन्याला किंमत आहे. प्रजा आहे म्हणून राजा आहे. भक्त आहेत, म्हणूनच संतहि आहेत ! "

स्वामी थट्टेनें उद्गारले, " मंगळेशेठ ! मला असं वाटतं, कीं, तुला गळ्यांत ताईत करून ठेवावा ! तू माझा फार प्रेमळ भक्त आहेस. जा; तुझ्या गरीब मित्राचेंहि कार्य होईल. उद्यां सकाळीं ६ वाजतां एक मनुष्य याच्याकडे येऊन याला बोलावून घेऊन जाईल. व तेथें त्यास अगदीं सरकारी नोकरीप्रमाणें कायमची नौकरी मिळेल ! " नंतर आम्ही महाराजांना वंदन करून व निरोप घेऊन रात्रीं बिऱ्हाडीं परत आलों.

दुसरे दिवशीं माझ्या बाबतींत असें घडलें, कीं, जो दुकानचा खरेदीदार माझ्याकडे पुनः येणें शक्य नव्हतें, तो मोटार घेऊन स्वतः अगदीं सकाळीं

८ चे सुमारास आला. व मला लगबगीनें हांक मारून प्रेमळपणें म्हणाला, " मेंगळेशेठ ? तुमचेबरोबर मला अगदीं अत्यंत प्रेमानें दोन गोष्टी बोलावयाच्या आहेत. " मी म्हटलें, " बोला ! अवश्य बोला ! "

आमच्या दोघांच्या बोलण्यांत, आमच्या भांडणाचा पूर्ण निकाल लागला ! मी तोंडांतून रकमेचा जो आंकडा काढला, तोच त्यानें तात्काळ मान्य केला. मी त्यास शेवटीं म्हटलें, " आज संध्याकाळीं आपण दोघे अमुक...वकिलाचे-कडे जाऊं. ते माझे कायमचे व श्रद्धा असलेले खरे वकील आहेत. ते सांगतील त्याप्रमाणें नंतरचा व्यवहार करूं. " ती गोष्ट त्या शेठनेंहि मान्य केली, व तो पुनः मजकडे आला. उभयता आम्ही वकीलाकडे घरीं गेलो. वकीलसाहेब चौपाटीवर फिरावयास गेलेले होते. आम्ही बराच वेळ बसून राहिल्यावर ते आले. घरात त्यानीं पाऊल टाकतांच ते समाधानानें मला म्हणाले, " कां ? झाली एकदाची तडजोड ? आनंद झाला ! चार हजारांत सर्व कांहीं तोडून टाका ! "

मी आश्चर्यानें वकिलसाहेबाना म्हटलें, " आम्ही आज आपसात ठरविलेला आंकडा तुम्हाला कसा समजला ? "

वकीलसाहेबानीं उत्तर दिलें, " गुरुकृपेनें; अंतर्ज्ञानानें !" पुढें ते थट्टेनं म्हणाले, " अरे बाबा, वकीलसुद्धा अंतर्ज्ञानी असतो ! मी आपला उगीच अंदाजानें बोललों !"

मी म्हटलें " हाच माझ्या गुरुदेवाचा साक्षात्कार आहे ! नाहींतर तुमच्या तोंडून हा आंकडा बाहेर येणें शक्यच नव्हतें ! " वकीलसाहेब मात्र हंसले !

आम्ही दोघे बाहेर पडल्यावर तो घरमालक मला मोटारींत म्हणाला " मेंगळेशेठ ? मी तुम्हाला खरं सांगूं ? काल रात्रीं मला एक स्वप्न पडलें, आणि एक चमत्कार दिसला. भगवान शेषशाईची मूर्ति मला स्वप्नांत दिसली. आणि त्या मूर्तिनें हंसत हंसत मला म्हटलें, " अरे ? तूं कोणाबरोबर लढतो आहेस ? माझ्या भक्ताला एकाद्या राजमुकुटाप्रमाणें मी माझ्या डोक्यावरहि नाचवीन. त्याचीं पाऊलं मी माझ्या हृदयावरहि ठेवून घेईन ! आताच्या

आतां तूं त्याच्याकडे जा, आणि तो म्हणेल त्याप्रमाणें कर. नाहींतर तुझ्यावर सर्वप्रकारें क्षोभ होईल!" त्या स्वप्नानें मी जागा होऊन आज सकाळीं तात्काळ तुमच्याकडे आलों. तुमचे गुरु कोण?"

मी म्हटलें, "माझे गुरु एकच आहेत. ते म्हणजे केशवानंद सरस्वती. त्याच्याशिवाय माझें कोठेंहि प्रेम नाहीं, भक्ति नाहीं."

दुसरे दिवशीं सकाळीं माझ्या मित्राकडेहि एक मनुष्य आला. तो एका विख्यात कॉलेजच्या हॉस्टेलचा सेक्रेटरी होता. त्यानें माझ्या मित्रास कायमची नोकरी मिळवून दिली व तो माझा गरीब मित्र सुखी झाला.

## सातवा चमत्कार

बालकृष्ण म्हणून एक, महाराजांचे परम भक्त. त्याना महाराजांनी प्रसन्न होऊन एक प्रचंड वाघाचें कातडें बक्षिस दिलें होतें. बालकृष्णबुवा सुरस कीर्तन करीत असत. ते वाघाचे सुंदर कातडें, महाराजाच्या हिमालयांतील एका शिष्याने महाराजांकडे प्रेमानें पाठविलेलें होतें.

बाळकृष्णपंतानीं तें व्याघ्रचर्म कमावण्याकरतां एका चांभाराकडे दिलें. चाभारास त्या कातड्याचा लोभ उत्पन्न झाला. बालकृष्णपंत त्या चर्मकाराकडे ठराविक मुदतींत गेलेच नाहींत. नंतर ते गेले. चांभारास कातडें मागताच, त्यानें उत्तर दिलें, "तें कातडें आपण विकून टाकलें! तुमची फार दिवस वाट पाहिल्यावर, तें मी विकलें!"

बुवांची फार निराशा झाली. ते स्वस्थच राहिले. त्यानंतर आणखी कांहीं काल गेला! एक दिवस तो चांभार तेंच कमावलेलें व्याघ्रचर्म घेऊन बालकृष्ण-पंताकडे पश्चात्तापानें आला! चांभार त्यांस म्हणाला "मी तुमच्याशीं पूर्वी खोटें बोललों! कातड्याचा अपाहार करण्याच्या हेतूनें मी तसें बोललों होतों. एक दिवस तें कातडें दुसऱ्या एका गिऱ्हाइकाला उलगडून दाखविण्याकरतां जमिनीवर पसरलें आणि त्यावर मी बसलों! गिऱ्हाइकाचा सौदा तर पटलाच नाहीं, पण त्या क्षणापासून माझ्या सर्व शरीराचा दाह होतो आहे. तेव्हा हें

कातडें तुमचें तुम्ही घेऊन मला आशीर्वाद द्या! मी माझ्या मजुरीचीसुद्धां अपेक्षा करीत नाहीं! पण माझ्या शरीराचा दाह शांत होऊं दे."

बालकृष्णपंत बोलले, "अरे! तें कातडें हिमालयातील असून माझ्या गुरुदेवाचें तें आसन होतें. त्याचा अपमान तूं केलास म्हणूनच अशी गोष्ट झाली असावी. तुला आतां पश्चात्ताप झालेला आहे, तर आतां, हे तुझे मजुरीचे पैसे घेऊन खुशाल जा. तुला कांहीं होणार नाहीं. दुसऱ्याच्या वस्तूचा अपाहार मात्र सोड!" असें म्हणून बुवांनीं कांहीं रक्कम त्या चर्मकारास देऊन त्यास आशीर्वाद दिला. तें व्याघ्रचर्म मोठ्या प्रेमानें बालकृष्णपंत आजहि आपल्या कीर्तनाच्या वेळीं आपल्यापुढें पसरून ठेवतात; त्यातच त्यांना समाधान. तसें कातडें अन्यत्र पहावयास मिळणेंहि दुर्मिळ.

तेव्हांपासून माझी श्रद्धा महाराजांच्यावर अधिकाधिक जडत गेली. मी त्यांना आपली गुरुमाउलीच समजतों. माझ्या मनोदरीचा जडभास त्यांनीं नाहींसा केला. त्या गुरुमाउलीच्या चरणयुगुलांस मी कधींच विसरणें शक्य नाहीं. तीच गुरुमाउली मजवर कृपा करील, माझे कष्ट दूर करील, माझा उद्धार करून मला सुखी करील अशी दृढ श्रद्धा धरूनच मी या जगांत राहिलों आहे. सुभाषितांमध्यें एक सुश्लोक आहे. तोच मी, माझी पत्नी आणि मुलें माझ्या त्या गुरुदेवांच्या बाबतींत सत्य आणि प्रमाण मानतों:—

**एको देवः केशवो वा शिवो वा ॥**
**एकं मित्रं भूपतिर्वा यतिर्वा ॥**
**एका भार्या सुन्दरी वा दरी वा ॥**
**एको वासः पत्तने वा वने वा ॥ ॥**



## प्रकरण २२ वें

( नर्स सुंद्राबाईनें सांगितलेली हकीकत )

# घटस्फोट

पतीच्या प्रेमाच्या गोष्टींना किती ऊत आला होता, हें मी मागें सांगितलेंच. शंकराची बारा वर्षे एकनिष्ठेनें सेवा करावी आणि ती एक दिवस चुकली कीं व्रताची निष्फळता व्हावी, तोच प्रकार त्यांच्याहि बाबतींत होता. मी त्यांच्याकरतां रात्रंदिवस कितीहि मेलें, तरी त्यांना कांहींच किंमत नव्हती. उलट "हत्तीच्या पायाखालीं बांधून इला ठार मारली पाहिजे!" असे ते उद्गार काढीत! त्यामुळें माझें मन दिवसेंदिवस विटत चाललें. त्यांतच, ते ज्या कॉलेजांत प्रोफेसर होते, त्या कॉलेजचा प्रिन्सिपॉल वारल्यामुळें त्याची जागा आपणास मिळावी म्हणून त्यानी खूप प्रयत्न केले होते; पण युरोपियन-शिवाय ती जागा कोणालाच देण्यात येत नसे, त्यामुळें यांचा नाइलाज झाला, व त्या रागानें त्यानी आपली नौकरीच सोडली! इतकेंच नव्हे तर त्यानी पुनः अमेरिकेंत जाण्याचाहि आपला बेत जाहीर केला! परंतु माझी वाट ? 'मी त्यांना नकोशी होतें!!'

मी म्हटलें, "तुम्हाला पृथ्वीच्या पाटीवर कोठें जावयाचें असेल तर खुशाल जा! पण, माझ्या हृदयाचे केवळ 'घड' अशीं जीं माझीं ३ मुलें,–निदान दोन मुली तरी,–माझ्या स्वाधीन करा, आणि माझ्या जीवितार्चे काय करणार तें सांगा! तुमच्याशीं विवाहबद्ध होऊन माझ्या आयुष्याचा केवढा भयंकर सत्यानाश मी करून घेतलेला आहे त्याची तुम्हाला कल्पना नाहीं. 'घरच्या भयानें घेतलें रान, वाटेंत भेटला मुसलमान; त्यानें कापून घेतले नाक आणि दोन्ही कान!'–अगदीं तशी अवस्था माझी झाली आहे. मी अब्रुनिशीं, अर्थानिशीं, भविष्यत्कालच्या आशेविषयीं सर्वस्वी बुडालें आहें! अहो! मी तुमच्यापायीं किती बुडालें आहे, याची थोडीतरी कल्पना करा!—

१२०० रुपये तर रोख, तुम्हाला स्वतःला खर्चण्यासाठीं, ‘तूं मागशील तेव्हां मध्यरात्रीं परत करीन असें तुम्ही वचन दिलेत’ म्हणून दिले.

५०० रुपये, तुमच्या भावजयीच्या आजारीपणांत मी खर्च केले.

३०० रुपये मजकडून एका मुलाला आणण्याकरता केवळ घेतलेंत.

२१६० रुपये अमेरिकेंत मी नौकरी केली, आणि मिसेस ॲंड्र्यूजकडून मला मदतीदाखल मिळाले, तेहि मी तुम्हास दिले.

५००० रुपये, विम्याच्या माझ्या पॉलिसिचे घेतले ते.

३६०० रुपये, अमेरिकेंतून आल्यावर शाळेंत मी नौकरी केली, ते दिले ते.

१००० किरकोळ रकमा व चांदीचीं भाडीं.

८००० रुपये, लोकांकडे माझ्या प्रथम पतीचें येणें होतें; पण माझी डायरी चोरीस गेली, त्यांतील हिशेब.

५०० रुपये, किरकोळ दागिने.

१६२०० रु० छत्तीस वर्षांचें व्याज.

यांची बेरीज किती हजार होते ती तुम्हीच करा, पाहा, आणि त्यांतील कांही अंश तरी नियमितपणें या अभागिनीला तिच्या अंतापर्यंत द्या. त्यावेळीं त्यांनीं माझें कांहींच ऐकलें नाहीं; आणि मुलींना ठेवून, व मुलास घेऊन ते अमेरिकेस निघून गेले. त्यानंतर ते एकदा परत हिंदुस्थानांत आले होते, पण त्यानीं माझ्या पैशाचा हिशोब कधींच भागविला नाहीं. ते निघून गेल्यावर मी तळमळत राहिले ! माझ्या डोळ्यांपुढें अंधःकार दिसूं लागला; डोकें अगदीं फिरून गेलें. आयुष्यांत समाधानाचा, शांततेचा कांहींच मार्ग सांपडेना. त्या वेळीं मी मनास समाधान मिळावें म्हणून ईश्वराच्या भजनपूजनास लागलें. माझ्या एका मैत्रिणीनें मला सांगितलें कीं, ‘ सुंदर ! तूं एकाद्या साधूचे, सज्जन माणसाचे पाय धर; तुझ्या वैतागलेल्या मनाला समाधान होईल.” तेव्हां मी गुरुवारचा, शनिवारचा उपवासहि करीत होते. परंतु, ५॥ महिन्यांत गुरुदेवानी माझ्याकडे ढुंकूनहि पाहिलें नाहीं. व मीहि त्या वेळपर्यंत माझी हकिकत त्यांना सांगितली नाहीं.

एक दिवस गुरुदेवानीं मला विचारलें, "तुम्ही अशा उदास कां दिसतां?" त्या वेळीं मी सर्व हकीकत त्यांना संपूर्ण निवेदन केली.

माझी हकीकत ऐकून घेऊन गुरुदेव म्हणाले "बाई! तूं मुळींच चिंता करूं नकोस. झाल्या गोष्टीचा विचार आतां सोडून दे; **गजाननराव वैद्य** या नांवाचे अत्यंत मोठे, आणि सज्जन गृहस्थ येथें तुमच्यासारख्या लोकांची शुद्धि करीत असतात, त्यांच्याकडे जाऊन त्यांना भेट. मी गरीब संन्याशी आहें. माझ्या हातून तुमचें कार्य होणें नाहीं."

मी म्हटलें, "मी ते सर्व प्रयत्न, यापूर्वी केलेले आहेत. आतां अगदीं निराशा झाल्यामुळें, मी आपल्या पायांपाशीं आलें आहें. मी मूळची हिंदु आहे. माझें रक्त, माझें अंतःकरण हिंदु आहे. मला आपण शुद्ध करून हिंदुधर्मांत परत घ्या!" पण त्यावेळींहि, गुरुदेवानीं ती गोष्ट मनावर घेतलीच नाहीं.

पुढें, माझी धाकटी मुलगी अतिशय आजारी पडली; तिच्या वांचण्याची कोणतीच आशा दिसेना; तेव्हां मी त्यांना म्हटले, "माझी मुलगी आपण वांचवा! आपणास वाचवतां येणे अशक्य नाहीं! माझ्या मुलीला वांचवा!"

गुरुदेवानीं उत्तर दिलें, "मी काय डॉक्टर आहे? कां, वैद्य आहे? तूं डॉक्टर अगर वैद्याकडे जाऊन चांगली चिकित्सा करून तिला औषध दे." त्यावेळींहि, त्यांनी माझ्याकडे लक्ष दिलें नाहीं.

एक दिवस मुलगी अगदीं बेशुद्ध झाली. मला वाटलें, तिचा मृत्यु जवळ आला! मी धाय मोकलून रडूं लागलें. "ना कोणाचा आधार, ना जवळ पैसा!"

त्या दिवशीं, ते, आकस्मात मध्यरात्रीं माझ्या जागेमध्यें आले. माझ्या मुलीच्या सन्निध बसून त्यांनी मोठ्यांदा तिला हाका मारून विचारलें, "काय ग सरस्वति, असं काय करते आहेस? आपल्या आईला कां घाबरवते आहेस? तुला काय झालें आहे?" असें म्हणून त्यानीं तिचा हात धरून ताप पाहिला. पण थोड्याच वेळांत, अशी विलक्षण गोष्ट घडली, कीं, मुलीच्या अंगातील ताप, त्यानीं आपल्यामध्यें काढून घेतला! आणि मुलगी, पूर्णपणें शुद्धिवर आली; इतकेंच नव्हे तर, तिनें नम्रतेनें उठून त्याच क्षणीं गुरुदेवांना नमस्कारहि केला. त्यावेळीं चमत्कार असा झाला होता, कीं, मुलगी तापरहित

झाली होती, पण गुरुदेव स्वतः तापानें, त्याचक्षणीं फणफणले होते! त्यानीं आपल्या जवळची काहींतरी वनस्पति काढली, व ती वनस्पति स्वतः खाऊन टाकली. अंगारा घरांत सर्वांना लावण्यास दिला; व थोड्याच वेळांत ते निघूनहि गेले.

मी त्यानंतर कांहीं कालानें मुलीसह त्यांच्या दर्शनास गेलें असता, त्या बऱ्या झालेल्या मुलीस पायांवर घालून म्हटलें, "माझी पहिली मुलगी मरून, ही दुसरीच झालेली आहे. त्या आजारातून हिचा पुनर्जन्म झालेला आहे; आपल्या उपकारासाठीं मी काय करूं ? ही नवीन जन्म घेतलेली मुलगी मी तुम्हांला अर्पण करितें; तिचा तुम्ही स्वीकार करा."

गुरुदेवानीं उत्तर दिलें, "बाई, मी तुमची आणि तुमच्या मुलीची शुद्धि केलेली आहे. मला हा [illegible] मार्ग सोडून लग्नच करावयाचें आहे. तुमच्या मुलीची संमति असेल, व तुमचीहि खरी इच्छा असेल, तर तुम्ही ही मुलगी मला 'पत्नि' म्हणून विवाहानें द्या. मी 'लग्नानें' तिच्याशीं बद्ध होईन."

मी उत्तर दिलें, "मला व तिलाहि ही गोष्ट मान्य आहे. आपण अवश्य लग्न करून घ्या!"

त्या नंतर गुरुदेवानी माझी मुलगी आपल्या वडिलाना दाखविण्याकरतां चिपळुणास नेली. त्यांनीहि संमति दिल्यावर, परत मुंबईस येऊन सर्व विधी-पूर्वक लग्न केलें, व तिनें संसार सुरू केला. त्या वेळीं त्या लग्नसमारंभास दीडशें माणसें हजर होतीं. पंचपक्वान्नांचा, शिरापुरीचा उत्तम बेत केलेला होता.

अमेरिकेंत पतिराज निघून गेल्यादिवसापासून आमची विभक्तता सुरूच झालेली होती. पतिपत्निचा संबंध फक्त जगाच्या दृष्टीनेंच राहिला होता. लग्नाचें प्रेम नष्टच झालें होतें. अर्थात् कोणी कुणाकरतां घटस्फोट मागावयाचा तो प्रश्नच होता. अमेरिकेंत ते जरी गेले होते, तरी मधून मधून लहर आली म्हणजे कांहींतरी वेडेवांकडें लिहून मला दुःख देण्याचा क्रम त्यानी मुळीच सोडला नव्हता. अशा स्थितींत, माझ्या वयाच्या ६२ व्या वर्षी आणि त्यांच्या वयाच्या ६५ व्या वर्षी, त्यानी अमेरिकेच्या कोर्टात माझ्या-

विरुद्ध हास्यास्पद घटस्फोट मागितला. ज्या वेळीं माझें तारुण्य होतें, मी यौवनात होतें, त्या वेळींच त्यानीं माझ्यावर आरोप करून घटस्फोट मिळविला असता तर तें सर्वप्रकारें उचितच दिसलें असतें. माझ्या वयाच्या ६२ व्या वर्षी अमेरिकेसारख्या पर ठिकाणीं घटस्फोट मागण्यांत त्यांची काय शोभा होती ? त्यानीं माझे बाबतींत घटस्फोट मागितला, तो येणेप्रमाणें. त्याचा नमुना मी येथें देतें. हिंदुस्थानात अशा प्रकारचा नमुना प्रथमच हा आहे :—

State of Minnesota, In District court,
County of Rice. Fifth judicial District.

.............................................................................................

..........................................................Plaintiff.

*vs.*

*Nurse Sundrabai*..................................Defendant.

.............................................................................................

## SUMMONS.

*The State of Minnesota to the above named Defendant:—*

You are hereby summoned and required to answer the complaint of the plaintiff in the above entitled action, which complaint has been filed in the office of the clerk of the District court in and for said Rice county and a copy of which is hereto annexed and herewith served upon you, and to serve a copy of your answer to the said complaint upon the subscriber at his office in the . ...Building in the city of Northfield, Rice county, Minnesota, United States of America, within thirty days after the service of this summons upon you, exclusive of the day of such service; and if you fail to answer the said complaint within the time aforesaid the plaintiff in this action will apply to the court for the relief demanded in said complaint.

Dated April 19th, 1939.

A. B. C.

*Attorney for plaintiff......Building,*

Northfield, Minnesota.

# COMPLAINT.

The plaintiff complains of the defendant and alleges :—

I. That the plaintiff,..... aged 65 years, and the defendant, Nurse Sunderabai, aged 62 years, are husband and wife and were married at...... in the province of India, in the month of May 1901

II. That the plaintiff is a resident of the city of Northfield, in the county of Rice and State of Minnesota, and has resided therein continuously for more than one year immediately preceding the verification of this complaint.

III That in the year 1921, defendant wilfully deserted plaintiff and has ever since and for more than one year next preceding the verification of this complaint uninterruptedly continued such desertion.

IV. That since said marriage defendant has treated plaintiff in a cruel and inhuman manner, and as a particular instance of cruelty. plaintiff alledges and shows to the court . -

That at the time of their marriage the plaintiff and defendant were of the Christian faith and that in the year 1921, and against the protests of this plaintiff, the defendant renounced the Christian religion and adopted the Hindu religion and said defendant prevailed upon the daughter of plaintiff and defendant to also renounce the Christian religion and to adopt the Hindu religion and to also marry a man of the Hindu religion. That in India, where the plaintiff and defendant lived at the time, these facts constituted a breach of all marriage vows and has caused this plaintiff serious mental distress and suffering and injurious to his health and happiness.

V. That there is no minor issue of said marriage.

**Wherefore,** plaintiff demands judgment, dissolving the marriage relation of plaintiff and defendant.

A. B. C.

Attorney for plaintiff Northfield,

Minnesota.

## प्रतिज्ञा

मी,-नर्स सुंद्राबाईचा पति, प्रतिज्ञेवर आणि शपथ घेऊन खरें सांगतों, कीं, वर लिहिलेली सर्व फिर्याद मी पूर्णपणें अक्षर न् अक्षर वाचली आहे. व त्यांतील मजकूर माझ्या माहितीप्रमाणें आणि समजुतीप्रमाणें खरा आहे. तसा माझा दृढविश्वास आहे; म्हणून, तो मजकूर सत्य आहे असें मी सांगतों.

........................

Subscribed and sworn to before me this 19th day of April 1939.

A. B. G.
Attorney for plaintiff.

*　　　*　　　*

वरील समन्स आल्यानंतर माझ्या दुर्दैवानें त्यांचा तिकडेच फार थोड्या कालापूर्वी अंत झाला! आणि माझ्या दैवाची फिर्याद परमेश्वराच्या घरींच रुजु झाली; घटस्फोटाच्या फिर्यादीसाठीं तळमळणाऱ्या त्यांच्या आत्म्यास परमेश्वर शांति देवो, अशीच मी त्या जगन्नियंत्याजवळ प्रार्थना करून, ही माझी आयुष्याची कादंबरी संपवतें. विशेषतः माझ्या हातांतील विवाह-रेषा दुशाखी, वक्र, असल्यामुळें तिचें फळ घटस्फोट, पतिपत्नींनी एकमेकांपासून दूर रहाणें, विवाहाचें नातें जगाच्या दृष्टिनें स्पष्ट असतांना एकमेकामध्यें प्रेमाचें स्वारस्य नसणें, विरह आणि वियोग, यांमध्यें तें घडून यावें, ही गोष्ट दैवांत लिहिल्याप्रमाणें, सत्यच झाली आहे, याचाहि मी अनुभव घेऊन चुकलें. प्रत्येक भगिनीनें आपली विवाहरेषा कशा प्रकारची आहे, सुखाची आहे किंवा दुःखाची आहे, हें आपल्या हातांवरून समजून घेणें आवश्यक आहे, असें मला वाटतें.

प्रथम पतिपासून झालेला अमेरिकेंतील माझा थोरला मुलगा रघुनाथ, ही कादंबरी लिहीत असतांना मृत्यु पावल्यानें, माझ्या अंतःकरणास फारच दुःख झालें. मन दुःखित झाल्याकारणानें या कादंबरीचा राहिलेला आणखी रहस्यपूर्ण भाग, मी या कादंबरीच्या दुसऱ्या खंडांत देईन! रसिक गुणग्राही वाचकांना, एवढें खात्रीचें अभिवचन देऊन, या भागाचें लेखन मी समाप्त करतें.

## उपसंहार

( श्री. बाळीच्या मौल्यवान पत्राधारें )

### "दुःखाला सोडणें, हाच सुखी होण्याचा उपाय."

( अमेरिका )

२२ मार्च १९४१

प्रिय माते ?

......मागील सर्व गोष्टी विसरून जा! आपलें आयुष्य हें कडु आणि गोड गोष्टींनीं इतकें भरलेलें आहे, कीं, तें जसें असेल तसें आपण निमुटपणें सोसलेंच पाहिजे ! भगवान् बुद्धानें म्हटलें आहे, कीं, आयुष्य म्हणजे, तेथें दुःख हें असावयाचेंच. 'दुःखें सोसण्याची ती एक भयंकर कसोटी आहे,' हीच कल्पना आपणास धैर्य देते. जर मनुष्याला कांहींच आशा नसेल,–अपेक्षाच नसेल, तर तेथें 'निराशे'चा प्रश्नच उद्भवत नाहीं !

आयुष्य हें क्षणभंगुर आहे. आज आपण येथें ( पृथ्वीतलावर ) आहों, तर उद्यां आपण येथें नाहीं ! म्हणून गत कालाविषयीं शोक करूं नकोस. सर्व कटु गोष्टी विसर, आणि त्या ज्यांनीं केल्या असतील त्यांना क्षमा कर! कोणाचा द्वेष न करतांना आतां चांगल्या गोष्टींकडे पहा. जगांत तशा चांगल्या गोष्टी कितीतरी, अनंत आहेत !

आई ? तुझ्यावरचें माझें प्रेम, एखाद्या खडकासारखें अचल, दृढ, स्थिर, बळकट आहे ('as strong as a rock !'). गतकाल विसर; त्याची स्मृतिहि मनांत आणूं नको. त्यांत मनाला आनंद नाहीं, समाधान नाहीं. वडिलांच्यांत दोष होते, ते मी नाहीं म्हणत नाहीं. मी त्यांची बाजू घेऊनहि तुला हें सांगत नाहीं. तर, जगांत सर्वच-